॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥

॥ श्रीरामचन्द्राय नमः ॥

# मानवता-पूर्ति-साधन

## व

# सन्ध्योपासना

## पूर्वार्ध

: लेखक :

दण्डी स्वामी प्रज्ञानानन्द सरस्वती



किमत ६ रुपये

# लेखकाचें निवेदन

श्री वासुदेवचरणाम्बुज - रस - मत्तालि - गुंजितं सुजनाः ।
शृण्वन्तु सावधानं मानवता - पूर्ति - साधनं सुलभम् ॥ १ ॥
दर्शनानि न साहित्य न वा व्याकरणं श्रुतम् ।
धर्मशास्त्रं न चाऽधीतं न वेदाऽध्ययनं कृतम् ॥ २ ॥
नाऽयं ज्ञानी न चाज्ञानी न शास्त्री न च पण्डितः ।
धाष्टर्यं तथापि कृतवान् सन्ध्योपासन - लेखने ॥ ३ ॥
सन्ध्यावन्दनलेखन - भारं वोढुं क्षमं परिज्ञाय ।
दूषणखरहा दूषणखरतायुक्तं खरं युयोजैनम् ॥ ४ ॥
निगमां महिषमुखानें वदवी गौरीशृंगीं पंगुस चढवी ।
तो 'संध्योपासना' पुस्तका- । लेखक हारि कारि तुच्छ भिक्षु-का ॥५॥

श्री मानस-गूढार्थ-चंद्रिका टीकाग्रंथ लिहून झाल्यावर वाटलें कीं, या देहानें करावयाचें कार्य संपलें एका श्रीरामचरित-मानसा शिवाय इतर ग्रंथाचें वाचन किंवा एकाद्या ग्रंथाचें लेखन करण्याचा मनबुद्धींना अगदीं कंटाळा आला असें असता व असल्या बाबींत कोणाच्या प्रेमळ आग्रहाला मुद्दा बळी न पडण्याचा स्वभाव असता व श्रीयुत य. गो. जोशी यानीं मागील (१८८२) दत्त जयंतीच्या दिवशीं केलेल्या विनंतीला 'हलें शक्य नाहीं' असें उत्तर दिलें गेलें असता, नंतर नाशिकच्या निवासात हा देह नाळगुदाच्या विकाराने भूमिगत होणाच्या पयाम लागला असता जगाचा व नाशिकाहून परत येताना पुन्हा य. गो. जोशी यानीं विनंति केल्यावर 'हो, ठीक आहे' असें उत्तर, इच्छा नसताहि बाहेर पडलें, तें ऐकून या हृदयाला आश्चर्य वाटलें! व स्मृति उठली कीं, 'प्रेरक हृदि रघुवंश विभूषण' (तु. रा.) 'निमित्तमात्र भव' 'आपुलिया बळें नाहीं बोलवत । सखा भगवंत वाचा त्याची ॥' (तुकोबा)

कलिकालाच्या प्रेरणेनें, व भारतशासकांच्या व विविध प्रचारकांच्या प्रभावानें, मराठी भाषेंतील अनेक वाक्प्रचार व म्हणी यांस निरर्थकता

आली आहे, त्यात 'सध्येसारखें पाठ' हा वाक्प्रचार निरर्थकच नव्हे तर विरुद्धार्थसूचकहि ठरला आहे. धर्म म्हणजे क्विनाइनची गोळी, सध्या करणें म्हणजे व्यर्थ कालापव्यय करणें आहे, इत्यादि अनेक भ्रामक व मानवता विनाशक समजुतींचें साम्राज्य चालू झालें आहे, हें श्रीयुत जोशी यास माहीत नसेल असें नाहीं व ऋग्वेदी, यजुर्वेदी सध्यांचीं अनेक सार्थ व स्वस्त पुस्तकें बाजारात मिळतात, असें असता सविस्तर पुस्तक लिहवून घेऊन तें स्वत च्या खर्चानें छापण्याची इच्छा श्री जोशी यास का व्हावी! ख्यातनाम असलेले अनेक जाडे विद्वान्, शास्त्री, पडित विद्येचें माहेरघर असलेल्या पुणें शहरात अनेक असता, लोकप्रसिद्ध लेखकानीं लिहिलेलीं पुस्तकें, त्याच्या नावामुळें भराभर खपतात, हें 'प्रसाद-प्रकाशन' सचालकास माहीत नसणें अशक्य असता, कुठेंतरी कोंपऱ्यातील एखाद्या खेडेगावात राहणाऱ्या, अप्रसिद्ध, विद्वत्तारहित, पाडित्यहीन, शास्त्राभ्यासविहीन, सस्कृत भाषेचें ज्ञान यथातथाच असलेल्या, निश्चयी, निष्काचन अशा एका ६८ वर्षाच्या वृद्ध सन्याशाला पुन पुन विनति करण्याची इच्छा त्याना व्हावी हेंहि एक मोठेंच आश्चर्य? अशा अनेक गोष्टींवरून बुद्धीची खात्री झाली की, 'प्रभु इच्छा' 'प्रभु प्रेरणा' आहे केवळ वाचिक धर्मांमारखी ग्रथलेखनाची जबाबदारी वाग्देवतेनें स्वीकारले बरोबर, २१४ दिवस जातात न जातात तोंच, त्याचें नावसुद्धा कधी श्रवणात नव्हतें असे धर्मशास्त्रग्रथ भराभर, न कळत हातीं येऊ लागले ते त्याच्याकडे होते त्यास त्याचें अस्तित्व आणि नावहि माहीत नव्हतें. पूर्वी माहीत असलेला अग्निपुराण ग्रंथ काढण्यासाठीं हात घातला तर संस्कार रत्नमालाच हातीं आली? पराड्यासारख्या मराठवाड्यातील खेड्यात, जेथें धर्मसिंधु, निर्णयसिंधुसारखे प्रचलित सुप्रसिद्ध ग्रथ मिळण्याची पचाईत, तेथें निर्णयसिंधुचा तपास करता, एकानें जीर्णशीर्ण हस्तलिखित पोथ्याचें गाठोडें पुढें आणून ठेवलें, व त्यात निर्णयसिंधु आहे, इतकेंच त्यास माहीत होतें तो पाहता उदरानी गाळलेली पोथी? पण त्याच्या मागें, कधी नाव न ऐकलेल्या 'मदनपारिजात' ची हस्तलिखित पोथी! अशा प्रकारें अनेक ग्रथ भराभर हातीं आले 'कलौ पाराशरस्मृतिः' इतकेंच पूर्वी ऐकलें होतें, पण भराभर रत्नमालेंत

वृद्धपाराशरस्मृतिः [1] व त्यातील सविस्तर सध्यावर्णनाविषयींचा हवाला आढळला [2] अशा अनपेक्षित रीतीनें माहिती मिळत गेली

पत्रव्यवहारानें पोष्टानें, पुस्तकें, पोथ्या मागविणें व तीं वेळेवर परत पोष्टानें पाठविणें, यासाठीं ५०।६० रुपये लोकांनीं आनंदानें खर्च केले। विशप-चार्लस् लेडबीटर यांच्या, गायत्री मन्त्रादिकाविषयींचे अनुभव, सचित्र, वर्णन केलेल्या, १९२६ मधील लेखाचा, असाच अनपेक्षितपणें सुगावा लागला व तो पुण्यात मिळाला। या थोड्या उदाहरणावरून खात्री होईल की भगवत्प्रेरणा व कृपाच यांच्या मुळाशीं आहे 'ऋक्-प्रातिशाख्य' हा ग्रंथ उव्वटभाष्यसारासह अनपेक्षितपणें मिळाला.

वर लिहिल्याप्रमाणें श्रीयुत य गो जोशी यांच्या आग्रहानें हा ग्रंथ लिहून झाला कच्चे लेखन झाल्यावर तें त्यांच्याकडे अवलोकनार्थ पाठविलें गेल्यावर बरेच दिवसांनीं त्यांनीं कळविलें की, ग्रंथात निषेध मुळींच नसावेत व 'संध्या न केल्याचें फळ' हें प्रकरण गाळावें मुद्रण प्रत लिहून झाल्यावर पुन्हा त्यांनीं कळविलें कीं, 'आहार बाबतील ते विषय गाळून टाकण्याची अनुज्ञा असेल तर ग्रंथ छापू, अन्यथा नाहीं'

निषेध काढून टाकणें म्हणजे लोकरंजनासाठीं धर्मशास्त्र लपवून ठेवणें या लेखकाकडून कालत्रयींहि होणें शक्य नाहीं हेंहि कळविलें गेलें कीं, स्वतःची इच्छा नसता ज्या अर्थी ग्रंथ लिहविला गेला आहे त्या अर्थी निषेध न गाळता तो एक वर्षाच्या आत छापला जाणार आहे ज्या अर्थी अशा रीतीनें छापण्याचें नाकारण्याची बुद्धि त्यास झाली त्या अर्थी स्वखर्चानें हा ग्रंथ प्रकाशित करण्याचें श्रेय त्यांच्या नावावर पडू नये अशी नियति दिसते त्यांनीं जर प्रारंभींच निषेधाविषयीं सांगितलें असतें तर हा ग्रंथ लिहिलाच गेला नसता म्हणून निषेधाविषयीं भगवंतानीं त्यांच्या मुखातून वदविलें नाहीं हा ग्रंथ लिहिला जाण्यास प्रेरक म्हणून श्रेयस्‌ फक्त त्यांच्या वाट्यास देण्याची प्रभूची इच्छा असावी

नंतर श्रीयुत ग भा जोशी यांच्या परिचयाचे कोल्हापूर येथील प्रकाशक श्रीयुत ग वा कुलकर्णी यांजकडे त्यांनीं पृच्छा केली व कच्चें लेखन अवलोकन केल्यावर स्वखर्चानें प्रकाशित करण्याचें त्यांनीं मान्य

गेल्याचें त्याचें पत्र आलें पहिल्यानें त्यानींच कबूल केलें म्हणून हा ग्रंथ त्याचेकडे प्रकाशनास दिला गेला

शास्त्राज्ञाचा अपलाप करून, लोकरंजन करून, बुद्धिभेद केल्याचें श्रेय प्रवचनात किंवा लेखनादिकात घेणें ही गोष्ट या मनाला स्वप्नातहि कधीं आवडली नसल्यानें, आणि स्वतःची आवड किंवा स्वतः केलेलें, म्हणून तें लोकांच्या माथीं मारणेंहि मनबुद्धींस कधीं न रुचल्यानें, सध्ये-सारख्या शास्त्रीय विषयावर सविस्तर, शास्त्रशुद्ध, साधार लिहिणें आणि त्यात आधुनिकांच्या बुद्धिवादाला आवश्यक वाटणारें कार्य–कारणभावदर्शक, वैज्ञानिक, व मानसशास्त्रदृष्टीनें विवरण यथामति, सानुभव करणें क्रमप्राप्त ठरलें तथापि हा लेखक स्वतःस सर्वज्ञ, त्रिकालज्ञ, अतींद्रियज्ञानसंपन्न इत्यादि काहींच मानीत नसल्यामुळें, अनेक हस्तलिखित पोथ्या व छापील पुस्तकें यांचें अवलोकन करून विषयवार टाचणें प्रथम काढावीं लागलीं तेवढ्यासाठीं किती ग्रंथ अवलोकन करावे लागले व किती ग्रंथाचे आधार घ्यावे लागले हें प्रारंभीं दिलेल्या संदर्भ ग्रंथाच्या यादीवरून कळलें असेलच संध्या वगैरे विविध विषयाचें संस्कृतादि ग्रंथातून १९३० पासून संग्रहीत केलेल्या, वचनाचें एक मोठें बाड जवळ होतेंच

कुशाग्र, तत्वग्राही, चिकित्सक बुद्धि वगैरे 'देणें भगवताचें' जन्मतःच प्राप्त झालेलें, त्यात निर्भीडपणा, लोकमताविषयी औदासिन्य इत्यादि कोंकणस्थातील गुण म्हणा दोष म्हणा, जातिस्वभावानें होतेच, पण तुसडे पणा, तुटकवृत्ति, नम्रता मुळीं वगैरेंचा अभाव वडिलोपार्जित संपत्ति म्हणून मिळालेला व १९१४–१८ मधील गुजराथेंतील निवास व मुख्य माडवल म्हणजे श्रीरघुनाथ व सद्गुरुकृपा व प्रेरणा या सर्वांच्या समुच्चयानें जें स्फुरलें तें निराग्रहीं स्पष्ट करून, यथामति विषयवार मांडणी करून, मनबुद्ध्या दिवसरात्र परिश्रम करून लिहिण्याचें कार्य त्या विश्वसंचालकानेंच केलें, या लेखकाची पात्रता किती ते शिरोभागीं दिलेल्या श्लोकावरून कळेलच.

ग्रंथावलोकन करतांना असें आढळलें कीं, नित्य कर्मी स्नान, आचमन, मृत्तिका व भस्मधारण, पवित्रक धारण इत्यादि करींच कर्में चारी वर्णास

आवश्यक म्हणून सांगितली आहेत, त्यामुळें हेंहि दाखविणें ओघानेंच प्राप्त झालें कीं सनातन धर्माच्या प्रत्येक व्यक्तीस मानवत्वाची पूर्णता प्राप्त करून घेऊन दुःखातीत शुद्ध सात्त्विक सुखाचा अनुभव घेण्यासाठीं द्विजेतरांनीं काय केलें पाहिजे. यामुळें हा ग्रंथ द्विजास व द्विजेतरासहि उत्तम प्रकारें परमहितमार्गदर्शक होईल असें पुरोहितपणाचा व्यवसाय करणाऱ्या ब्राह्मणापासून समाजातील विविध थरांतील, ब्राह्मण ब्राह्मणेतर इत्यादि ज्यांनीं तो वाचला त्यांचें मत झालें, व त्यातील कांहींनीं तें श्रीयुत व. गो. जोशी यास पत्रानें कळविलेंहि आहे.

या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत. पूर्वार्धात शौच, आचमनापासून तों सध्यासमाप्तीपर्यंतच्या विविध उपांगाची व अंगाची व गायत्रीजप ध्यान-रूपी मुख्य सध्येची विधिनिषेध वर्णनासह शास्त्रीय चर्चा केली आहे. त्या त्या कर्मांनें होणारे फायदे व त्या कर्मांची वैज्ञानिक व मानसशास्त्रदृष्ट्या उपयुक्तता यथामति दाखविली गेली आहे. शास्त्रकथित लाभ झाल्याचीं उदाहरणेंहि शक्य तेथें दिलीं आहेत. पाश्चात्य संशोधकाचे अनुभवहि कांहीं प्रकरणात दिले आहेत. शौचविधि व स्नान याचा सध्येशीं प्रत्यक्ष संबंध नसला तरी शौचाच्या तक्रारी असता जपादि कार्य स्वस्थपणें होत नाहीं व स्नान केल्याशिवाय सध्या करण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं, इत्यादि कारणामुळें हीं दोन प्रकरणें घालावीं लागलीं.

शास्त्रोक्त पद्धतीनें तयार केलेलीं जानवीं मिळणें हल्लीं फार कठिण झालें आहे, व जानवीं गळून देणारेहि दुर्मिळ होत चालले आहेत, हें जाणून हे दोन्ही अगदीं सुटसुटीत विधि 'यज्ञोपवीत' प्रकरणात दिले आहेत. अग्निहोत्राचें भस्म मिळणें तर फारच कठिण झालें आहे, व जें क्वचित मिळतें तेंहि अगदीं शुद्ध नसतें, म्हणून कोणाहि सध्या शिकलेल्या द्विजास सहज, अगदीं अल्प कष्टानें, अगदीं शुद्ध भस्म तयार करण्याचा, अगदीं सोपा मार्ग 'मृत्तिका भस्मधारण' प्रकरणात दाखविला आहे.

आधारभूत सगळीं वचनें दिलीं असतीं तर ग्रंथाचें कलेवर दीडपट वाढलें असतें, म्हणून मुख्य मुख्य श्लोक सार्थ देऊन, बऱ्याच वचनाचा

नुसता अर्थ देऊन, त्याला आधार काय हें कंसांत संक्षिप्त नांवें देऊन दाखविलें आहे.

लेखात दिलेले **संस्कृत श्लोक व इतर संस्कृत अवतरणें शक्य तेथें संधि सोडून, किंवा पदें पाडून दिलीं आहेत;** हेतु हा कीं थोडेसें संस्कृत जाणणारास सुद्धा वाचताना गोपवारा तरी कळावा. देवपूजेंतील रहस्याची व वैश्वदेवातील अडचणी दूर करण्याची साधार माहितीहि संध्येच्या सर्व प्रकरणाच्या नंतर दिली आहे.

मंत्रांतील स्वर पुस्तकात दिले तरी दुसऱ्या कोणाकडून संथा घ्यावी लागणारच, हे जरी खरें असलें तरी संध्या शिकणारास पुन्हा पोथीची जरूर लागणारच; आणि सुटीं असलेलीं मंत्रातील पदें (शब्द) सुद्धां तोडून न छापता एका मोठ्या समासाप्रमाणें अर्धा मंत्र किंवा चरण छापण्याच्या पद्धतीमुळें, उच्चारताना शब्द कुठें तोडावे हें संथा देणारांस सुद्धां सहसा माहीत नसतें व भलत्याच ठिकाणीं शब्द तोडून म्हटल्यानें अर्थाचा अनर्थ होतो; उदाहरणार्थ बहूंच्या अभिकार्यांत 'तेजसा मासमनज्मि' असें एक वाक्य आहे, तें बहुधा 'तेजसामा समनज्मि' असें शिकविलें जातें. तेजसा–अग्नीच्या तेजानें, मासम्–माझें मुख, अनज्मि मी चोपडतो; माझ्या मुखावर मी अग्नीचें तेज चोपडतो, असा अर्थ आहे, पण 'तेजसामा समनज्मि' यातील 'तेजसामा' याचा काहींच अर्थ होत नाहीं! असे अनेक अनर्थ, संध्यादि कर्मांतील मंत्राच्या उच्चारात, केलेले जेव्हा पूर्वीं अनेक वेळा कानीं पडत, तेव्हा कानांत तप्त तेल ओतल्यासारखें वाटत असे. गाध्या देशकालादि संकल्पोच्चारांत सुद्धा असेच अनर्थ केलेले कानावर पडत व अद्यापिहि प्रसंग विशेषीं तसेंच कानीं पडतें. देवे, पुरुषसूक्ताचे मंत्र, रुद्र व फार काय संध्येतील मार्जनाच्या मंत्रांत सुद्धां 'इदमापः प्रवाहत' व कधीं 'इमाप प्रवाहत' असे उच्चार संध्या शिकवणारेच करतात! स्वरांचें तर विचारूंच नये!

मंत्रांतील शब्दांना व स्वराचा शुद्ध उच्चार न केला तर कसे विपरीत परिणाम घडतात, भलत्याच अक्षरावर जोर दिल्यानें अर्थ कसे बदलतात यांचीं उदाहरणें इतिहासात आहेतच; पण लेट चीटर यानाहि जे परिणाम शुद्ध व अशुद्ध उच्चाराचे प्रत्यक्ष अनुभवास आले त्यांतील एक त्यानीं

'ए टेंपल थॉट फॉर्म'×या लेखात सचित्र वर्णन केला आहे तो – प्रणवपूर्वक भूः भुव स्व वगैरे सात व्याहृतींतील विसर्गांचे उच्चार सुव्यवस्थित शुद्ध केले गेले की शांततेची व प्रसन्नतेची एक मोठी लाट धनुष्याच्या काबीसारखी अंतरिक्षांत पसरते, पण विसर्गांचे व अक्षरांचे उच्चार कठोर, कर्कश, मळल्याच अक्षरावर जोर देऊन केले तर ती लाट मधें मधें करवतीच्या दात्यासारखी कापरी निघते। तें **चित्र पुढें पृष्ठ १० वर** दिलें आहे; त्यावरून कल्पना करता येईल.

अर्थज्ञानयुक्त भावनापूर्ण हृदयानें गायत्रीचा उच्चार केला की जिथें सूर्य असेल तेथून उच्चार करणारापर्यंत सौरतेजाचे प्रवाह कसे येतात व त्याच्या अंतरात व मेंदूत शिरून त्याला व्यापून कसे बाहेर पडतात याविषयीचे लेडबीटर याना दिसलेले अनुभव 'ए टेंपल थॉट फॉर्म'या लेखात दिलेले '**गायत्रीचा महिमा**' या प्रकरणात (पृष्ठ ६२ व ६३) दोन रेखाचित्रासह दिले आहेत त्या लेखात ते लिहितात कीं, गायत्रीमंत्रासारखा अद्भुत परमप्रभावी मंत्र कोणत्याहि धर्मांत नाहीं त्याना मार्जन, मंत्राचमन, आसनविधि, इत्यादींतील मंत्रांचेहि फार रमणीय भिन्न भिन्न परिणाम जे दिसले ते त्यानीं त्या लेखात वर्णन केले आहेत जी विभूति (भस्म) लावतात तें भस्म नसून फार तेजस्वी अग्नीच, रचल्या

---

× *The Mantric recitation of* भू भुव स्व etc *sends forth* a wonderful wave of peace which prepares the way for action of गायत्री At least, that is what it should do—what it realy does when the recitation is properly managed

The whole series of words when pronounced more smoothly *and softly* makes a wave of peace, the edge of which is a beautiful continuous curve spreading steadily outwards as in fig (a) Whereas every time that the harsher sound is introduced the line of this curve is broken, precisely as it would be if some one jogged the elbow of the artist who was trying it, producing an effect like that shown in fig b

बोटानें घेतला जातो असें त्यास दिसतें, म्हणजे 'अग्नि इति भस्म' हें सप्रयोग सिद्ध झालें येथें तें सगळें वर्णन करणें अप्रधानकपणाचें ठरेल ज्याना इमजी चागलें येत असेल त्यानीं त्याचा तो लेख मुद्दाम वाचून पहावा आणि त्याचें भाषातरहि वर्तमानपत्रें, मासिकें वगैरेंत सदश, आणि पुस्तकरुपानें प्रसिद्ध करावें, मात्र त्याचें भाषातर करण्याचें कार्य हा लेखक करणार नाहीं, कारण हेंच कीं वेळ नाहीं व इग्रजीचें ज्ञान आता बरेंच मलिन झालें आहे तो लेख १९२६ च्या एप्रिलच्या 'थिऑसाफिस्ट'च्या अकात आहे त्या वर्षाच्या अकाचें पुस्तक पुणें येथील थिऑसॉफिकल सोसायटीच्या पुस्तकालयात आहे

ऋग्वेदी सध्येंतील मंत्राचे ऋषिछद देवतादि निश्चित करण्यासाठीं ऋक्सर्वानुक्रम सूत्रातील उतारे सूत्रविवरणासहित पुण्यातील एका शास्त्र्याकडून मागविले व सागलीच्या एका वैदिकाकडून सर्वानुक्रमसूत्राचे व गृह्य परिशिष्ट अ १ ख ८ मधील उतारे मिळाले त्या दोन ठिकाणच्या उताऱ्यात काहीं मत्रात मतभेद आढळले, व विवरणात छदशास्त्रविरोधी उल्लेख आढळले, तेव्हा त्यातील दोष छद शास्त्रानुसार व इतर उपलब्ध आधारानीं काढावे लागले त्याविषयीं सग्रह आधार चर्चा 'ऋषिछन्दर्देवतादि' निर्णय प्रकरणात केली आहे या एका अति सह त्याच्या बाबीचा शास्त्रशुद्ध निर्णय दुरभिमान-पक्षाभिमान रहित, करण्यासाठीं खूप पत्रव्यवहार करावा लागला आणि सुमारें ४५ दिवस त्या एका प्रकरणानें खाल्ले! एका निरहकारी व्याकरणाचार्य, वेदान्ताचार्यांची मदत घ्यावी लागली!

कच्चें लेखन पूर्ण होऊन तें अवलोकनार्थ पुण्यास पाठविलें गेल्यानतर १४।१०।६१ रोजीं, पाहटेस स्फूर्ति उठली कीं, छन्द शास्त्राविषयीं माहिती अग्निपुराणात कदाचित् सापडेल, त्याप्रमाणें सकाळीं पाहिलें व श्रीसद्गुरु कृपेनें 'छन्द:सार' व 'छन्दोजाति' हे दोन अध्याय सापडले! त्याचा फारच उपयोग झाला उदा ऋग्वेदी सध्येंतील दुसऱ्या मार्जनात 'पचमी वर्धमाना सप्तमी प्रतिष्ठा' असा पाचव्या व सातव्या मत्राच्या छदाचा उल्लेख आहे सध्या करणाऱ्या बहुतेकाचा असाच समज आहे कीं गायत्री, अनुष्टुप् इत्यादि छदासारखे हे दोन स्वतत्र छद असतील, पण तसें नाहीं

गायत्री छंदाच्या अनेक प्रकारांपैकीं ते दोन आहेत ६, ७, ८ अक्षरांच्या **तीन चरणाचा वर्धमाना गायत्री,** १।१ अक्षर प्रत्येक चरणात वाढतें म्हणून वर्धमाना, (गायत्री) आणि **८, ७, ६ अक्षरांच्या तीन चरणांचा प्रतिष्ठा गायत्री** ९, ९, ७ नागी, ७, ९, ९ वाराही, ६ च्या चार चरणाची चतुष्पदा, ८, ८, ८ त्रिपदा, इत्यादि गायत्रीचे भेद आहेत उष्णिग्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप्, अनुष्टुप् व जगती यांचेहि विविध भेद आहेत, त्रिपदा गायत्री छंद पहिला, त्याचीं अक्षरें चोवीस, व पुढें प्रत्येक छंदात ४।४ अक्षरें वाढतात, असे एकंदर २१ मुख्य छंद आहेत, शेवटचा 'उत्कृति' त्यात १०४ अक्षरें असतात 'ऋक् प्रातिशाख्य' व पिंगल सूत्रें मिळाल्यानें तर फारच मोठा आधार मिळाला

तैत्तिरीयात मंत्राच्या ऋषिछंदादींचा उच्चार करण्याची पद्धति नाहीं असें सांगलीचे तैत्तिरीय अग्निहोत्री आणि मुंबईचे एक चांगले तैत्तिरीय शास्त्री याजकडून पत्रानें कळलें, निर्णयसागर पोथींतहि दिलेले नाहींत तथापि बृहत्पाराशरस्मृति, संवर्त स्मृति, अग्निपुराण इत्यादि ग्रंथात अनेक तैत्तिरीय मंत्रांचे ऋष्यादि दिलेले आढळले तैत्तिरीय नारायणोपनिषदात गायत्री व प्रणव यांचे आहेत, तैत्तिरीय कालाग्निरुद्र-उपनिषदात तर त्या उपनिषदाचेहि ऋषि, छंददेवता दिलेले आढळले, तैत्तिरीय शुकरहस्योपनिषदात तत् त्वम् असि, या तीन पदांचे ऋषि, छंद, देवता, बीज, शक्ति कीलक, आणि विनियोग यांचे, न्यास व ध्यानें, यांसह उल्लेख आहेत ऋष्यादींचें ज्ञान व उच्चारण आवश्यक असल्याचें ज्या बृहत्पाराशरादि स्मृतींत व काहीं पुराणात जेथें सांगितलें तेथें तैत्तिरीयाचा अपवाद सांगितलेला नाहीं, आणि स र माला ग्रंथात, तैत्तिरीय सध्या प्रयोगात पुष्कळ चुकीचे का असेनात, पण सर्व मंत्राचे ऋष्यादि वर्णिलें आहे

या सर्व पुराव्यानीं नि संशय निश्चय झाला कीं तैत्तिरीयानीं सुद्धा सध्या यज्ञ, याग इत्यादि कर्मांत ऋषि, छंद देवता व विनियोग यांचा उच्चार करणें एक अत्यंत आवश्यक कर्म आहे, पण या अप्रसिद्ध सन्याशाच्या निर्णयाला व मताला किंमत काय ? म्हणून जगद्गुरु श्रीमत् शंकराचार्य शृंगेरी मठ यांना मोडक्या तोडक्या संस्कृतात पत्र लिहिण्याचें साहस करावें लागलें, व श्रींचा पत्ता माहित नसल्यानें पंचवटींतील श्रीशृंगेरी

मठाच्या म्हैसुरी मॅनेजरमार्फत तें पाठवावें लागलें श्रींनीं जो निर्णय साधार दिला आहे त्यातील एका पुराव्यानें या सन्याशानें केलेल्या निर्णयावर मान्यतेचा शिक्कामोर्तब केला गेला आहे, म्हणून तैत्तिरीय मंत्राचे ऋष्यादि उत्तरार्धांत दिले आहेत

"आपस्तम्बगृह्यसूत्र-भाष्ये सुदर्शनकृते ऋष्यादिस्मरणमावश्यकमिति प्रतिपादितम्। वक्तव्य छन्द आदौ तु ततश्चर्षि प्रकीर्तित । देवताविनियोगश्च तैत्तिरीयकपाठकैरिति स्मृतौ तैत्तिरीयैरपि अवश्य ऋष्यादिस्मरण विहितमस्ति।" हा त्या प्रमाणपत्रातील एक उतारा आहे

प्रमाणपत्राची नक्कल—

श्री शृङ्गेरी जगद्गुरु महासंस्थानं, शारदापीठम्

शृङ्गेरी-कडूर मैसूर स्टेट

Camp बँगलूर

Date 3 10 61

श्रीमत्परमहंस प्रज्ञानानन्द सरस्वती-स्वामिपादेषु सादरा मनोतिका विज्ञप्ति ।

भवद्भि समर्पितश्रद्धा लिखित विज्ञप्तिपत्रमस्मद्धस्तगत प्राप्त, यथावसर श्रीगुरुचरणारविन्दयो निवेदित च। तैत्तिरीयकसंध्यानिषये ऋष्यादिस्मरणं उच्चारणसहितं कर्तव्यं वा नवेति संशये निर्णयः श्रीचरणैराज्ञापितः इत्थं वर्तते।

तैत्तिरीयकैः ऋष्यादिकं मंत्रादौ वक्तव्यमेव तत्र प्रमाणं तु निरुक्त भाष्योदाहृत ब्राह्मणवाक्यम्, यो ह वा अविदितार्षेयच्छन्दो दैवतब्राह्मणेन मन्त्रेण याजयति वाध्यापयति वा, स्थाणु वर्च्छति गर्तं वा पात्यते प्रमीयते वा पापीयान् भवति इति अथर्ववेदे च गणक ऋषि निचृद्गायत्रीछन्दः, गणपतिर्देवता इति वचन, पारिजाते 'आर्षं छन्दो दैवत च विनियोगस्तथैव च। वेदितव्य प्रयत्नेन ब्राह्मणेन विपश्चिता' इति वचन एवमेतादृशानि बहूनि सर्वशाखिभिरपि ऋष्यादिक वक्तव्यमेवेति प्रतिपादयन्ति तैत्तिरीय भेद वाक्य तैत्तिरीयैर्न वक्तव्यमिति न प्रतिपादयति न स्पष्ट तैत्तिरीयाणा नारायणोपनिषदि ऋष्यादिक स्मर्यते। ओमित्येकाक्षर ब्रह्म। अग्निर्देवता ब्रह्म इत्यार्षम्। इति, तथा गायत्रिया गायत्रीच्छन्दो विश्वामित्र ऋषिः

सविता देवता इत्यादिना ऋष्यादिस्मरणम् । आपस्तम्ब गृह्यसूत्रभाष्ये सुदर्शनकृते पूर्वोदाहृत छान्दोग्यब्राह्मणवाक्यमेवोदाहृत्य ऋष्यादिस्मरणमावश्यकमिति प्रतिपादितम् ।

**वक्तव्य छन्द आदौ तु ततश्चर्षिः प्रकीर्तितः। देवता विनियोगश्च तैत्तिरीयकपाठकैरिति स्मृतौ,** तैत्तिरीयैरपि अवश्य ऋष्यादिस्मरण विहितमस्ति । भट्टभास्करकृते रुद्रभाष्ये मन्त्रभेद विना पाठे अग्नि काण्डर्षि महाविराट्छन्द शम्भुर्देवता इति वक्तव्यमिति उक्तम्, मन्त्रभेदपक्षे च ऋष्यादय भिन्नाभिन्ना उक्ता इदानींतनसाम्प्रदायेऽपि अस्य रुद्रस्य प्रश्नस्येत्यारभ्य द्वे जगत्यौ इति पर्यंत ऋष्यादिक पठ्यते इति त्रिशङ्कोर्वेदानुवचनम् इति शिक्षावल्ली मन्त्रस्य शाङ्करभाष्ये ऋषिस्मरण कर्तव्यमित्येतत्सूचनार्थं त्रिशङ्कोर्नामग्रहणमिति उक्तम् ' नच स्मरेदपि छन्द श्राद्धे वैतानिके मखे । ब्रह्मयज्ञे तथा तद्वदोंकार तु विवर्जयेदिति वचनेन कदाचित् ऋष्यादिस्मरण प्रतिषिध्यते तथा तैत्तिरीयाणामृष्यादि वदन प्रातिषेधक वचन नोपलभ्यते, तद्वदत्र प्रायश्चित्तबोधक वा वचन समस्ति, अत **तैत्तिरीयैरपि ऋष्यादिस्मरणं उच्चारणपूर्वकं कर्तव्यमेव प्रामादिकमेवास्मरणमृष्यादीनाम्** इति शम् ।

| | |
|---|---|
| C/o N लक्ष्मीनारायण शास्त्री<br>प्रायव्हेट सेक्रेटरी श्रीमज्जगद्गुरु<br>श्री शृंगरी मठ शृंगेरी-कडूर | के. शामभट्ट<br>आस्थानपण्डित<br>शृंगगिरिजगद्गुरु संस्थानम् । |

नकल संपूर्ण

**वेदपठन-अध्यापन व कर्म मंत्रार्थज्ञानासहितच केलें पाहिजे**

अनुष्ठानमर्थावबोधपूर्वकमाचरणीयम् । तथा सति महाफल भवति नेतरथा। अत एव छान्दोग्ये श्रूयते 'यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तर भवति ' इति । विद्या सम्यगर्थज्ञानम् । श्रद्धाऽऽस्तिक्यबुद्धि । अर्थज्ञाने सति समग्र फल भवति इत्याशयेन वीर्यवत्तरमित्युक्तम् ।

**निरुक्तेऽपि**- स्थाणुरय भारहार किलाभूदधीत्य वेद यो न विजानात्यर्थम् योऽर्थज्ञ इत्सकल भद्रमश्नुत नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ' इति ।

## अर्थविहीनपठनम्

**स्मृत्यन्तरे–** यदधीतविज्ञात निगदेनैव शब्द्यते। अनग्नाविव शुष्केधो न तज्ज्वलति कर्हिचित्।

**लघुव्यासोऽपि–** वेदस्याध्ययन सर्वे धर्मशास्त्रस्य चापि यत्। अजानतोऽर्थं **तत्सर्वं तुषाणां कण्डनं यथा।'** तुषखण्डनवद्वृथा प्रयास एव इत्यर्थ

यथा पशुर्भारहारी न तस्य भजते फलम्। द्विजस्तथाऽर्थाऽनाभिज्ञो **न वेदफलमश्नुते'।** वैदिककर्मफलभाग न भवति। अत एव **व्यास-** ज्ञात्वा ज्ञात्वा च कर्माणि जनो यो योऽनुतिष्ठति। विदुष कर्मसिद्धि स्यात् तथा नाऽविदुषो भवेत् ॥' अत एव तेषा पूजनमपि न कार्यमिति स एवाह–

पाठमात्ररतान् वेदे द्विजातींश्चाऽर्थवर्जितान्। पशूनिव न तान् प्राज्ञो वाङ्मात्रेणाऽपि पूजयेत् ॥' **अर्थज्ञानसंपन्नस्य फलमाह मनु-** वेदशास्त्राऽर्थतत्त्वज्ञो यत्र यत्राश्रमे वसेत्। इहैव लोके तिष्ठन् स **ब्रह्मभूयाय कल्पते ॥' हारीतोऽपि** 'मन्त्रार्थज्ञो जपन् जुह्वन् तथैवाऽध्यापयन् द्विज। अधीत्य यत्किंचिदपि वेदार्थाधिगमे रत। ब्रह्मलोकमवाप्नोति **धर्मानुष्ठानतो द्विजः ॥**

न वेदपाठमात्रेण सन्तुष्ट स्याद् द्विजोत्तम। पाठमात्राऽवसायी तु पङ्के **गौरिव सीदति ॥**

**योऽधीत्य विधिवद् विप्रो वेदार्थं न विचारयेत्।** स सान्वय- शूद्रवत् पात्रता न प्रपद्यते ॥

तस्मादकरणे प्रत्यवायश्रवणात् करणेचाऽभ्युदयश्रवणाद् अर्थज्ञानमावश्यकमिति सिद्धम् ॥ इति (श्रीकृष्णपण्डितविरचितसन्ध्याभाष्ये. अधिकविस्तरस्तत्रैव द्रष्टव्य )

वरील श्रुति-निरुक्त स्मृत्यादि वचनांचें सार इतकेंच की वेदाचें पठन अर्थज्ञानासह न करणें हा मोठा दोष आहे, तसा न करण्याबद्दलच तो आहे, आणि अर्थासह वेदपठन करणें अभ्युदयकारक आहे. यास्तवच या दोहींना अर्थासह वेदपठन करून धर्मानुष्ठान केल्यानें अभ्युदयाची प्राप्ति होते. म्हणून निदान नित्य कर्मांतील मंत्रांचा अर्थ तरी जाणणें आवश्यक

आहे. त्या मंत्रांचा उच्चार अर्थाकडे लक्ष देऊन केल्यास द्विजाला-ब्राह्मणाला **अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति सहज होईल अशी खात्री वाटते.** 'स्मृतिमुक्ताफल' ग्रंथांतहि वरील प्रमाणेंच ऋष्यादींची आवश्यकता सांगितली आहे.

**सूचनाः**—या दोन्ही उताऱ्यांतील वैशिष्ट्य मोठ्या अक्षरांनीं दाखविलें आहे.

**अग्निपुराणांतील माहितीचा छंदोनिर्णय करण्यांत कसा उपयोग** झाला याचीं एकदोन उदाहरणें देणें जरूर आहे.

**उदा० १** –' सर्ववर्णे ... सरस्वति ' या १६ अक्षरी (८+८) मंत्राचा छंद सं. र. मा. ग्रंथांत द्विपदा गायत्री दिला आहे; पण '**द्विपाद सूर्यवस्वर्णैः**' ( अग्नि पु. ) असें द्विपदा गायत्रीचें लक्षण आहे. सूर्य = १२ + वसु = ८ अर्णैं = अक्षरांनीं द्विपदा गायत्री छंद होतो; म्हणून द्विपदा गायत्री म्हणणें चुकीचें ठरतें. ८।८ अक्षराच्या तीन चरणांचा त्रिपदा गायत्री छंद प्रसिद्ध आहे; त्यामुळें ८।८ च्या दोन चरणाना द्विपदा गायत्री हें नाव तर्कानें दिलें गेलें. ८।८ अक्षराच्या चार चरणाचा मुख्य अनुष्टुप् छंद होतो, म्हणून '**द्विपाद अनुष्टुप्**' छंद ठरला. त्याला प्राजापत्य-अनुष्टुप् असें ऋक्प्रातिशाख्यात पटल १७ मध्यें म्हटलें आहे.

**उदा० २ रें** –' मद्रं नो अपिवातय मनः ' याचा 'एकपदा विराट्' असा उल्लेख सूत्रविवरणात आहे. एकचरणाचा विराट् छंद म्हटल्यानें पूर्ण बोध होत नाहीं. 'न्यूनाधिकेन एकेन' (अक्षरेण) '**निचृद्-भुरिजौ**,' आणि '**द्वाभ्यां विराट्स्वराजौ**' अशीं पिंगलसूत्रें आहेत. एक अक्षर कमी असल्यास त्या छंदास निचृद् हें उपपद लागतें एक अक्षर जास्त असेल तर त्यास भुरिक् उपपद लावावें. दोन कमी असतील तर विराट् व दोन जास्त असतील तर स्वराट् लावावें. येथें १० अक्षरें असून एकपदा विराट् म्हटलें आहे; म्हणजे त्या छंदाच्या एका चरणांत १२ अक्षरें असतात त्याना हा एक पाद आहे. म्हणून **हा एकपदा विराट्जगती छंद** आहे; कारण '**जगत्याः आदित्याः पादः**' (अग्नि. पु ) आदित्य म्हणजे १२, जगती छंदाचा प्रत्येक पाद बारा अक्षराचा असतो. पिंगलसूत्रहि हेंच ठरवितें.

अशा प्रकारेंच तैत्तिरीय मंत्राच्या व इतर मंत्राच्या छंदादिकांचा निर्णय केला आहे. निवेदनांत इतकीं उदाहरणें पुरेत.

**मन्त्राचे अर्थ व लेखनपद्धतिः—** मंत्राचे अर्थ, खंडराजदीक्षितकृत भाष्य, बह्वृचसंध्यापद्धति भाष्य, भट्टोजी दीक्षितकृत भाष्य ( त्यांचीं द्वैती मतें सोडून) आणि श्रीकृष्णपंडितकृत भाष्य यांच्या समन्वयानें दिले आहेत. कोणत्या शब्दाचा कोणता अर्थ हें न दाखविता नुसता सरळ अर्थ देण्यानें मंत्र म्हणतां म्हणतांच सहज अर्थ ध्यानांत येणें सुसंस्कृत पदवीधरासमुद्धा जमणार नाहीं, व दिलेल्या अर्थाचा फारसा उपयोग होणार नाहीं. फक्त अर्थ देणें हें सदर भरलें जाईल, म्हणून भाष्य पद्धतीनें मंत्रांतील शब्द ( अन्वय क्रमानें ) कंसांत देऊन त्यापुढें त्या शब्दाचा सामान्य व विशेष अर्थ दिला आहे. मंत्र म्हणत असतांच अर्थ समजल्यानें भावना उद्दीपित होणें सोपें होईल, अर्थ आणि त्या अर्थानुसार भावना असल्या म्हणजे त्या मंत्रानें होणारा लाभ पूर्णपणें होतो, हें लेडबिटर यांनींहि सांगितलें आहे. 'निर्णयसागर पोथ्यांत छापले आहेत त्याप्रमाणें शब्द वाक्य तेथें न तोडतां, एका मोठ्या समासासारखे मंत्राचे दोन चरण छापणें, छपाईच्या दृष्टीनें सोईचें असलें तरी मंत्र म्हणतांना कुठें थांबावें हें न कळल्यानें पूर्वी दिलेल्या उदाहरणाप्रमाणें वाटेल तिथें शब्द तोडले जातात, म्हणून भाष्य पद्धतीनें शास्त्र तिथें शब्द तोडून मंत्र दिले आहेत. उदा० '**आपोहिष्ठामयोभुवस्तानऊर्जेदधातन**' असें न देता '**आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन**' असे दिले आहेत.

कोणी म्हणतील कीं ग्रंथाचा विस्तार कशाला केला? कोणी म्हणतील कीं आणखी अनुभव दिले असते तर बरें झालें असतें, एकदाच सन्ध्या करणारांची संख्या दिवसेंदिवस कमी होत चालली असतां, त्रिकाल संध्या, अनेक न्यास, मुद्रा इतकें कशाला असें कोणी म्हणतील. त्या स्मृति-पुराणकार ऋषिमहर्षीनीं, कल्पिप्रभावाचें आधींच वर्णन करून ठेवलें आहे त्यांना या लेखकापेक्षां पुष्कळच जास्त अक्कल होती. त्यांनीं केलें म्हणून व शास्त्रविरुद्ध, निराधार, छाटाछाट करणें अधर्मकर या नात्यानें मदाच असल्यानें आणि 'न बुद्धिभेदं जनयेत्' अशी भगवताची आज्ञा असल्यानें वर्मीत कमी जितकें भाग पडलें तितकेंच दिलें आहे. ग्रंथ वाचणाऱ्या

प्रत्येकानें याप्रमाणें सर्व केलें नाहीं, तरी अशी खात्री वाटते कीं पक्षाभिमानरहित हृदयानें सांप्रदायिक व परंपरागत वृथाभिमान सोडून, या ग्रंथाच्या पूर्वार्धाचें जे कोणी पठण मनन करतील त्यांतील बरेच संध्या न करणारे द्विज, संध्या करूं लागतील !

कोणी म्हणतील कीं संन्याशानीं गायत्रीमंत्राचा त्याग केलेला असतां गायत्रीमंत्र व संध्या यांविषयीं पुस्तक लिहिणें अधर्म नव्हे काय? पैसे घेऊन लिहिलें असतें तर घोर पातक ठरलें असतें, कारण **संन्याशांना पैसे, नोटा सोनें इ. देणारेसुद्धां नरकांत जातात** अशा अर्थाचीं श्रुतिस्मृतिवचनें आहेत श्रीमदाद्य-शंकराचार्यांनीं 'गायत्रीभाष्य' लिहिलें आहे, त्यांनीं जर तो अधर्म केला असेल तर यानें केलेला दोषार्ह नाहीं

**संध्याविस्तार**– संध्येंतील कर्मांचा कमींत कमी विस्तार करणें हें ध्येय लेखनांत ठेवलें गेल्यानें व स्वतःच्या शास्त्राधाररहित इच्छेचा संबंध मुळींच न येऊं देणें इष्ट असल्यानें, अनेक स्मृतिपुराणादि ग्रंथाचें अव-लोकन करावें लागलें त्याच्या मथनानें जें जेवढें आवश्यक ठरलें, तेवढेंच प्रयोगांत दिलें आहे आचमन व प्राणायाम आणि ऋग्वेदी संध्येंतील मार्जनें यांत कमी करण्यास एकहि आधार सांपडला नाहीं, पण तैत्तिरीय संध्येंतील दुसऱ्या मार्जनांतील 'पवमान सुवर्जन' या १७ मंत्राच्या अनुवाकाचा भट्टोजी दीक्षित व श्रीकृष्णपंडित यांच्या भाष्यामध्यें व स्मृतींत नुसता उल्लेखसुद्धां सांपडला नाहीं, म्हणून ते १७ मंत्र गाळले आहेत, ज्यांची इच्छा असेल त्यांच्यासाठीं छापील पोथ्यांत व कांहीं जुन्या पुस्तकांत ते आहेत यजुर्वेदी संध्येचा प्रयोग भा आ सू यांतील संक्षिप्त संध्येवरून घेतला आहे, पण त्यांतील 'विष्णुर्विष्णु । वाग्वाक्' इत्यादींनीं करावयाच्या कर्मांस स्मृत्यादिकांत आधार सांपडला नाहीं, म्हणून तेवढेंच घेतलें नाहीं त्याचा संक्षिप्त प्रयोग मूळांतच सुटसुटीत आहे

अर्घ्यदानांत थोडी भर घालावी लागली कारण, अस्त्रोपसंहरण अनेक स्मृतींत, देवी भागवतांत व बऱ्याच संध्याभाष्यांत सहेतुक आढळलें व आश्वलायन वचनहि (स र भा पृ २२६) त्याच अर्थाचें आढळलें म्हणून घ्यावें लागलें, मात्र तो मंत्र देतांना मध्वाचार्य भाष्यादींत दिलेले मोठे

व संध्याप्रयोगात सहसा नसलेले मंत्र न घेता, अगदीं छोटा व संध्येंतीलच मंत्र 'गायत्रीशिरोमंत्र' घेतला ते ग्रंथकार म्हणतात कीं, अर्घ्य देणें म्हणजे मंदेह राक्षसाच्या वधासाठीं गायत्री अस्त्र फेकणें–सोडणें–आहे सोडलेलें अस्त्र कार्य करून परत यावें म्हणून अस्त्रोपसंहार मंत्राचा उपयोग करावाच लागतो महाभारतातील युद्धवर्णनावरूनहि हाच सिद्धांत ठरतो, म्हणून तो विधि दिला आहे

**न्यास व मुद्रा**–कोणी म्हणतील कीं अनेक न्यास व मुद्रा का दिल्या? बृह पारा (कलौ पाराशरस्मृतिः), दे भा , गुरु चरित्र व इतर काहीं स्मृतींत तर २४ अक्षरांचे ऋषि, छंद, वर्ण ( रूप ) शक्ति, कला व न्यासाचें फल, याचा मुद्रा अन्तर्भाव केला आहे, पण तें वर्णन अग्निपु०, मत्स. पु०, पद्म पु० यांतील संध्यावर्णनात नाहीं या सर्व ग्रंथात जें सामान्य आहे तेवढेंच घेतलें आहे वर्णदेवतांच्या नांवात थोडे थोडे भेद आढळले आणि वर्णांच्या तत्त्वांच्या उल्लेखात काहीं प्रमाद व विस्कळीतपणा आहे, पण पद्मपुराण व अग्नि पुराणातील वर्णन अगदीं सारखें व निर्दोष आढळलें म्हणून तेंच घेतलें

**गायत्रीचें ध्यान व आवाहन**–पंचमुखी गायत्रीचें ध्यान मुख्य आहे तीन संध्यातील गायत्री–ब्रह्माणी, सावित्री–रुद्राणी, आणि सरस्वती–वैष्णवी, हीं तिचींच तीन भिन्न स्वरूपें आहेत ध्यान व आवाहन प्रकरण पहावें आवाहनाचे 'आयातु वरदा देवी' वगैरे तैत्तिरीय मंत्र, दोन ऋग्वेदी संध्याभाष्यात आहेत एकांत नाहींत, त्यात फक्त 'आगच्छ वरदे देवि' हाच आहे प्रयोगात दोन्ही दिले आहेत इच्छेनुसार करावें तैत्तिरीय संध्याभाष्यात दोन प्रकार आढळले पहिले आचमन, प्राणायाम झाल्याबरोबर, संकल्पाच्या आधीं आवाहन आहे हें योग्य वाटत नाहीं, कारण एकाद्या देवतेला बोलावून तिची पूजा ध्यान–जप न करता–साधकानें मार्जनें, मंत्राचमन, व अर्घ्य देणें हाईपर्यंत तिला तिष्ठत ठेवणें म्हणजे देवीचा अनादर करणेंच। आवाहन केल्याबरोबर देव–देवता येतात व योग्य साधकास उघड्या डोळ्यांनी किंवा मिटलेल्या डोळ्यांनी दिसतातहि। ज्या भाष्यकारांनीं आधीं दिलें आहे त्यांचें नांवहि त्यांत नाहीं व प्रकाशकांत छापलेलें नाहीं। उदा, भट्टोजी दीक्षितांसारख्या

सुप्रसिद्ध धर्मशास्त्रज्ञ पंडितानीं व हरिभक्तानीं व श्रीकृष्णपंडितानीं आपल्या भाष्यात आवाहन, अर्घ्यदानप्रदक्षिणेनंतरच दिलें आहे स र मालेंत गोपीनाथभट्टानींहि तसेंच दिलें आहे यजुर्वेदी सध्येंत सुद्धा तें प्रारभीं नाहीं म्हणून अर्घ्य न प्रदक्षिणा झाल्यावरच आवाहन करणें योग्य असलें, तरी या लेखकाचा कोणताच दुराग्रह नाहीं. ' येनेष्ट तेन गम्यताम् ' ' ध्यातस्य पूजा कुर्वीत ' असा नियम असल्यानें आणि ग्रथकारानीं नित्य सध्येंत पचोपचार-मानसपूजाच सागितली असल्यानें त्या पूजेचा अगदीं त्राटक विधि दिला आहे, कारण मानसपूजेनें चित्ताची एकाग्रता लवकर साधते, बाह्य पूजेनें ऐश्वर्यप्राप्ति होते वाटल्यास फोटोची पचोपचार पूजा करावी मुद्राविषयीं विशेष ' न्यास व मुद्रा ' प्रकरणात पहावें

पचमुखी गायत्रीच्या वर्णनात वरमुद्रा व अभयमुद्रा आहेत मत्रमहार्णवात याचीं लक्षणें मिळालीं तीं –' अध कृतो दक्षहस्त प्रसृतो वरमुद्रिका ॥ ऊर्ध्वीकृतो वामहस्त प्रसृतोऽभयमुद्रिका ॥' परन्तु बाजारात मिळणाऱ्या गायत्रीच्या चित्रात या दोन मुद्रा अगदीं उलट दाखविलेल्या आहेत देवताच्या विविध चित्रात मुद्रा वरील लक्षणाच्या विरुद्धच बहुधा आढळतात महर्षि सातवळेकरास विचारलें कीं, वरील लक्षणाविरुद्ध काहीं आधार आहे काय? त्याचें २३।१२।६२ चें पत्र आलें कीं, देवताचीं प्रचलित चित्रें शुद्ध नसावींत चित्रकाराचाहि दोष असेल, नक्की सागवत नाहीं आपलें सशोधन फारच महत्त्वाचें आहे. आपणास परमेश्वर यात यशस्वी करो हीच इच्छा आहे ' गायत्रीच्या वर्णनात मत्रमहार्णवातील लक्षणाप्रमाणें मुद्रा दिल्या आहेत. म म गोपीनाथशास्त्री कविराज M A D Litt यासहि याविषयीं २१।१।६२ रोजीं पत्रानें विचारलें आहे

**शापविमोचन–** तात्रिकाच्या नसलेल्या अनेक ग्रथात शापविमोचन–आवश्यक म्हणून सागितलें आहे अनेकानीं मोठे मोठे चार मत्र दिले आहेत कोणी एकच मत्र सागितला आणि देवीभागवतात न्यासादिकाचा खूप विस्तार केला असून शाप देणाराचें स्मरणच शापविमोचनास सागितलें आहे, म्हणून तेवढेंच दिलें आहे गायत्रीला ब्रह्मा, विश्वामित्र, वसिष्ठ आणि वरुण या चौघाचे शाप आहेत

**उपस्थान**–बृ पारा , अग्नि पु , ब्रह्म पु , कूर्म पु , पद्म पु , देवीभागवत इत्यादि ग्रंथात व ऋग्वेदी दोन भाष्यें यात दिलेली उपस्थान मंत्राची संख्या आणि प्रचलित पोथ्यातील संख्या यात फार मोठा फरक आहे बृ पारा व देवी भाग यात न्यासादिकाचा खूप विस्तार केला असून उपस्थानाचे मंत्र ३।४ पेक्षा जास्त नाहींत बौधायनानीं सायं उपस्थानात 'इमं मे वरुण०' 'तत्वा यामि इति द्वाभ्यामेव' प्रात संध्येंत 'मित्रस्य चर्षणीधृतो०' 'मित्रो जनान् यातयति प्रजानन्०' इति द्वाभ्याम्' असें म्हटलें आहे व याप्रमाणेंच इतर ग्रंथात २।३ किंवा क्वचित् चार मंत्रच आवश्यक सांगितले आहेत, मात्र सर्वांनीं तेच तेच मंत्र सांगितलेले नाहींत. बह्वृच संध्याभाष्यात तर 'जातवेदसे०' 'तच्छंयोरावृणीमहे' आणि 'नमो ब्रह्मणे' हे तीनच सांगितले असून, मध्यान्ह व सायंसंध्या-वैशिष्ट्य सांगण्यात फक्त मंत्राचमनाचे निराळे मंत्र दिले आहेत आणि 'शेष प्राग्वत्' बाकी सर्व पूर्वी प्रमाणें, म्हणजे प्रात संध्ये-प्रमाणें असें म्हटलें आहे सायंसंध्येंतील उपस्थानमंत्र वरुण देवतेचे आहेत, त्यामुळें काहीं पोथ्यात 'वरुणोपस्थाने विनियोग' असें दिलें आहे, पण तें श्रुतिविरोधी असल्यानें त्याज्य आहे सायं उपस्थान रात्रींच करावयाचें असतें, सूर्यास्तसमयीं अर्घ्य व नंतर तीन घटका जप व नंतर उपस्थान करावयाचें असतें (यजुर्वेदी संध्येंत अर्घ्य दानानंतर लगेच उपस्थान आहे, व नंतर जप )

श्रुति अशी आहे- 'वारुणीभिरादित्यमुपस्थाय प्रदक्षिणम्' (संध्याभाष्य समुच्चय पृ १४२) तैत्तिरीय संध्याभाष्यात ऊहापोह करून हा सिद्धान्त सांगितलेला असता, तैत्तिरीय संध्येच्या पोथ्यात व पुस्तकात सुद्धा 'वरुणोपस्थाने विनियोग' असें म्हटलें आहे! निर्णयसागर ऋग्वेदी संध्या वर्णनात सुद्धा तीच चूक यजुर्वेदी त्रिकाल संध्येंत उपस्थानमंत्र सूर्यदेवतेचेच आहेत, त्यामुळें तेथें हा प्रश्न उत्पन्न होत नाहीं

**सूचना**–उपस्थानात अधिक मंत्र म्हणू नयेत असा निषेध मात्र नाहीं सौरसूक्त वगैरे सुद्धा वाटल्यास म्हणावीं

केशवादि चोवीस नावाचें विविध अर्थ देऊन त्या नावाचा परस्पर समन्वय काय हेंहि सिद्ध केलें आहे आणि 'अङ्गुष्ठाभ्यां तु गोविन्द तर्जन्या तु महीधरम्' या करन्यासातील गोविन्दादि नावें व अङ्गुष्ठादि

त्यानें याचा संबंध काय हेंहि सहज स्फुरलेलें पूर्वार्धांतील प्रकरणांत दाखविलें आहे.

ओंकार व त्याचे 'प्रणव' इत्यादि पर्याय आणि सात व्याहृती याचे विविध अर्थ आणखी एका प्रकरणात दाखविले आहेत, अर्थदृष्ट्या सात व्याहृतींचा पूर्वापार संबंध दाखविला आहे.

त्रैवर्णिक असून मुंज न झाल्यामुळें जे 'व्रात्य' झाले त्याना श्री. सवित्याची व गायत्रीची उपासना वेदमंत्रानीं करता येत नाहीं; म्हणून त्याच्यासाठीं सूर्योपनिषदाचा पद्यानुवाद आणि गायत्रीस्तोत्र व गायत्रीची आरती पूर्वीच लिहिली गेलेली आणि काहीं इतर सूर्य स्तोत्रें, गायत्री कवच इत्यादि पौराणिक स्तोत्रें एका प्रकरणात दिलीं आहेत, ब्राह्मणेतरानींहि यथाधिकार त्याचा उपयोग करावा.

**गायत्री विसर्जन**- जेथें आवाहन केलें असेल त्या धर्माच्या अंतीं आवाहित देवतांचें विसर्जन केलेंच पाहिजे; अन्यथा 'मंत्राधीनं तु दैवतम्' असल्यानें आलेले देव, देवता जात नाहींत. का जात नाहीं म्हणून विचारल्यावर उत्तरें मिळालीं आहेत कीं, जाण्याची शास्त्रोक्त परवानगी मिळाली नाहीं! परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं ऋग्वेदी पोथ्यातील वैश्वदेवरूपी देवयज्ञाच्या प्रयोगात अग्नीचें आवाहन दिलेलें असून विसर्जन नाहीं, इतर कोणत्याहि यज्ञात, होमात अग्नीचें पूजनादि झाल्यावर 'गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ०' या मंत्रानें विसर्जन करतात; यजुर्वेदी पुस्तकात आहे. ऋग्वेदी वैश्वदेवात का नको याचा उलगडा शास्त्रज्ञानीं करणें व तो जाहीर करणें एक महत्त्वाचें कर्तव्य आहे.

सूचनाः- शास्त्रकारानीं जे निषेध वर्णिलेले असतील ते देणें हें धर्मशास्त्राशीं संबंधित ग्रंथ लिहिणाराचें कर्तव्य असल्यानें विधींच्या बरोबर निषेधहि द्यावे लागले. तसेंच शास्त्रविहित नित्यकर्म न करण्याचें फळ, परिणाम सांगणेंहि कर्तव्य म्हणूनच करावें लागतें. विधींचें पालन व निषेधाचा त्याग करणें म्हणजेच धर्माचें पालन करणें होय. शास्त्रकारानीं किंवा संतानीं प्रथम जी निंदा केलेली असते ती निंद्याची निंदा करण्यासाठीं नसून स्तुत्याची स्तुति करण्यासाठीं असते. श्रीज्ञानेश्वर महाराज श्रीज्ञानदेवींत म्हणतात कीं,

तैसा अरोपार्था। जो गोसावी हो म्हणे पार्था। तेणें श्रुति-स्मृती माथा। वैसो धापे॥ शास्त्र म्हणेल सांडावें। तें राज्यहि तृण मानावें। जें घेववि ते न मनावें। विषही विहं॥ ऐसी वैदिक निष्ठा। जालेया सुभटा। तरि कें आहे अनिष्टा। भेटवि गा॥ [अ १६।१४] 'शास्त्र म्हणेल सांडावें' यात निषेधाचा त्यागच सांगितला व 'जें घेववि तें न मनावें। विषहि विहं' कांहीं झालें तरी विधीचें पालन केल्याशिवाय राहू नये हेंच सांगितलें आणि, या दोन गोष्टी करणें म्हणजेच शास्त्राप्रमाणें वागणें हें श्रीज्ञानदेवाच्या शब्दांनीहि सिद्ध झालें.

अमुक धर्म न करील तो ब्राह्मण नव्हे, तो शूद्र, मुसलमान, इत्यादि वचनाचा भावार्थ इतकाच की तो नावाचा, नुसता जन्मजातीनें, ब्राह्मण होय अमुक न केल्यास अमुक निष्फळ, असें जेथें म्हटलें जातें तेथें भाव इतकाच असतो कीं, त्या धर्मांचें यथोक्त फळ त्याला मिळत नाहीं. पण कांहीं कर्में व्यवहारात सुद्धा अशीं असतात कीं, योग्य वाळीं न केल्यास किंवा शास्त्रोक्त पद्धतीनें न केल्यास पूर्ण निष्फळ। किंवा कांहीं प्रसंगीं विपरीत फळ मिळतें. 'A Doctor after death' (कोणी मेल्या-वर डॉक्टरना बोलावणें) 'बैल गेला झोपा केला' वगैरे म्हणी हेंच दाखवितात वायूचें मिश्रण करून जल तयार करणें असेल तर ($H^2o$) हायड्रोजन दोन भाग व आक्सिजन एक भाग या प्रमाणांतच मिश्रण घेतलें पाहिजे, नाहींतर ते पदार्थ नष्ट व वाळ पूर्णपणें निष्फळच ठरणार वरील प्रमाणात मिश्रण न करता, जल तयार करण्याच्या हेतूनें कोणी हायड्रोजन २ भाग, गंधक १ भाग व आक्सिजन प्राणवायु ४ भाग मिश्रित करील व त्यात चोट घुसवील तर तें भाजेल, कारण जल न होता त्या मिश्रणानें तें गंधकाम्ल सल्फ्युरिक ॲसिड तयार होईल फटाके तयार करतांना स्फोट होऊन माणसें भाजून मरतात व घरें उध्वस्त होतात तीं अज्ञान अशास्त्रीय पद्धतीनें क्रिया केल्यामुळें! भक्तशिरोमणि तुकोबा व नामदेवराज इत्यादि संतांनीं शास्त्रीय मत व नियम स्पष्ट ठेवले नाहींत, पण अशी कठोर भाषेंत फटके मारले आहेत तुकोबाचा एकच अभंग उदाहरणार्थ पुरेल —

ऐसे संत झाले कलीं । तोंडीं तमागूची नळी ॥
भांग भुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ॥
तुका म्हणे ऐशा नरां । मोजुन माराव्या पैंजारा (जोडे, वहाणा)

यात निषेधाचा त्याग न करण्याबद्दल जोडे मारले आहेत नाथ म्हणतात 'मुक्तपणें मोला चढले । ते वनिताअधरीं फाशीं पडले । कुश्चिळ रसें लिडबडले । वगैरे यात स्वातीच्या जलानें होणाऱ्या मोत्याची दुर्दशा वर्णन करून मी मुक्त झालो' असें समजून जे प्रतिष्ठाप्रिय होतात त्याचा अधःपात किती व कसा होतो हें दाखविलें आहे अर्थ अधिक स्पष्ट करण्यास मन व लेखणी धजत नाहींत, इतके पुरें या पुस्तकात मात्र अशा प्रकारचीं वचनें नाहींत

लक्षात ठेवावें कीं संध्या, जप वगैरेंचें जें फळ शास्त्रवचनानीं वर्णिलें आहे, किंवा लेडबीटर सारख्याना दिसलें आहे, तें सर्वांना सारखेंच मिळेल असें नाहीं. निषेधाचा त्याग ज्या प्रमाणात होईल, श्रद्धा व भावना जितक्या शुद्ध व उच्च असतील व यमनियमाचें ज्या प्रमाणात पालन केलें जाईल त्या प्रमाणात पूर्वसंस्कारानुरूप, व संगति आणि व्यवसाय याना अनुसरून कमी अधिक प्रमाणात फल मिळेल थोडक्यात सार हें की चित्तशुद्धि ज्या प्रमाणात झाली असेल त्या प्रमाणात कमी अधिक काळानें परिणाम दिसतील गळलेला नारळ (सुरुङ्ग) लावल्यास तो उगवण्यास ६ महिने लागतात, तर मेथी, भेंड्या याचें बी तिसऱ्या दिवशीं उगवतें, धणे उगवण्यास सुमारें २० दिवस लागतात, पण मर्थीच्या बाजास हरभऱ्याच्या खाटेचीं (आवरीं) २१ पुटें सावलींत देऊन ती मेथी पेरल्यास दहा दिवसात वीतभर वाढते! त्याप्रमाणेंच पूर्वसंस्काराचीं व येथें सुसंगतीचीं पुटें चित्तावर जितकीं जास्त बसलीं असतील आणि कुसंगतीची झळ त्याना लागली नसेल, त्याना त्या प्रमाणात लवकर व चागले अनुभव येतील आता लेडबीटर यानी जें पाहिलें व त्यावरून त्यानीं जो सिद्धान्त ठरविला तो देऊन या प्रकरणाच्या समाप्तीकडे वळू या

लेडबीटर म्हणतात कीं मनुष्याची आध्यात्मिक उन्नति जितकी जास्त झाली असेल तितके त्यानें उच्चारलेल्या मत्राचे परिणाम अधिक

होतात त्याच्या जडदेहाच्या भोंवतीं असणारें तैजस देहाचें वलय (आरॉ) वाढतें. तें कित्येक यार्ड व्यासाचें होतें,' म्हणूनच भागवतात म्हटलें आहे कीं, जलमय तीर्थे व मृत्तिकापाषाणमय देवता दीर्घकाळानें पावन करतात, पण साधुसमागम तत्काळ पावन करतो साधूचें तेजोवलय फारच विस्तीर्ण असतें, त्या वलयात येणाऱ्या व्यक्तींवर त्याच्या सत्काराचा परिणाम कमी अधिक प्रमाणात झाल्याशिवाय राहत नाहीं मच्छी-बाजारात, बोंबिलाच्या बाजारात पसरलेला दुर्गंध दिसत नसला आणि अत्तराच्या पेठेंत पसरलेला सुगंध जरी दिसला नाहीं, आणि नाक धरून जरी गेलात तरी ते दुर्गंध व सुगंध मिळतातच तसेंच सतसंगति व सुसंस्कार याचें आहे

ज्या वेदमंत्राची प्रशंसा लेडबीटर, ॲनी बेझंट यांच्या सारख्या व्यक्ती मुक्त कंठानें करतात, ज्या वेदाचें पठण अर्थज्ञानपूर्वक होण्याची लालसा पाश्चात्य खिस्ती राष्ट्रांना होत आहे व ती इतकी वाढली आहे कीं इंग्लिश भाषेंत अर्थ सागून वेद शिकविणारे चाळीस वैदिक पाहिजेत, अशा जाहिराती प्रसिद्ध झाल्या आहेत, त्या वेदाविषयी व सर्व वेदाचें सारसर्वस्व असलेल्या, वेदमाता, वेदोपास्या गायत्री (मंत्र) विषयीं ब्राह्मण समाजात तरी किती आस्था आहे, व सार्थ वेद निदान सार्थ संध्या शिकण्याची कितींना तळमळ आहे, याचा विचार निदान सुशिक्षितांनीं तरी करावयास नको काय?

वेळ मिळत नाहीं म्हणून संध्या करता न येणारे हजारात १।२ सुद्धा नसतील, तथापि अशानीं वर्मीत कमी किती केलें पाहिजे व नैसर्गिक वगैरे आपत्तींत काय करावें याविषयी 'संध्योपासना' प्रकरणात लिहिलें आहे

श्रुतिस्मृत्यादि अनेक ग्रंथातील जीं वचनें आधारास घेतलीं आहेत तीं सर्व ग्रंथविस्तारभयास्तव या पुस्तकात दिलीं नाहींत, फक्त त्या त्या ग्रंथाची नांवें कंसात दिलीं आहेत तरीपण पुस्तकात प्रत्यक्ष दिलेलीं वचनें व न दिलेलीं वचनें लेखकानें स्वत जवळ चागल्या टिकाऊ तीन ग्रंथामध्यें लिहून ठेवलेलीं आहेत त्या वचनानीं प्रत्येक पृष्ठात १८ ओळी असलेल्या छापील एक्सरसाईज वह्याची २२५ पृष्ठें

भरलेली आहेत त्या प्रत्येक वहींत अनुक्रमणिकाही लिहून ठेवलेली आहे. व्यक्तिश पाहण्यास मिळतील, पोष्टानें पाठविल्या जाणार नाहींत

हा ग्रंथ लिहिण्यात ज्यानीं मदत केली अशा अनेक व्यक्तींपैकीं काहींचा नामनिर्देश करणें आवश्यक आहे

१ ब्रह्मर्षि सातवळेकर, स्वाध्याय मंडळ पारडी, यानीं अत्यंत आस्थेनें व अगदीं उलट टपालीं प्रत्येक वेळीं पत्रानें माहिती कळविली 'सप्तर्षीस्तदपमो०' या मंत्राचें मूळ स्थान व ऋषि, छंद, 'तच्छयोराष्टणीमहे०' याचें स्थान, 'असावादित्यो०' याचे ऋषि, 'सुमित्रिया न आप' याचीं सर्व स्थानें व 'संध्याभाष्यसमुच्चय' आनन्दाश्रम पुणें येथें मिळू शकतें,' ही माहिती ब्रह्मर्षि सातवळेकर याचेकडून मिळाली

२ पुण्याचे वे शा स विनायकशास्त्री पारखी व सांगलीचे वे शा स दत्तभट टिळक याजकडून ऋक्सर्वानुक्रमसूत्रातील उतारे वगैरे माहिती मिळाली, त्याविषयीं पूर्वीं उल्लेख केलाच आहे

३ कल्याण मासिकाचे संपादक श्रीयुत हनुमानप्रसाद पोतदार व त्याच्या कार्यालयातील पंडित श्रीयुत रामनारायण दत्तशास्त्री याच्याकडून काहीं महत्त्वाची माहिती मिळाली

४ श्रीमज्जगद्गुरु शृंगेरी मठातील शास्त्री के रामभट्ट याचेकडून 'स्मृतिमुक्ताफल' ग्रंथातील तैत्तिरीय संध्यातील मंत्राच्या ऋषिछंद देवताचे उतारे मिळाले

५ मुंबईचे श्रीयुत गजाननशास्त्री रानडे व्याकरणाचार्य, वेदान्ताचार्य इत्यादि याजकडून 'ब्रह्म इत्यार्षम्' याविषयीं निर्णय मिळाला

६ नगरचे वे शा स सदाशिवशास्त्री मुळे याजकडून लिहून आलें कीं 'गायत्र्यस्येकपदी०' हा मंत्र जुन्या पोथींत 'परोरजेससावदों मा प्रापत्' इतका आहे

याशिवाय अनेकानीं अनेक प्रकारें साह्य केलें, पण त्याचा नामनिर्देश करणें त्यास दु खद होईल, म्हणून एवढेंच सांगावेसें वाटतें कीं, प्रभु त्याच्यावर कृपा करतील ज्यानीं टाळाटाळ केली किंवा चुकीची माहिती कळविली त्याचेंहि प्रभु कल्याण करतात

शान्ति शान्ति शान्ति

# आधारभूत ग्रंथांची यादी

### उपनिषदें

१ कठोनिषद् [कठ]
२ प्रश्नोपनि. [प्रश्न]
३ माण्डूक्य
४ छांदोग्य [छां०]
५ बृहदारण्यक [बृह.]
६ तैत्तिरीय [तै ]
७ नारायण
८ सूर्य
९ त्रिपुरातापिनी
१० रामपूर्वतापिनी
११ नृसिंह पूर्वतापिनी [नृ. पू.]
१२ गोपालपूर्वतापिनी
१३ सावित्री
१४ योगशिखा [यो. शि.]
१५ अथर्वशिखा [अथ. शि.]
१६ अथर्वशिरः [अथ.]
१७ अमृतनाद
१८ जाबाल-दर्शन [जा. द.]
१९ भस्मजाबाल [भ. जा.]
२० रुद्राक्षजाबाल
२१ वासुदेव
२२ कुण्डिका
२३ प्राणाग्निहोत्र
२४ मैत्रेयि
२५ नारदपरिव्राजक
२६ कालाग्निरुद्र
२७ शुकरहस्य

### स्मृति व पुराणें

२८ भगवद्गीता [भ. गी ]
२९ बृहत् पाराशरस्मृति [बृह. पारा]
३० पराशर स्मृति [ पारा. ]
३१ लघुपाराशरादि १७ त्रुटित [ या सर्व स्मृति हस्तलिखित ]
३२ श्रीमद्भागवत [भाग.]
३३ देवी भागवत [दे. भा.]
३४ पद्मपुराण [पद्म पु.]
३५ अग्निपुराण [अग्नि. पु.]
३६ नारदपुराण
३७ विष्णुपुराण
३८ बृहन्नारदीय पुराण
३९ ब्रह्मपुराण
४० ब्रह्माण्ड पुराण
४१ शिवपुराण

### उपनिषद्भाष्यें

४२ शांकरभाष्यें
४३ विद्याविनोदभाष्यें

### इतर भाष्यें

४४ म गीताराण्य आचार्य
४५ ऋग्वेदी संध्याभाष्य, खंडराजदीक्षित
४६ यद्धचसंध्याभाष्य
४७ मध्वाचार्यसंध्याभाष्य
४८ भट्टोजी दिक्षित तै.
४९ श्रीकृष्णपंडित तै.
५० तै. संध्याभाष्य

### निबन्धग्रंथ

५१ श्रीरामार्चन चंद्रिका [रा. चं.]
५२ मदन पारिजात
५३ मन्त्रमहार्णव
५४ मंत्रमहोदधि
५५ संस्कार रत्नमाला [सं. र. मा.]
५६ माध्यंदिन आन्हिक सूत्रावलि [मा. आ. सू]
५७ धर्मसिंधु [ध. सिं.]

५८ ऋक्प्रातिशाख्य [उव्वटभाष्यसार]
५९ निर्णयसिंधु
६० शूद्रकमलाकर
६१ यतिधर्मनिर्णय
६२ पातंजल योग [ पा. सू. ]
६३ गायत्रीपुरश्चरणपद्धति [ गा.पु.प.] आचार्यकृत
६४ घारेकृत [ घा पु. प. ]
६५ आनंदलहरी
६६ महाभारत
६७ मेरुतंत्र

संध्या पोथ्या पुस्तकें

६८ निर्णयसागर ऋग्वेदी
६९ जगदीश्वर मुद्र. यजुर्वेदी
७० निर्णयसागर तै.
७१ गीताप्रेस नित्यकर्म पु.
७२ चित्रावशास्त्री पु.
७३ पाठकशास्त्री पु.
७४ बाकेशास्त्री
७५ सार्थ संध्या पुस्तक लेखकादि अज्ञात

इतर पुस्तकें

७६ जवळील एक जुनें बाड
७७ श्रीज्ञानेश्वरी [ ज्ञाने. ]
७८ अमृतानुभव
७९ यथार्थदीपिका
८० एकनाथी भागवत
८१ दासबोध
८२ तुलसीरामायण
८३ सप्तशती
८४ शिवस्वरोदय
८५ श्रीगुरुचरित्र [ कामत ]
८६ तुकोबांचे अभंग
८७ ऋक्सर्वानुक्रमसूत्र उतारे
८८ 'स्मृति मुक्ताफल' मधील उतारे
८९ उपनिषदंक हिंदी
९० शक्ति-अंक हिंदी
९१ सूरदास पदें
९२ कबीर पदें
९३ मॅक्समूलरचीं कांहीं पत्रें
९४ ए टॅंपल थॉट फॉर्म, इं. लेख सचित्र
९५ बायबल
९६ कुराण मराठी अनुवाद
९७ अमरव्याख्या-सुधा [ अ. व्या. सु. ]
९८ 'पिंगलछन्द:सूत्रम्' हलायुधवृत्ति व कादम्बिनी टीका टिप्पणीसहित

इत्यादि प्रत्यक्ष अवलोकन केलीं गेलीं.

## आधारास घेतलेले स्मृत्यादि ग्रंथ

१. मनु, २ याज्ञवल्क्य, ३ योगी याज्ञवल्क्य, ४ शाकल, ५ गोभिल, ६. अत्रि, ७ व्यास, ८ गौतम, ९ संवर्त, १० यम, ११ बृहद्यम, १२. विष्णु, १३ अंगिरा, १४ शंख, १५ नारद, १६ सुमंतु १७ अग्नि, १८. दक्ष, १९ भरद्वाज, २० हारीत, २१ प्रचेता, २२ देवल, २३ भृगु, २४ शातातप, २५. गार्ग्य, २६ नागदेव, २७ जमदग्नि, २८ मरीचि, २९ वृद्धमनु, ३० शौनक, ३१ मार्कंडेय, ३२ सत्यातप, ३३ स्मृतिसंग्रह, ३४ स्मृतिप्रकाश, ३५ स्मृतिसार, ३६ नन्दीपुराण, ३७ विश्वामित्रसंहिता, ३८ वासिष्ठ संहिता, ३९ आश्वलायन सूत्रें, ४० बौधायन सूत्रें, ४१ कात्यायन सूत्रें, ४२ धर्मसूत्र, ४३ विश्वामित्र कल्प, ४४ वसिष्ठ कल्प, ४५ गायत्री कल्प, ४६ हेमाद्रि, ४७ सारसंग्रह, ४८ आन्हिक पारिजात, ४९ आन्हिक सूत्रावली ५० कर्मप्रदीप, ५१ ज्ञानार्णव, ५२ शारदातिलक, ५३ बृहत्संध्या भाष्य ५४ पृथ्वी चंद्रोदय, ५५ शुक्रनीति, ५६ पैठीनसि, ५७ गरुडपुराण, इत्यादि अनेक

—o—

## कांहीं पारिभाषिक शब्दांचे अर्थ.

[१] द्विज- ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांतील उपनीत. [२] उपनीत-मुंज झालेला. [३] अनुपनीत-मुंज न झालेला. [४] व्रात्य- सावित्रीपतित. वयाच्या १६ वर्षेपर्यंत ब्राह्मणाची, २२ वर्षेपर्यंत क्षत्रियाची व २४ वर्षेपर्यंत वैश्याची मुंज न झाल्यास ते सावित्रीपतित म्हणजे व्रात्य होतात. [५] उपनेता- गायत्रीमंत्राचा उपदेश करणारा आचार्य. [६] अंगुष्ठ- आंगठा. [७] तर्जनी- आंगठ्या जवळचें बोट. [८] मध्यमा- मधलें बोट. [९] अनामिका-करंगळी जवळचें बोट. [१०] कनिष्ठिका करंगळी. [११] मणिबंध- तळहाताच्या खालील मनगटाचा भाग. [२] ब्रह्मतीर्थ- मणिबंधाच्या वरील तळहाताच्या मूळाच्या मध्यभागाला ब्रह्मतीर्थ म्हणतात. तेथून १।२ हस्तरेषा तळहातावर पसरतात. [१३] पंचांगुली- पांची बोटें. [१४] त्रैवर्णिक- ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांचे लोक.

सूचनाः-या पूर्वार्धांत श्रुति-स्मृत्यादि वचनें कांहीं ठिकाणीं पदें पाडून व कांहीं ठिकाणीं संधि सोडवून मुद्दामच दिलीं आहेत.

———o———

मानवता-पूर्ति-साधन व सध्योपासना ( पूर्वार्ध )

## विषयानुक्रमणिका


| प्रकरण | विषय | पृष्ठांक |
|---|---|---|
| १. | **मानवधर्मः**–हिंदुधर्मांप्रमाणें, (१) बायबलप्रमाणें, (६) कुराणाप्रमाणें (७) जन्मास आलेलें सर्वगुणदोष मिश्रित ! (८) मन्त्राचें सर्व अर्थ व सकामता (११) सद्य परिस्थिति अवनति व ब्राह्मण्यरक्षण (१५) | १ |
| २ | **संध्योपासनाः**– सध्योपासना म्हणजे काय ? सध्या म्हणजे काय ? (२३) सध्याकाल (२४) ध्यान (२५) शकासमाधान (२६) ते (३१) ध्यान कोठें करावें (३२) याचें कारण (३३) शकासमाधान (३३) किती अक्षराची गायत्री ? (३५) प्रेरणा, सन्त स्फूर्ति (३५) अशौचात सध्या आपत्कालीं सध्या, सूचना (३६) सध्या-देश ( स्थान ) (३७) सध्येंत दिशा (३८) | २२ |
| ३ | **उपनयन व पुनरुपनयनः**–उपनेता (३९) पुनरुपनयन, द्रव्य घेऊन दुसऱ्यासाठीं गायत्री जप (४०) | ३९ |
| ४ | **यज्ञोपवीत ( जानवें )** – यज्ञोपवीत, जानवें तयार करणें (४२) सूत, जानव्याची लांबी व जाडी, किती घालावीं, धारण करण्याचे प्रकार, यज्ञोपवीतनाश प्रायश्चित्त (४३) जानवें गळ्यातून काढणें, प्रायश्चित्त, स्वत तोडणें, तुटकें जानवें वर्ज्य, यज्ञोपवीत त्याग (४४) यज्ञोपवीत नसता भोजन (४५) यज्ञोपवीतोत्पत्ति-कथा, काहीं शकासमाधान (४६) | ४१ |
| ५ | **गायत्रीचा महिमाः**—श्रीमद्भागवत, वाल्मीकि रामायण (४९) महिमा–इतर आधार (५०), प्रति, तुलना (५१), सवाई सिद्धेश्वर ब्रह्मचारी (अनुभव) ५३, ब्रह्मास्त्रमन्त्र, ब्रह्मदड, अग्न्यस्त्र, नारायणास्त्र, बलातिबलाविद्यामन्त्र (५४), शकासमाधान (५५), विविध प्रकारें मन्त्रपरिणाम (५६), पाश्चात्याचे अनुभव, डॉ ॲनी बेझट व बिशप लेडबिटर (५७), ए टॅपल | ४९ |

थॅाट फॉर्म (५७), ओंकाराविषयीं त्याचा अनुभव (५९), तीन व्याहृती (६०), गायत्रीचें कार्य (६१), अतरात शिरलेलें तेज, त्या प्रवाहाचें विशेष आश्चर्य (६३), सूर्यबिंब म्हणजेच सविता (६४), लेडबिटर याचे उपकार (६५) अनुभव (६५)

६. संध्या करण्यानें लाभ काय?:–ब्रह्मलोक सनातन (६७), याज्ञवल्क्य, हें कसें शक्य होतें? (६९), शंकासमाधान (७९), थोडे अनुभव (७१), संध्या व वर्णपिशाच (७२), द्विजेतरानीं काय करावें? (७३), जप करताना ध्यान, याचें फल, अर्घ्य (७४), उपस्थान (७५) विवाहित स्त्रिया व कन्या (७६), सदाचाराचे थोडे मुख्य नियम, सत्यभाषण, वचनपालन, धन द्रव्य संपादन (७६) सदाचाराचें फल, दुराचार (८७) ६७

७. त्रिकाल संध्या न करण्याचें फल -आणखी थोड पहावें (८१) ८१

८ संध्येतील पात्रें (भाडीं) ८४

९. शौचविधि.– शौचाचे दोन प्रकार (८५) मृत्तिकाशौच करणें (८६) शौचास साप न होण्याचीं अनेक कारणें (८७) ८५

१० आचमन.– आचमन केव्हा केलें पाहिजे? आचमनानें फायदा (८९) इंद्रिय देवता आचमनानें प्रसन्न होतात (९०) आचमनास उदक, पाश्चात्याचें मत, प्राण जलमय आहेत (९१) आचमन मुद्रा, जलाचें प्रमाण (९२) ब्राह्म तीर्थानें आचमन, गरम पाण्यानें आचमन, आचमन जलाचें आणखी प्रमाण, सिद्धांत (९३), आणखी नियम, वाम तर्जनीचा स्पर्श, नखाचा स्पर्श (९४), द्विराचमन, शुद्धाचमन, पाण्याच्या अभावीं, जपापूर्वीचें आचमन (९५) ८९

११ शिखाबंधन व मोचन.– अपवाद, सन्याशाशिवाय शेंडी पाहिजेच (९७) आपद्धर्म (९७) समंत्रक बांधावी, शिखाग्रंथीचे प्रकार, त्रिविध ग्रंथि लक्षणें, शोचनीय सद्य स्थिति! (९८), चूडाकरण (९९), शंका-समाधान, गाठ मारण्यात व सोडण्यात हेतु (१०१) ९७

१२. स्नान ( अभ्यंग ) व तीर्थे :- प्रातःस्नानाची वेळ; स्नानाचे प्रकार (१०३) स्नानास जल; निषिद्ध जल; उष्णोदक स्नान; उष्णोदक स्नान निषेध; स्नान किती वेळां (१०४) अनुभव, सायंकाळचा विशेष अनुभव; आकंठ स्नान; स्नानांत दिशा; घरीं स्नानांत विशेष (१०५); संकल्प, तीर्थ प्रार्थना; आपत्काली स्नान (१०६); स्नानाभावीं प्रायश्चित्त; धोक्याची सूचना; प्रातःस्नानाचे फायदे (१०७); अभ्यंग-स्नान; अभ्यंग निषेधादि; निषिद्ध वारीं अभ्यंग (१०८); अपवाद; दिशा; तीर्थांनि; शारीरतीर्थे (१०९); मानसतीर्थे (११०) १०३

१३. स्नानानंतर वस्त्रधारण :- अहत वस्त्र असावें; उपवास (१११); एक उदाहरण (११२); स्पर्श दोष; कटिसूत्र कौपीन (११२); १११

१४. पवित्र (पवित्रक) धारण :- धारणस्थान; दर्भसंख्या (११३); गळून पडल्यास प्रायश्चित्त; पवित्रक त्यागविधि; पवित्रकास दर्भ-कुश; लांबी; निषिद्ध दर्भ (११४); कुशादि आणणें; कुशादि आणण्याचा विधि (११५); ११३

१५. मृत्तिका भस्मादि पुण्ड्र-धारण:- पुंड्रप्रकार; पुंड्रांतील रहस्य व बोध; मृत्तिका कोणती? भस्मधारण फल; भस्मधारण विधि; कसें लावावें (११८); स्थानें, प्रमाण; मंत्र; मंत्रानुसार फलभेद (११९); प्रायश्चित्त; आश्रमानुसार फल; भस्म म्हणजे काय (१२०); भस्मोत्पादनाचा अगदीं सोपा विधि (१२१). ११७

१६. प्राणायामः— प्राणायाम (१२३); विशेष अभ्यास (१२४); अनुभव (१२५); प्राणायामांत तीन क्रिया; ध्यान; यांचेंच ध्यान कां? (१२६); प्राणायामरीति; विशेष सावधगिरी; कुंभकांत सावधगिरी; (१२७); प्राणायामांत मंत्र; सर्वोपयोगी अनुभूत प्रयोग (१२८) श्वास बदलणें; इडा, पिंगला व सुषुम्ना; दीर्घश्वसन; प्राणायाम व दमा (रोग) १२९; वैदिक-सनातन धर्मशास्त्र (१३०; १२३

१७. संध्येचा संकल्पः- १३०

१८. मार्जन व मंत्राचमनः- मार्जनविधि, प्रोक्षण कसें करावें, १३३
(१३४), मार्जनानें फायदा, शोध हा विचार, अनुभव (१३५);
मंत्राचमन (१३६),
१९. अघमर्षण (पाप-पुरुष-निरसन):- विधि (१३७), पाप- १३७
पुरुष ध्यान-चिंतन (१३८)
२०. अर्घ्यप्रदान व प्रदक्षिणाः- अर्घ्य कां द्यावयाचें, तीन अर्घ्ये १३९
कां? सायंकाळी पुन्हा कां? (१३९), शंकासमाधान (१४०),
अर्घ्य कधी द्यावयाचें (१४१), अर्घ्य देतांना कसें उभें रहावें
(१४२), पाणी नसेल तर, सकाळीं जलांत अर्घ्य कां? सायंकाळी
कां नाहीं? मध्यान्हीं एक अर्घ्य कां? प्रदक्षिणा (१४३);
आणखी आधार (१४४)
२१. बसण्यासाठीं आसन व आसनविधिः- निषिद्ध आसनें, १४५
आसनगुण, निषिद्धासनाचे दुष्परिणाम (१४५), आसनाचें
प्रमाण, आसनविधि (१४६), अनुभव, आसन कोणतें असावें
(१४८),
२२. न्यास व मुद्राः- मंत्र म्हणजेच देवता (१५१), मुद्रा (१५७), १५०
गायत्री मुद्रांचा तक्ता (१६१),
२३. गोविन्दादि नामांचा अंगुष्ठादिकांशीं संबंधः- गोविंद व १६२
अंगुष्ठ (१६२), प्रलय (१६२), महीधर व तर्जनी, हृषीकेश व
मध्यमा, त्रिविक्रम व अनामिका (१६३), विष्णु व कनिष्ठिका,
माधव आणि करमध्य (१६४)
२४. प्रणव व्याहृतींचे अर्थः- विविध अर्थ, ओंकार, प्रणव, तार, १६६
प्रलय, (१६६), सूक्ष्म ओंकार पुरुष व गायत्री प्रकृति (१६७)
व्याहृति (१६८)
२५ गायत्रीचें ध्यान व आवाहनः-आवाहन (१७२) एका १७०
साधकाचा अनुभव (१७३)
२६. मुद्रा-वर्णनः- मुद्रा लक्षणें व स्पष्टीकरण, सुमुख वगैरे (१७६), १७५
त्रिमुख ते शकट (१७७), यमपाशम् ते प्रलंब (१७८),
मुष्टिकम् ते कूर्मम् (१७९), वराह ते पल्लव (१८०), गायत्री

जपानंतर दाखवावयाच्या मुद्रा; सुरभि-धेनु (१८१); ज्ञान ते निर्वाण (१८२).

गायत्री जपः– जपासाठीं गायत्री मंत्र (१८३); मंत्र व जप; अधिक प्रणव कां लावूं नयेत (१८४); एक उदाहरण; जप किती ? (१८५); मंत्र कसा म्हणावा; निर्णय (१८७); जपाचे तीन प्रकार; आवश्यक सूचना; अनुभव (१८८), परावाणीचा जप; संध्येचा काल; काललोप प्रायश्चित्त (१८९); काललोपभेदानें प्रायश्चित्त (१९०); सायंसंध्येंत काललोप प्रायश्चित्त; मध्यान्ह-संध्येचा काल (१९२). १८३

२८. मंत्रजापकानें पाळावयाचे नियमः-प्रयोग व अनुभव (१९५) नाना अनुभव (१९७); हात ठेवण्याची स्थानें भिन्न कां ? गुप्तता (१९८); गोमुखी; गोमुखीनें फायदे; इतर नियम (१९९) नेहमीच टाळाव्य गोष्टी, जपमालेविषयीं, जपसंख्या-गणना; शंका समाधान (२०१); मोजण्यानें लाभ काय ? (२०२); १९४

जपाची माळः–नैसर्गिक शरीरस्थ अक्षमाला (२०३); फलभेद; मालाभेदानें फलप्रमाणभेद (२०५); माळ किती मण्यांची; कशाची गाठवावी ! कशी गाठवावी (२०६); माला संस्कार; अपवाद (२०७); विशेष सूचना; विष्णूचें अष्टगंध; शक्तीचें अष्टगंध; शिवाचें अष्टगंध (२०८); बाजारातील माळा; सोपा उपाय, रुद्राक्ष (२०९); माळ कशी धरावी, प्रमाद व त्याचे दुष्परिणाम (२१०); प्रायश्चित्त; जपातील विघ्नें; मंत्र-पुरश्चरणाचे विशेष नियम (२११); आहार (२१२).

३०. उपस्थानादिः—उपस्थान; विधि (२१३); दिग्देवता-वन्दन (२१४);

३१. गायत्रीचे सकाम प्रयोगः–प्रायश्चित्तार्थ प्रयोग; प्रकार १ ला व २रा (२१६), प्रकार ३ रा (२१९);

३२. गायत्रीची आरती व स्तोत्रें :– आरती [ मराठी ] (२२१), गायत्री जयकार स्तोत्र (२२२), श्रीगायत्री-कवचम् [ संस्कृत ] २२१

२२२; श्रीगायत्री-हृदयम् (२२५); गायत्री-स्तोत्रम् (२२७); गौतम-महामुनिकृत-गायत्रीस्तोत्रम् (२३०);

३३. सूर्य स्तोत्रें :- सूर्याष्टकम्; सूर्यकवचस्तोत्रम् (२३१); श्रीसूर्य-स्तोत्रम् (२३२). २३१

३४. ऋषि-छंद-देवतादि-निर्णय :- देवता-ऋषि-विनियोगादींचीं लक्षणें (२३४), भावार्थ; छंद (२३५); प्रणव देवता; छंद; विनियोग (२३९); एक महत्त्वाचा प्रश्न, समाधान (२४०); शिरोमंत्र; पहिल्या मार्जनाचे मंत्र, मंत्राचमन (२४१); दुसरें मार्जन (२४२), अघमर्षण, उपस्थान (२४३) शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन संध्येतील मंत्राचे ऋषि, देवता व छंद (२४५). २३४

३४. तैत्तिरीय संध्येतील मंत्रांचे छंद, ऋषि व देवता :- २४९

३५. केशवादि चोवीस नांवांचा अर्थ व परस्पर संबंध :- केशव; नारायण; माधव; (२५२); गोविंद; विष्णु; मधुसूदन; त्रि-विक्रम (२५३); वामन; श्रीधर (२५४) हृषीकेश; पद्मनाभ दामोदर (२५५) संकर्षण; वासुदेव (२५६), प्रद्युम्न, अनिरुद्ध, पुरुषोत्तम, (२५७) अधोक्षज, नरसिंह (२५८) अच्युत, जनार्दन, उपेन्द्र (२५९), श्रीकृष्ण (२६०) सूचना (२६१). २५२

३६. पूजेतील रहस्य :- यथा देहे तथा देवे (२६५) २६३

३७. वैश्वदेवाविषयीं थोडी माहिती :- सामान्य नियम (२६८) व सूचना (२६९) २६७


---

## —: संध्योपासना पूर्वार्ध :—शुद्धिपत्र :—

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | २ | यथाविकार | यथाधिकार |
| ९ | १४ | सागितलेल्या | सांगितलेल्या |
| ४० | १२ | गेल्यास | केल्यास |
| ६७ | २० | आप्नेति | आप्नोति |
| ७१ | २० | वाट्ते | वाढते |
| ८१ | ६ | सर्वपापयुक्त | सर्वपापमुक्त |
| १०१ | २६ | कर्मातं | कर्मांत |
| १०४ | १८ | उष्णोदकस्नाननिषेध | उष्णोदक |
| १०६ | ४ | पुारणोक्त | पुराणोक्त |
| ११४ | ५ | पूर्णांशानें | पूर्णांशानें |
| १५५ | २१ | ऋत्यादिन्यास | ऋष्यादिन्यास |
| २०८ | २५ | समातपत्र | समालपत्र |
| २१६ | २५ | क्षुद्र | क्षुद्र |
| २३४ | ३ | छंदोभि... | छंदोभि... |
| २५७ | २७ | क्षरं | क्षरम् |
| २५८ | २७ | हिरण्यकशिपुने | हिरण्यकशिपूनें |
| २६२ | ६ | वैश्वदैवासारखे | वैश्वदेवासारखे |
| २६८ | ६ | तोडानें | तोंडानें |

——o——

# स्वामीजींचे अन्य ग्रंथ

| प्रकाशित | किंमत रु.न.पैसे |
|---|---|
| १] श्री तुलसीदास चरित्र | ००·७५ |
| २] श्री रामचरित मानस ( मराठी गुटिका ) २ री आवृत्ति | ६·०० |
| ३] गूढार्थ-चंद्रिका ( मराठी ) प्रस्तावना खंड | २०·०० |
| ४] गूढार्थ-चंद्रिका ( हिंदी ) खंड १ ला पृ. २०० ( कल्याणचे आकाराची ) | ३·०० |

पत्ता– मंत्री मानससंघ, पो. रामवन, सटणा

| | |
|---|---|
| ५] गूढार्थ-चंद्रिका ( मराठी ) नमुना अंक | १·५० |
| ६] सं. समश्लोकी गीता | ००·५० |
| ७] अभिनव रामायण | १·०० |
| ८] वेदांतसार अभंग रामायण | ००·७५ |
| ९] साधक बोध सिंधु | ००·१२ |
| १०] नित्य भजन संग्रह | ००·२० |

## अप्रकाशित

१] गूढार्थ-चंद्रिका ( मराठी ) बृहत् टीका

२] गूढार्थ-चंद्रिका ( हिन्दी ) ,, ,, छापत आहे

पत्ता– मंत्री मानससंघ पो. रामवन, जि. सटणा, ( मध्यप्रदेश )

३] श्री गुरुगीता प्रबोधिनी

४] परमामृत प्रकाश

५] श्री वेदस्तुति कीर्तन भास्कर

६] भ. गीता कीर्तन तरंगिणी– १५ वा अध्याय

७] श्री ब्रह्मस्तुति ( चौपाई-दोहादि वृत्तात )

८] पदें, अष्टकें

९] इतर स्फुट काव्य

पुस्तकें मिळण्याचें ठिकाण—

आदिनाथराव यादव,
ॲडव्होकेट, परंडा
जि उस्मानाबाद

प्रकरण १ लें

# मानवधर्म

आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम् ।
धर्मो हि तेषां अधिको विशेषः धर्मेण हीनाः पशुभिः समानाः॥
क्रियाहीने न धर्मः स्यात् धर्महीने कुतः सुखम् ।
सुखं तु वाञ्छते सर्वः तत् च धर्मसमुद्भवम् ॥ ( दक्ष स्मृ. )
तस्मात् धर्मः सदा कार्यः सर्ववर्णेन यत्नतः ।
न्यायाऽऽगतेन द्रव्येण कर्तव्यं पारलौकिकम् ॥ ( दक्ष स्मृ. )

भोजन, खाणेंपिणें, झोंप घेणें, भय व मैथुन या गोष्टी पशु आणि मानव यात सामान्य आहेत, पण मनुष्यात विशेष अधिक धर्म होय, म्हणून धर्महीन मानव पशूसारखेच कर्म-क्रिया-वेस्याविषाय धर्म घडत नाहीं, व धर्महीनास सुख मिळत नाहीं सुख तर सर्वांनाच पाहिजे असतें आणि दु ख मुळींच नसावें असें प्रत्येकास वाटतें, पण या दोन्ही गोष्टी धर्माचरणानेंच मिळू शकतात

आहारादि चार गोष्टींत पुष्कळ माणसें पशूपेक्षाहि निन्द्य-नीच-आचरण करतात, याचें कारण कामक्रोधलोभादिकास वश होऊन ते धर्माकडे, माणुसकीकडे, पाठ फिरवितात धर्म आणि कायदे पशुपक्ष्यासाठीं कुठेंहि, कोणत्याहि देशात नाहींत 'रस्त्यानें डाव्या बाजूनें जा' वगैरे फलक, बैल घोडे वगैरेंसाठीं नसतात, माणसासाठीं असतात, कारण मनुष्याला दिलेल्या थोड्याशा बुद्धिस्वातंत्र्याचा तो दुरुपयोग करू शकतो, स्वत च्याच स्वार्थाच्या हेतूनें तो ईश्वराच्या व समाजाच्या सुखदु खाचा विचारच करीत नाहीं

'ज्ञानं हि तेषां अधिको विशेषः ज्ञानेन हीनाः पशुभिः समानाः'
असाहि पाट आहे. यात सुखाचें शिखर दाखविलें आहे; पण वरील श्लोकांत सुखाचा पाया सांगितला आहे धर्माचरणरूपी पाया, निर्दोष, शास्त्रशुद्ध व भक्कम असला तरच त्यावर साधनरूपी इमारत बांधून दु खरहित नित्य सुख देणारें ज्ञानरूपी शिखर दिसू शकेल

हल्लीं भौतिक मानवविज्ञानरूपी टोलेजंग इमारती उच उंच होत आहेत; पण त्यांना मानवधर्मरूपी उत्तम पाया नसल्यानं जगातील सर्वच देशात अशांतता, भीति, यांचें साम्राज्य वाढत आहे, म्हणून सर्वांनींच जास्तींत जास्त पालन, मानवधर्माचें प्रयत्न केलें पाहिजे, कारण हिंदु, मुसलमान, बौद्ध, इत्यादि कोणी असलें तरी सर्व मानव आहेत. म्हणून प्रथम मानव-धर्म पाहिजे, म्हणून प्रथम, मानवधर्म कोणता हें पाहिलें पाहिजे मानवधर्म म्हणजे मनुष्यमात्राचा मुख्य धर्म

प्रत्येक मनुष्यानें पाळलाच पाहिजे अशा धर्माचा उपदेश नारदानीं युधिष्ठिर राजास केलेला आहे तो ( शूद्र कमलाकरांतून ) —

सत्यं दया तपः शौचं तितिक्षेक्षा शमो दमः ।
अहिंसा ब्रह्मचर्यं च त्यागः स्वाध्याय आर्जवम् ॥ १ ॥
सन्तोषः समदृक्सेवा काम्येहोपरमः शनैः ।
नृणां विपर्ययेहेक्षा मौनमात्मविमर्शनम् ॥ २ ॥
अन्नाद्यादेः संविभागो भूतेभ्यश्च यथार्हतः ।
तेष्वात्मदेवताबुद्धिः सुतरां नृषु पाण्डव ॥ ३ ॥
श्रवणं कीर्तनं चाऽस्य स्मरणं महतां गतेः ।
सेवेज्या ऽवनतिर्दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ ४ ॥
नृणां अयं परो धर्मः सर्वेषां समुदाहृतः ।
त्रिंशल्लक्षणवान् राजन् सर्वात्मा येन तुष्यति ॥ ५ ॥

या पाच श्लोकात मनुष्यजातीचा परमश्रेष्ठ धर्म सांगितला असून त्याची तीस लक्षणें आहेत, त्याचें थोडं स्पष्टीकरण करणें भाग आहे.

(१) सत्य– सत्यभाषण, खोटें न बोलणें व दिलेलें वचन पाळणें
(२) दया– प्राणिमात्रावर दया करणें

(३) तप- एकादशी वगैरे उपवास व पायी यात्रा, वगैरे.

(४) शौच- अंतर्बाह्य स्वच्छता, निर्मळपणा.

(५) तितिक्षा- विरोध, प्रतिकार न करता सर्व प्रकारची दुःखें समाधानानें सहन करणें

(६) ईक्षा- अवलोकन; कार्य-अकार्य, योग्य अयोग्य, विहित-निषिद्ध, सार-असार, स्तुत्य निंद्य काय, याचा विचार-विवेक करणें.

(७) शम- मनाचा निग्रह, मनाला जिंकणें. अकार्य, अयोग्य, निषिद्ध, असार, निंद्य करण्याचा विचार अथवा संकल्प मनानें न करणें.

(८) दम- इंद्रियनिग्रह, इंद्रियांना आपल्या ताब्यात ठेवणें

(९) अहिंसा- प्राणिमात्रांना शरीरानें, वाणीनें वा मनानें दुःख, पीडा देणें म्हणजे हिंसा, द्वेष मत्सर करणें ही मानसिक हिंसा होय. दुसऱ्याचें वाईट चिंतणेंसुद्धा हिंसाच. अशी हिंसा न करणें म्हणजे अहिंसा.

(१०) ब्रह्मचर्य- वीर्यरक्षण करून परस्त्रियांना माता, बहीण, कन्या, अशासमान मानून वागणें

--

म्हटलें नाहीं. (बाप) भेद ईश्वरें निर्मिला। तो त्यानें याचेनि न वचे मोडिला' (समर्थ) व्यवहारात यथाधिकार भेद मानून व यथाधिकार वागून सुद्धा, अतरात समत्वभावना असली म्हणजे द्वेष, मत्सरादि निर्माण होऊच शकत नाहींत

' विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म। भेदाभेद भ्रम अमगळ ॥' (तुकोबा)

भेदाभेद म्हणजे अतरात भेदभाव मानणें व व्यवहारात अभेद मानणें, हे दोन्ही भ्रम आहेत, दोन्ही अमगळ आहेत

(१६) **काम्येहोपरमः शनै.**–( काम्य ईहा-उपरम शनै ) स्वर्गसुख, विषयसुख, धन, सपत्ति, सुदर स्त्री, पुत्र, प्रतिष्ठा, मानसन्मान इत्यादि प्रकारच्या कामनाचा इच्छाचा, शनै म्हणजे हळुहळू, दृढप्रयत्नपूर्वक क्षय करणें, प्रथम दुर्व्यसनाचा व दुर्वासनाचा त्याग करुन मग हळूहळू इतर इच्छाचा त्याग करावा हें 'जन्ममृत्युजराव्याधि दु खदोष' याचें चिंतन केल्यानें, विषयाच्या दुष्परिणामाचें भेसूर, किळसवाणें चित्र मनासमोर उभें केल्यानें सहज साधतें पुत्र असला तर सुख देईल, असें मनुष्यास वाटतें, पण श्रुतिमाउली म्हणते कीं 'अजायमानोऽपि पुत्रो दु खाय भवति' जन्मास न आलेला, जन्मास न येणारा पुत्र सुद्धा दु ख देतो ! मग जन्मास आल्यावर तो सुख देईल असें मानणें किती शहाणपणाचें ठरेल !

१७) **नृणा विपर्ययेहेक्षा**–( विपर्यय-ईहा-ईक्षा ) जे लोक दु ख-दायक, निंद्य, निषिद्ध कामनाच्या प्राप्तीसाठीं कष्ट करतात त्याना खरें सुख मिळतें, कीं कामना सिद्धीस गेल्या तरी, दु ख व असतोष पदरात पडतात, त्याच्या आचरणानें इतराचें, समाजाचें, राष्ट्राचें, हित होतें कीं अकल्याण होतें, इतरास त्याच्या वागण्यानें अधिक सुख मिळतें कीं दु ख, याचा विचारपूर्वक शोध करणें, ( ईक्षा–अवलोकन )

(१८) **मौन**– जें ( स्नान, दान, जपादि ) कार्य करीत असता भाषण करू नये, ज्याच्याशी भाषण करू नये असें शास्त्रानें सांगितलें असेल त्या कार्यात व त्या व्यक्तींशीं न बोलणें, सत्य भाषणानें कोणाची प्राणहानि निष्कारण होत असेल तर त्या वेळीं मुळींच न बोलणें म्हणजे मौन । पण अप्रिय बोलावें लागत असेल तेथें काहींच न बोलणेंहि मौन

वादविवाद, निष्कारण वल्गना न करणें म्हणजेहि मौन. परनिंदा, परदोष चर्चा, चहाडी न करणेंहि मौनच.

(१९) **आत्मविमर्शनम्**-- आत्मचिंतन-मनन करणें. आत्मा कोण अनात्मा कोण, 'मी' 'मी' असें ज्याच्याविषयीं म्हटलें जातें तो कोण, त्याचें स्वरूप काय, इत्यादींचा विचार संत व सच्छास्त्र यांच्या साह्यानें, करणें. जो 'समदृक्' सेवा प्रेमानें करतो त्याला हें सहज साधतें.

(२०) '**अन्नाद्यादेः संविभागो भूतेभ्यश्च यथार्हतः**'-स्वतःपाशीं असलेल्या अन्न, वस्त्र, जल इत्यादिपैकीं आपल्या शक्तीप्रमाणें व त्यांच्या त्यांच्या आवश्यकतेप्रमाणें व योग्यतेप्रमाणें दीन दुबळे, दरिद्री, दुःखी, संकटग्रस्त, भुकेले इत्यादिकांस, शत्रुमित्र इत्यादि विचार न करतां, देणें.

(२१) '**तेषु (भूतेषु) आत्मन्देवताबुद्धिः आणि सुतरां नृषु आत्मदेवताबुद्धिः**'- सर्व प्राणिमात्राच्या विषयीं आत्मबुद्धि ठेवणें. मी-माझा जो आत्मा-आणि सर्व प्राण्याचा आत्मा एकच आहे, अशी भावना ठेवणें ही ज्ञानमार्गीयांची भावना होय. मी ज्याला भजतों, ज्याचें नाव घेतों तोच देव, देवता, ईश्वर, परमेश्वर, गॉड, अल्ला सर्वांत आहे. सर्व त्याचींच भिन्न भिन्न रूपें आहेत, अशी भावना भक्तिमार्गीयानीं ठेवावी. म्हणूनच संत गर्जत सांगतात कीं,

'नारायण असे विश्वीं। तयाची पूजा करीत जावी।
म्हणोनियां तोषवावी। कोणी तरि काया' (समर्थ)
'जें जें दिसे भूत। तें तें मानिजे भगवंत' (ज्ञानेश्वर).

अशा भावना मनुष्याविषयीं प्रथम आणि विशेष ठेवली पाहिजे.

सत्य, दया वगैरेंचें आचरण होऊं लागलें व समदर्शी संताची सेवा केली कीं वरील एकविसावें लक्षण-गुण-मिळवणें सहज साधतें. पण आत्म-भावना किंवा भगवद्भावना अगदीं दृढ होण्यास भगवंताची कृपा लागते. ती संपादन करण्यासाठीं आणखीं नऊ गुण मिळविले पाहिजेत. ते संताच्या सेवेनें व दृढ अभ्यासानें सहज मिळूं शकतात. ते नऊ गुण म्हणजे श्रवण, कीर्तन, स्मरण, सेवा, (इज्या) अर्चन, वन्दन (नमन), दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. ही नवविधा भक्तीच होय. मात्र

ती कोणाची हें सांगताना विष्णु, नारायण, कृष्ण, राम, शिव, देवी, देव, हरि इत्यादि कोणाचाच उल्लेख न करता, अशा युक्तीनें वर्णिलें आहे कीं जगातील कोणत्याहि धर्मांच्या वा सांप्रदायाच्या अनुयायास आपापल्या भावनेप्रमाणें हें वचन घेता येईल 'महता गते' खरे महात्मे, संत, साधु यांनासुद्धा एकच गति, एकच प्राप्य, आराध्य, वाटणारा जो एकच आधार त्याचें श्रवणादि करणें तो आधार म्हणजे ईश्वर, परमेश्वर, अल्ला, गॉड, खुदा इत्यादि विविध नावांनीं उल्लेखिला जाणारा परमात्मा

नवविधा भक्तीचीं लक्षणें व ती कशी करावी याविषयी सविस्तर सोपें वर्णन श्रीमद्दासबोधात नऊ समासात केलेलें आहे तें पाहावें

बायबलमध्येंहि एका लहानशा वाक्यात सत्यादि २१ गुणाचा समावेश केलेला आहे

Do unto others as you would have others do unto you

दुसऱ्यानीं आपल्याशीं जसें वागावें असें तुम्हास वाटतें तसें तुम्हीं दुसऱ्याशीं वागा

माझ्याशीं कोणी खोटें बोलू नये (सत्य), मला कोणी दु ख देऊ नये, (अहिंसा), माझ्याशीं कपट, लपवालपव कोणी करू नये (ऋजुता), माझी कोणतीहि वस्तु मला विचारल्याशिवाय कोणी घेणें मला आवडत नाहीं, (अस्तेय) माझें काचित चुकलें तरी लोकानीं क्षमा, दया करावी (दया), कोणीहि दुसऱ्या पुरुषानें आमच्या पत्नीकडे वगैरे वर डोळे करून पाहणें, त्याच्याशीं एकांतात बोलणें, त्याना स्पर्श करणें मला मुळींच खपत नाहीं, चीड येते, (ब्रह्मचर्य) असें प्रत्येकास वाटतेंच, म्हणून प्रत्येकानें इतराशी असेंच वागलें पाहिजे सत्य, दया, अहिंसा, ऋजुता, ब्रह्मचर्य अस्तेय याचें स्पष्टीकरण जसें केलें तसेंच इतर बहुतेक गुणाचें त्या वाक्यातून निघू शकेल

कोणी एका गालात मारली तर दुसरा गाल पुढें करा' या एका आज्ञेंत सहनशीलता क्षमाशीलता, व अक्रोधता या गुणाची पराकाष्ठा दाखविली आहे

शेजारधर्म, भुकेल्यास अन्न व तृषितास पाणी देणें, दुसऱ्यांस सुख देणें, दुःखितांचें दुःख निवारण करणें. शरणागताचें ( शत्रूचेंसुद्धां ) संरक्षण करणें; परदोषचर्चा, परनिंदा, चहाडी न करणें; इत्यादि अनेक सद्गुणांची आवश्यकता वरील पहिल्या शाखेनें सिद्ध होते

ईश्वर या जगाचा कर्ता, पालक व संहर्ता आहे; तो निःपक्षपाती असून ज्याच्या त्याच्या कर्मांचें फळ तो मनुष्याना देतो; तो कृपासिंधु, दयासागर, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वसाक्षी आहे. तो फार दूर नसून प्रत्येकाच्या अगदीं जवळ आहे. तो सज्जनाचा संरक्षक व दुष्टाना दंड करणारा आहे. तो एक आहे. त्याच्यासारखा दुसरा नाहीं. त्याला वेळच्या वेळीं ठराविक पद्धतीनें प्रार्थना करावी. तो क्षमासागर आहे; इत्यादि भावना बायबल-प्रतिपादित खिस्ती धर्मांत व कुराण-प्रतिपादित इस्लाम ( मुसलमानी ) धर्मांत सुद्धा आहेतच. इस्लाम या अरबी शब्दाचा अर्थ ईश्वराज्ञापालन असा आहे; व तें जो करतो तो मुसलमान. बौद्ध व इतर धर्मांत वरील भावना आहेत हें सांगण्याची आवश्यकताच नाहीं.

जर कोणी म्हणतील कीं आत्मनिवेदन बायबलामध्यें कुठें आहे तर पहा. ‘Oh God, give me my daily bread. ’ हे देवा ! ( गॉड् ) माझी रोजची भाकरी मला दे ’ अशी प्रार्थना प्रत्येकानें केली पाहिजे, अशी आज्ञा आहे. कोट्याधीशानें सम्राटानें सुद्धा अशी प्रार्थना का करावयाची ? या प्रार्थनेंतच खड-आत्मनिवेदन आहे. भाव हा आहे कीं माझ्याजवळ असलेली सर्वसंपत्ति, देवा ! तुझी आहे; माझें काहींच नाहीं; यावून आवश्यक तेवढें अन्न ( भाकर ) वस्त्र इ. मला दे.

कुराणावरहि यातील बहुतेक धर्मांची गुणांची, आवश्यकता सांगितली आहे; हें ज्याना बघणें असेल त्यानीं डॉ. मौलवी हकीम सूफी मीर मोहंमद याकूबखान, यानीं केलेलें कुराणाचें सटीक मराठी भाषांतर पाहावें; विशेषतः अध्याय २ मंत्र १५३, १५।९; २।१७७, २।१७२ वरील टीपा; अ. २; ५।२, इत्यादि स्थळें अवलोकन करावीं 'नाऽमूलं लिख्यते किंचित्' हें पूर्वसूरींचें ब्रीद पाळणें हा या मनबुद्धींचा स्वभाव बनला असल्यानें वरील दोन्ही धर्मांचे मूलग्रंथ मागवून जुलै १९६१ मध्येंच पुन्हा वाचले गेले.

जीव ईश्वराचा अंश आहे, पण तो ईश्वर परमेश्वर-नाहीं, हा सिद्धांत-मुस्लिम धर्मांत एका सगीत वाक्यात सांगितलेला आहे, 'आदम (जीव) को खुदा मत कहो, आदम खुदा (परमेश्वर) नहीं। लेकिन खुदा के नूरसे आदम जुदा (भिन्न) नहीं ' नूर = प्रकाश, चित्. देह मेला, थडग्यात पुरला गेला तरी, त्या जीवाचें पुनरुत्थान वरील दोन्ही धर्म मानतातच, म्हणजेच 'जीवोनित्य ' हें मानतातच 'याऽऽहू' हा 'सोऽहं' या अर्थाचा मत्रहि मुस्लिमाच्या सूफी पथात आहेच अनेक मत्राचे जप, उपवास, तीर्थयात्रा इत्यादि प्रत्येक धर्मांत कोणत्या तरी रूपानें आवश्यक कर्तव्यें सांगितलीं आहेतच, विधिनिषेधहि आहेत. विधिनिषेधादि सर्व एवढ्याचसाठीं आहेत कीं मनुष्याला दैवी सपत्तीची प्राप्ति व्हावी व दु ख-रहित शाश्वतसुखाचा अनुभव सतत घेता येण्यासाठीं त्यानें मानवत्वाची परिपूर्णता करावी ' Man is a miniature of god ' मनुष्य ही ईश्वराची छोटी प्रतिकृति आहे, असें ख्रिस्ती धर्मांतहि मानतात

'ममैवांशो जीवलोके जीवभूत. सनातनः' (भ गी )

## जन्मास आलेलें सर्व गुणदोष मिश्रित !

वर धार्मिलेले तीस गुण ज्याच्या ठिकाणीं परिपूर्णतेस गेले असतील तोच पूर्णपणें दु खरहित व सदा पूर्ण सुखी असू शकतो, व परमेश्वराच्या समीप सन्मानानें बसू शकतो म्हणजे उपासक होतो तिसापैकीं कांहीं गुण बीजरूपानें प्रत्येक मनुष्यात जन्मत च असतात, पण त्याबरोबर पशुस्वभावाचे कांहीं दोष, आसुरी राक्षसी स्वभावाचे कांहीं महादोषहि असतातच प्राणिमात्रात दोषगुणाचें अस्तित्व, कमीअधिक प्रमाणात जन्मापासूनच असतें पूर्ण निर्दोष असा फक्त एक परमात्माच त्यानें नरावतार घेतला कीं त्यालासुद्धा मानवी दोषाचें नाट्य कधीं कधीं करावें लागतें आणि त्यामुळेंच 'अवजानन्ति मा मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।' (भ गी ) असें घडतें, कारण त्या अवतारचरित्रातील भासमान दोषाना मूढ माणसें सत्य मानतात मनुष्यानें शास्त्रानुसार विधींचें पालन व निषेधाचा त्याग करण्याचा दृढ प्रयत्न केल्याशिवाय दोषाचा त्याग व दैवी गुणाची जोपासना व वृद्धि आणि पूर्ति होत नाहीं, हें 'आधीं केलें

मग सांगितलें असें ठरण्यासाठीं राम, कृष्णादि पूर्णावतारसुद्धां 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते' या प्रमाणें स्वतः वागले. व श्रीएकनाथासारखे संतसुद्धा 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते' या आज्ञेचें आचारयुक्त पालन करीत होते.

मानवत्वाची परिपूर्णता करणें हें ध्येय गाठण्यास बुद्धि, मन, दोन्ही प्रकारचीं इंद्रियें, प्राण व शरीर याना ताब्यात ठेवावीं लागतात, कारण त्या सर्वांचा उपजत स्वभाव पशूप्रमाणें बाहेर विषयाकडे, अनियंत्रितपणें धावण्याचा असतो.

पराञ्चि खानि व्यतृणत् स्वयंभूः।
तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन् (कठ.)'

त्यामुळें इंद्रियें आत धाव घेण्यास सहसा कबूल नसतात. त्यावर जय मिळविण्याचें साधन करताना मनुष्यदेह सुदृढ, निरोगी ठेवणें व अगदीं आवश्यक तेवढें अन्न वस्त्र इत्यादि त्यास योग्य वेळीं देणें, आवश्यक ठरतें. कलियुगात तर प्राण व जीवन, अन्नाश्रित असतात. या सर्व गोष्टी धर्मशास्त्रानें सांगितलेल्या विधींचें पालन व निषेधाचा त्याग केल्याने व शास्त्रकथित साधन यथाधिकार बालपणापासून नियमानें व निष्ठेनें करीत राहिल्यानें सहज साधतात.

**धर्मशास्त्र**– श्रुतिस्मृतिपुराणरूपी धर्मशास्त्रानें पूर्वसंस्कारवैचित्र्य व प्रकृतिवैचित्र्य यांच्या वैशिष्ट्यानुसार वर्णाश्रमधर्म सांगितले आहेत धर्मशास्त्राचे 'श्रुतिस्मृती उभे नेत्रे पुराणं हृदयं स्मृतम्' (दे भा) श्रुति व स्मृती हे दोन नेत्र आहेत व पुराण हृदय होय. नेत्र म्हणजे योग्य मार्गानें हिताच्या मार्गानें नेणारे. नेत्रानीं–डोळ्यानीं जरी दिसलें तरी त्यातलें मर्म–रहस्य हृदयच जाणूं शकतें; म्हणूनच पुराण वचनाचें फार महत्त्व आहे. 'इतिहासपुराणाभ्याम् वेदार्थमुपबृंहयेत्'

**षट्कर्मे**– धर्मशास्त्रानें द्विजासाठीं सहा कर्मे आवश्यक म्हणून सांगितलीं आहेत.

'सन्ध्या स्नानं जपो होमः देवतानां च पूजनम्।
वैश्वदेवं तथाऽऽतिथ्यं षट्कर्माणि दिने दिने' (अनेक स्मृति)

स्नान सर्वकर्मांच्या व विशेषत सध्येच्या अगभूत आहे हें सुचविण्या साठींच 'स्नान सध्या' असा क्रम न ठेवता सर्वत्र 'सन्ध्या स्नान' असाच क्रम ठेवलेला आढळला या सहा कर्मांत सध्या–सध्योपासना–कर्माचें महत्त्व सर्वात अधिक असल्यानेंहि सध्येचा उल्लेख प्रथम केलेला आहे क्रियाच्या क्रमानें पाहिलें तर स्नानाचा उल्लेख प्रथम पाहिजे होता, व मुज झाल्यावर प्रथम सध्याकर्म नसून, होम हें कर्म असतें व नतर पहिली सायसध्या, आणि म्हणूनच स्मृतींत सध्याचा काळ सागताना प्रथम सायसध्येचा काळ सागितलेला आढळला त्याप्रमाणेंच 'स्नान होमस्तथा सन्ध्या' असें म्हणता आलें असतें, पण सध्येचें सर्वश्रेष्ठत्व सुचविण्यासाठीं 'सध्यास्नान' असें म्हटलेलें आहे वरील सहा कर्मे द्विजेतराना सुद्धा आहेतच पण पुराणातील मत्रानीं, म्हणून आता सध्योपासना या विषयाचें सागोपाग विवेचन, शास्त्राधाराच्या पायावर, त्यातील विधि निषेध व उपयुक्तता इत्यादींची सोपपत्तिक चर्चा पूर्व भागात प्रकरणश करून, उत्तर भागात सध्याचे प्रयोग, त्यातील मत्राच्या अर्थासुद्धा व मत्राच्या मूलस्थाननिर्देशासह देणें आवश्यक असल्यानें तेंच पुढें केलें गेलें आहे, कारण अर्थज्ञानाशिवाय केलेलें वेदादि मत्राचें पटन व त्या मत्रानीं केलेलीं कर्में 'सासरच्या गोण्या बैलाचिया पाठीं' अशा सारखीं निष्फळ होत, अशा अर्थाचीं अनेक वचनें आहेत त्याचें सार इतकेंच आहे कीं त्या कर्मांचें पाहिजे तितकें फल मिळत नाहीं, फारच अल्प फल मिळतें

गायत्रीमत्राचा व सध्येतील अगोपागाचा स्वत अनुभविलेला, पाहिलेला व तोंडीं ऐकलेला प्रभाव, शास्त्रवचनें, सध्येतील मत्राचे अर्थ व भगवत्प्रेरणा, याच्या समन्वयानें नि सशय, खात्रीपूर्वक असें सागता येतें कीं, जे कोणी द्विज, या पुस्तकात सागितलेल्या गोष्टींचें मनन करून, यथाविधि, अर्थाकडे यथाधिकार लक्ष देऊन, त्रिकालसध्या निदान १०८ गायत्रीजपयुक्त उत्तम काळीं करतील, आणि न्यायार्जित धनावर उपजीविका करून सदाचारी व नीतिसपन्न राहतील त्याना

'याच देहीं याच डोळा। भोगिला शुद्ध सुखाचा सोहळा।
झालों भवदुःखा वेगळा। निरतर ॥

असे एक दिवस म्हणता येईल

## मंत्रांचे अर्थ व सकामता

काहीं मंत्रांचे अर्थ पाहिल्यानंतर, निष्कामतेचा नुसता वाचिक डांगोरा पिटणारे, कदाचित म्हणतील कीं, अनेक मंत्रांत कामनिक प्रार्थना आहेत. असें म्हणणारे लोक उदरनिर्वाहासाठीं वगैरे, पैसे मिळविण्याचा जो प्रयत्न करतात तो सकाम कीं निष्काम ? श्रीएकनाथ महाराज सकाम होते, असें म्हणण्याचें धाडस घेण्याशिवाय इतरास करवणार नाहीं, पण त्यांनी सप्तशतींतील सकाम वाटणारे मंत्र वापरलेच एकनाथ महाराज म्हणतात कीं, ज्याला खऱ्या परमार्थाची आवड असेल त्यानें कुटुंबपोषणासाठीं व अन्न वस्त्रासाठीं पैसे-धन-मिळविण्याचा प्रयत्न करू नये (ए भाग ) तसा प्रयत्न करणें म्हणजे 'योगक्षेम वहाम्यहम्' या भगवंताच्या प्रतिज्ञेवर पूर्ण विश्वास नसल्याचें सिद्ध करणें नाहीं काय ? प्रवचनें, कीर्तनें, करीत गावोगाव हिंडणें व पुढें जमतील ते पैसे घेणें सुद्धा सकामच ? असे प्रयत्न करण्यापेक्षा गायत्री, सूर्य, वरुण, जल, इत्यादि सर्व देवता, परमात्मस्वरूप जाणून, व्यावहारिक योगक्षेमासाठीं त्यांना प्रार्थना करणें काय वाईट ? त्यांच्या कृपेनें तें सकाम कर्मच श्रद्धा व निष्ठानुसार निष्काम बनवील नवीन मुंज झालेला बटु किंवा नवविवाहित तरुण यांनीं पूर्ण निष्काम बनणें, अशक्यप्राय आहे

सकाम वाटणाऱ्या मंत्रांत कुटुंबासहित योगक्षेम चालविण्यास आवश्यक असलेल्यापेक्षा जास्त मागितलेलें नाहीं तेवढीहि याचना करणे ज्यांना अयोग्य वाटेल ते आजारी पडले, अर्धपोटीं राहण्याची पाळी कुटुंबावर आली, देह दुर्बळ झाला व पतिव्रता जिजाईप्रमाणें पत्नी लाखोली वाहू लागली व मुलें रडून आक्रोश करू लागलीं म्हणजे किती निष्कामाची शान्ति टिकेल व जप करतांना एकाग्रता होईल ? शिवाय मंत्रांतील सकाम वाटणाऱ्या शब्दांचा अर्थ निष्काम दृष्टीनें लावला म्हणजे झालें उदा० 'सप्तशतीचें अनुष्ठान म्हणजे सकाम अनुष्ठान!' असें कोणी म्हणतात, कारण त्यांत 'पुत्रान् देहि धनं देहि यशो देहि द्विषो जहि' अशा प्रार्थना आहेत पु नांवाच्या नरकापासून तारणारा तो पुत्र, असा खरा पुत्र म्हणजे अपरोक्ष आत्मज्ञान व प्रेमभक्तिरस धन म्हणजे 'अभय सत्त्वसंशुद्धि' इत्यादि गीतेंत सांगितलेली मोक्षदायक दैवी संपत्ति यश

म्हणजे परमार्थसाधनात सफलता, पण कामक्रोधादि महावैऱ्याचा, आशाचा समूळ नाश झाल्याशिवाय तें शक्य नाहीं, म्हणून 'द्विष' म्हणजे काम क्रोधादि महाशत्रु, याना जहि = ठार मार असा अर्थ घेतला म्हणजे त्या मत्रात सकामता कुठें राहिली? '**काम एष क्रोध एष विद्ध्येनमिह वैरिणम्**' (भ गी ) या अर्थाना श्रुतींत सुद्धा भरपूर आधार आहेत '**श्रद्धापत्नी**' (त्रिसुपर्ण ) प्राणाग्निहोत्र–उपनिषदात सपूर्ण रूपकच आहे '**माधुकरमातरम्**', '**श्रद्धाकलत्रम्**', '**वैराग्यजनकम्**', '**ज्ञान-नन्दनम्**' असें एका उपनिषदात म्हटलें आहे

अणुशक्ति चागली की वाईट? असा विचारल्यास भौतिकविज्ञान विशारद सागतील की चागलेपणा किंवा वाईटपणा तिच्यात नसून, तो उपयोग करणारावर अवलबून आहे तिनें जगाचा सहार करणारा घोर राक्षस ठरेल व जीवाना सुख देण्यासाठीं उपयोग करणारा सज्जन ठरेल असेंच अग्नि, जल, वायु, तलवार, अन्न इत्यादींचें आहे तसेंच सकाम दिसणाऱ्या मत्राचें आहे निष्काम दिसणाऱ्या कृष्णाय नम , रामाय नम , इत्यादि सात्विक मत्राचा सुद्धा, ते सिद्ध झाल्यावर जारण, मारणादि निंद्य, घोर कर्मांत उपयोग करता येतो त्या सह्रा अभिचारकर्मांचा विधिहि मत्रशास्त्रात सागितलेला आहे गायत्री मत्राचा सुद्धा अभिचार कर्मांत उपयोग करण्याचे विधि सागितलेले आहेत पण त्या विषयींची माहिती '**गायत्रीचे सकाम प्रयोग**' या प्रकरणात मुद्दाम दिली नाहीं मत्रशास्त्रात सागितलेले जारण, मारण, उच्चाटनादि प्रयोग क्षत्रियानीं धर्मसरक्षणासाठीं, प्रजासरक्षणासाठीं, राष्ट्रसरक्षणासाठीं करणें दोषार्ह नाहीं दुष्टाचा नाश, थोड्याचा नाश केल्याशिवाय सज्जनाचें, बहुजन समाजाचें परित्राण, सरक्षण भगवताच्या अवताराना सुद्धा करता येत नाहीं अभिचारप्रयोग ब्राह्मणानीं स्वसरक्षणासाठीं वाटल्यास करावे, पण क्षत्रियादिकाचे आश्रित, सेवक, दास, गुलाम बनू नये असें शास्त्र सागतें

साठ वर्षांचे झाले तरी पूर्ण ब्रह्मचर्य सुद्धा पाळवत नाहीं, कुटुब पोषणासाठीं नोकरी, म्हणजे कुत्र्याच्याहिपेक्षा हीनवृत्ति, स्वीकारण्यात व गुलामगिरी पत्करण्यात ज्या ब्राह्मणाना भूषण वाटतें, चहा, विडी इत्यादि

व्यसनें सोडण्या इतकासुद्धा इन्द्रियनिग्रह करवत नाहीं, त्यांनीं वेदमन्त्रातील भासमान असभ्यतेवर आक्षेप घेणें हास्यास्पद नाहीं काय[1] 'सेवा श्ववृत्ति-राख्याता' अशीं काहीं वचनें आहेत, त्यावर म्हटलं आहे कीं,

'सेवा श्ववृत्तिर्यैरुक्ता न सम्यक् तैरुदाहृतम् ।
स्वच्छन्दचरितः क्व श्वा विक्रीतासुः क्व सेवकः ॥
पणीकृत्यात्मनः प्राणान् ये वर्तन्ते द्विजाधमा ।
तेषां दुरात्मनामन्नं भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥' (रा च )

ज्याना संध्यादि विहित कर्में करण्याची इच्छा नसते, ते असे काहीं तरी असंबद्ध प्रलाप काढून, कामनाचे व कामदेवाचे दास असूनसुद्धा प्रतिष्ठा व ब्राह्मणपणा याचें सोंग करीत असतात स्वहितसाधकानीं व मानवतेची पूर्ति करण्याची इच्छा असणारानीं अशा आक्षेपाना काडीचीहि किंमत न देता 'कुत्तर भुसत है भुकया दे' ( कबीर ) या मानसिक भावनेनें वेद-निंदकाची संगति टाळावी, व वादविवाद करू नये ( वरील श्लोकाचा अर्थ देणें मुद्दाम टाळलें )

गूळ गोड, आंबट कीं खारट[1] अशा शंकाचें समाधान वादविवादानें ब्रह्मदेव सुद्धा करू शकणार नाहींत विश्वासार्ह व्यक्तीवर विश्वास ठेवून, तो चाखून पाहिल्याशिवाय चवीचा निर्णय करता येणार नाहीं श्रुति स्मृति-पुराणें व रामायणमहाभारतरूपी इतिहास, आणि याना शिरोधार्य मानणारे श्रीज्ञानेश्वर, एकनाथ, तुकोबा व समर्थ रामदास यांच्यासारखे संत आणि भगवान् परमेश्वर हेच खरे जीवमात्राचे आप्त, सुहृद आहेत, बाकी सर्व

'सुर नर मुनि सर्वांही रीती । स्वार्थास्तव सब करिती प्रीति'
(तु रा )

श्रुति स्मृति पुराण व इतिहास हे भगवताचे निःश्वास आहेत ( बृह० २।४।१० ) म्हणून त्याच्या वचनावर आणि सुहृदाच्या वचनावर विश्वास युक्त श्रद्धा ठेवून जे कोणी सदाचारसंपन्न राहून स्नानसंध्यादि शास्त्रकथित आवश्यक कर्में यथाधिकार, यथाविधि करतील त्याना जास्तींत जास्त एक वर्षाच्या आत अनुभव येईल कीं समाधान, आरोग्य, उत्साह व स्वान्त सुख याची थोडी वृद्धि झाली आहे

फार कमाला, संध्येंतील सर्व मंत्रांचा अर्थ न जाणणारे केवळ गायत्री मंत्राचा अर्थ लक्षांत ठेऊन उषःकाळीं किंवा निदान सूर्योदयाच्या आधीं गार पाण्यानें स्नान करून गायत्री जप १०८ करून मग संध्या यथाविधि करून सूर्योदयानंतरावर उपस्थान किंवा गण्पाठसमाप्ति करण्याचा नियम कांहींहि झालें तरी जो सोडणार नाहीं, त्याच्या पायावर वैराग्य लोटांगण घालीत येऊन पडेल, मरणभीति पळून जाईल, मात्र त्यानें अहिंसा, सत्य इत्यादि यमनियमांचें पालन करण्याचा एकनिष्ठेनें प्रयत्न केला पाहिजे 'परधन विषाहुनी विष भारी' समजून सदाचारानें व नीतीनें वागलें पाहिजे त्यानें त्याचा असा निश्चय होईल कीं मरण जेव्हा, जेथें, ज्या प्रकारें यावयाचें असेल तेव्हा, तेथें, त्या प्रकारें तें यावयाचेंच व तोंपर्यंत तो योग येत नाहीं तात्पर्य अगदीं गुरुपणीं मोठ्या सुपारीएवढा असलेला सोमलाचा खडा आत्महत्या करण्याच्या हेतूनें खाल्ला तरी कांहींहि उतारा दिला नसताहि मरण येत नाहीं, १०६॥ डिग्री ताप मुदतीचा असतां विहिरींत उतरून पहाटेस स्नान करून संध्या वेळेवर करण्याइतकी शक्ति येते व ताप वाढत नाहीं, नदीच्या डोहांत पहाटेस व सायंकाळीं, घोर अरण्यांत स्नान करीत असतां त्या डोहांत आडव्यापासून दिसत असलेल्या मगरींना, सुसरींना त्याच्याकडे येण्याची सुद्धा इच्छा होत नाहीं, स्नानाला तशा डोहावर जातांना पहाटेस वाघाच्या डरकाळ्या व अस्वलाच्या आरोळ्या कानीं येत असल्या तरी त्याचें पाऊल मागें वळत नाहीं, व वाघ अस्वली त्याच्याकडे येत नाहींत पहाटेस जपास प्रारंभ करतांना डोक्याजवळील खुंटीवर असलेला नाग दिसला तरी त्याच्याकडे लक्ष न जातां जप एकाग्रतेनें करतां येतो व तो नाग त्याच्याकडे येत नाहीं, इत्यादि अनुभव सुद्धा येतील त्या पूर्वानुभवावरून तो पूर्ण निर्भय होऊन वृद्धपणीं सुद्धा वाटेल त्या परिस्थितींत सदा प्रसन्न व उत्साही राहू शकेल आजारीपणा, निर्धनता इत्यादि प्राप्त होऊन सुद्धा कसलीहि चिंता त्याला स्पर्श करणार नाहीं भगवंतावर व प्रारब्धावर पूर्ण निष्ठा व दृढ निश्चय मात्र पाहिजे

स्वतःचींच दोन चित्रें–संध्या वगैरे नित्यकर्म अव्यवस्थित, अनियमितपणें करणाऱ्या स्वतःच्या अंतःकरणाचें व आरोग्य वगैरेंचें ३६ व्या वर्षापर्यंतचें एक चित्र आणि संध्या वगैरे यथाविधि, यथासमय, करणाऱ्या

अत करणाचें व आरोग्यादिकाचें दुसरें बदललेलें चित्र ५० व्या वर्षापर्यंतचें स्वतःच पाहिलें, (इतरानाहि दिसले असेल), त्यामुळें, हा इतरास सागत असे कीं सदाचारी व नीतिसपन्न राहून, कुपथ्याचा त्याग करून,

'जेणें विठ्ठलमात्रा घ्यावी। तेणें पथ्यें साभाळावीं॥ – तुकोबा

सूर्योदयापूर्वीं सर्व सध्या १२०० गायत्रीयुक्त करून, सूर्योदयाचे वेळीं सूर्यासमोर उभें राहून उपस्थान (अर्थ न कळताहि) मत्राचा उच्चार निदान सहा महिने तरी करून पाहा, आणि सुख, समाधान व आरोग्य याची, त्ययात अर्धा आणासुद्धा वृद्धि न झाली तर हा एका बाजूचीच मिशी ठेवील। आश्रमावर झाल्यावर अशाच काहीं अन्य प्रकारे सागत आला आहे, व त्यामुळें पुष्कळ सुशिक्षित, पदवीधर इ. लोक वेळेवर सध्या करू लागले व त्यानींहि स्वानुभवानें अनेकास प्रवृत्त केलें त्यात असा अनुभव आला कीं निदान मॅट्रिकपर्यंत तरी शिकलेले ब्राह्मण, त्याना पटलें म्हणजे, दभ न करता, अगदीं व्यवस्थितपणें, नियमानें सध्या करू लागतात, तेवढ्या श्रद्धेनें, नियमानें व देखावा न करता अर्धशिक्षित, व 'सनातनी' म्हणून मोरखळ, वाचिक अभिमान धारण करणारे करीत नाहींत! हा थोडा जास्त विस्तार गायत्रीच्या स्वानुभूत प्रभावानेंन करविला! अगदीं पूर्ण निरक्षर सुद्धा सद्भावनेनें व्यवस्थित करू लागतात, पण असे द्विजात नाहींतच असें म्हणणें फारसें चुकीचें ठरणार नाहीं द्विजेतरात असे पुष्कळ आहेत, पण त्याचा द्विजाच्या सध्येशीं सबध येत नाहीं, इतर कर्में ते यथाविधि यथाकाल करतात व आम्हीं प्रणवाचा, गायत्रीचा, जप का करू नये असें विचारीतसुद्धा नाहींत

## सद्यःपरिस्थिति-अवनति व ब्राह्मणपरक्षण

उत्पत्तिरेव विप्रस्य मूर्तिर्धर्मस्य शाश्वती।
स हि धर्मार्थमुत्पन्नो ब्रह्मभूयाय कल्पते॥ [ मनु ]
ब्राह्मणा जंगमं तीर्थं निर्मलं सार्वकामिकम्।
येषां वाक्योदकेनैव शुद्ध्यन्ति मलिना, जनाः॥ ( अगस्त्य )
यत्क्रोधभीत्या राजाऽपि स्वधर्मनिरतो भवेत्॥ (शुक्रनीति)

एतद्देशप्रसूतस्य सकाशात् अग्रजन्मनः।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥ ( मनु, )

वरील वचनाचें सार हेंच कीं "ब्राम्हणाची उत्पत्ति म्हणजे धर्माची मूर्ति, ब्राम्हण म्हणजे हिंडतें फिरतें तीर्थ, त्याच्या शब्दरूपी जलानें इतर मलिन-पापी शुद्ध होऊं शकतात. या देशात जन्मलेल्या ब्राह्मणापासून जगातील मानवानीं चारित्र्याचें-शीलाचें शिक्षण घ्यावें " कोणी म्हणतील कीं 'या फार पुरातन काळातल्या, इतर युगातल्या गोष्टी!' पण अगदीं शंभर वर्षांपूर्वी मॅक्स मूलर या पाश्चात्य महापंडितानें हिंदुस्थानातील ब्राह्मण समाजाविषयीं काय म्हटलें आहे तें पहा. भारत देशाला हिंदुस्थान देशाला – ख्रिस्तिस्थान बनविण्यासाठींच ज्यानें सर्व खटपट केली त्याचें मत व अनुभव पहा ब्राह्मणाचें चरित्र, चारित्र्य याविषयीं एका पत्रात त्यानीं लिहिलें आहे कीं –

With hardly one exception they have displayed a *far greater respect for truth and far more* manly generous spirit than we are accustomed to, even in Europe and America आम्हा युरोपातील व अमेरिकेतील माणसापेक्षाहि भारतातील ब्राम्हण सत्य आणि मानवोचित उदारपणा यात अधिक श्रेष्ठ आहेत ? त्यात कुठें एकहि अपवाद सहसा सापडत नाहीं

ज्या ब्राह्मण समाजाची स्थिति अशी, परधर्मियानीं, ख्रिस्ती धर्माच्या कट्टर भक्तानीं प्रशंसा करण्यासारखी, सुमारें १०० वर्षांपूर्वी होती, त्या ब्राह्मणवर्गाची आज काय स्थिति आहे! हा फरक कशानें पडला ? तें ब्राह्मण्य, ती सत्यनिष्ठा, ती उच्च मानवता, तें तेज, इत्यादि कुठे गेलें व कशामुळें ? याचें मुख्य कारण बहुसंख्य ब्राह्मणवर्ग स्वधर्मच्युत झाला हा परिणाम १९२१ पासूनच्या काळात फारच झपाट्यानें झाला ज्या मॅक्स-मुल्लर साहेबानीं वरील वाक्यें खाजगी पत्रात लिहिलीं, त्यानींच गुप्त हेतूनें केलेल्या बुद्धिभेदाचाहि परिणाम झाला नाहीं असें नाहीं पुरुषार्थ मासिकाच्या १९५८ च्या अंकातील त्या गुप्त हिंदुधर्मशत्रूचीं पत्रें मुद्दाम पाहावीं

सर्वोत्तम, सर्वस्वप्रदायक अशा मंत्रानें परमतेजोमय देवतेची, दृश्य ब्रह्माची संध्यारूपानें उपासना. सदाचाराचें व यमनियमाचें पालन याचा अभाव गेल्या ४० वर्षांत फारच जोरांत होत राहिला. त्याचा परिणाम म्हणजे राष्ट्रपुरुषाच्या शिरस्थानीं असलेला ब्राह्मणसमाजच निस्तेज, निर्वीर्य ब्राह्मण्यरहित, व्यक्तिस्वार्थसाधु, सत्तालोलुप, प्रतिष्ठालोलुप झाला. त्यामुळें 'नि शंकं दीयते बालैः पदर भस्मचये पदम्' असें सहजच झालें त्या राखाडीच्या ढिगावून घोडाहा धूरमुद्रा निघत नाहींसा होतो, त्यावर लहान पोरेंसुद्धा निर्भयपणें नाचली तर दोष कोणाचा? डोकें बिघडलें की बाहु, मांड्या पाय सुदृढ, निरोगी असूनहि राष्ट्रपुरुषाचें, धर्मपुरुषाचें, समाजाचें व व्यक्तिदेहाचेंहि, यथोचित पालन, पोषण, रक्षण करूं शकत नाहींत; इतकेंच नव्हे तर उलट, बिघडलेल्या डोक्याच्या प्रेरणेनें बाहू, मांड्या व पाय किती व काय अनर्थ करतील याचा नेम नाहीं. असेंच घडलें व घडत आहे.

"ब्राह्मण्यस्य रक्षणादेव रक्षितः स्याद्वैदिको धर्मः"

ब्राह्मण्याच्या रक्षणानेंच वैदिकधर्माचें रक्षण होऊ शकेल, असें श्रीमत् शंकराचार्यांचें वचन आहे. सदाचारसंपन्न राहून, यथाकाल यथाविधि संध्योपासना केल्यानेंच ब्राह्मण्याचें रक्षण होऊं शकेल, आणि ब्राह्मण-समाजात ज्या प्रमाणात ब्राह्मण्य वाढेल त्या प्रमाणात राष्ट्रोन्नति, धर्मोन्नति, याची वृद्धि होऊन, सुखसमाधानाची, माणुसकीची, व सौजन्य वगैरेंची वृद्धि समाजात व राष्ट्रात होईल

विश्वामित्रासारख्या महातपस्वी महावीरानें, त्या महतेजापुढें

'धिग् बलं क्षत्रियबलं, ब्रह्मतेजोबलं बलम् ।
एकेन ब्रह्मदण्डेन हतं मे क्षत्रियं बलम् ॥'

असे उद्गार काढले, तें ब्रह्मतेज नमुन्यालासुद्धा दिसत नाहींसें झालें तें कशामुळें? 'ब्रह्मदंड' हें एक अस्त्र आहे, त्याचा मंत्र गायत्रीमंत्रानेंच बनलेला आहे; तो मंत्र 'गायत्रीचा महिमा' या प्रकरणात दिला आहे.

एक ८।१० वर्षांचा ऋषिकुमार, परीक्षितिसारख्या महाराजाला ब्राह्मणांच्या दारींचे द्वारपाळ (श्वान) म्हणतो आणि शाप देतो. आणि

त्याच्या शापापासून परीक्षितीची सुटका झाली कम शक्त नाहीं! हें जें ब्रह्मतेज तें सत्यनिष्ठादि यमनियमांचें, व धार्मिक शास्त्रोक्त आचारांचें पालन करून केलेल्या गायत्रीच्या अनुष्ठानानें प्राप्त होतें, इतकेंच नव्हे तर पित्याच्या, जनकाच्या ठिकाणीं असलेलें ब्रह्मतेज जन्मत च त्याच्या पुत्रात आनुवंशिकहि असतें हें वरील ऐतिहासिक उदाहरणानें सिद्ध होतें कारण त्या ८।१० वर्षांच्या बटूनें रीतीनें अनुष्ठान केलेलें असणार? जो शाप दिला तो सुद्धा पितृभक्तिजनित होता पित्याचा जाणून बुजून अपमान परीक्षितीनें केला असें त्या कुमारास वाटलें, म्हणून त्यानें शाप दिला अशी पितृभक्ति आठ दहा वर्षांच्या कित्ती ब्राह्मण कुमारात आढळते? त्या परमोत्कृष्ट तेजाची उपासना व सदाचारादिकांचें पालन याचा जसजसा ऱ्हास होत गेला तसतसें तें तेज कमी होत गेलें आणि असमाधान, अशांतता, रागद्वेष इत्यादि अनेकांना स्वसत्तेनें धुमाकूळ घालणें सोपें झालें

हल्लीं महाराष्ट्रात तरी क्षत्रिय व वैश्य यात द्विजत्व नामशेष झाल्या-सारखेंच आहे उत्तर हिंदुस्थानात तें अल्पप्रमाणात पण जागृत असल्याचें आढळून आलें हेंहि दिसलें कीं श्रीयुत जयदयाल गोयंदका सारखे लोकप्रसिद्ध त्यागी लोककल्याणेच्छु कार्यकर्ते, प्रवचनकार द्विज ( वैश्य ) त्रिकाळ सध्या योग्य वेळीं करतात, व सध्येच्या वेळीं प्रवचन वगैरे करीत नाहींत महाराष्ट्रात काय चालतें? चागले प्रसिद्ध प्रवचन कीर्तनकार, ब्राह्मणसुद्धा अगदीं प्रात सध्येच्या वेळीं सुद्धा मदिरात प्रवचन करतात, व जागा चागली मिळत नाहीं म्हणून पुष्कळ वेळ आधीच ब्राह्मण समाज जमतो!

आता तर ब्राह्मणवर्गांत कांहीं गृहस्थ सुद्धा जानवेंहि घालीत नाहींत व क्वचित् घातलेंच तर कार्य झाल्यावर तें खुटीला काढून ठेवतात! मुलाच्या मुजीच्या वेळीं घालतात व तो मुज झालला बटू दुसऱ्या दिवशींच बापास विचारतो कीं बाबा! अप्पा! दादा! मी जानव केव्हा काढून ठेवू व कुठें ठेवू? हें कपोलकल्पित नसून घडलेल्यातलें एक उदाहरण आहे पुण्यास सुद्धा लग्नाचें वय होऊन गलेले व आपली मुज व्हावी, असें वाटणाऱ्या पालकांच्या पुत्राच्या मुजी बापानें केल्याच नाहींत असे तरुण हल्लीं कित्ती तरी असतील!

काहीं देशभक्त, सत्याग्रही म्हटले जाणारे, सुशिक्षित ब्राह्मण, जे पूर्वी जानवें घालीत होते, पहाटेस स्नान करून निदान प्रार्थना तरी करीत होते, त्यांनीहि जानवें घालण्याचें बंद केलेलें आढळलें ते १९१७ पूर्वीचे मित्र होते त्यास (१९४५-४६ साल असेल) विचारता उत्तर मिळालें की, जानवें घालून जें करावयाचें तें मी करीत असतो तेव्हा त्यास म्हटलें गेलें की, अधिक काहीं न सांगता इतकेंच सुचवावयाचें आहे की, आपण प्रवाह पतित होऊन ब्राह्मण्य व महाराष्ट्रीयत्व विसरला आहात, याचा विचार करा तुमच्या सारख्या मोठे बनविलेल्या व मोठे झालेल्यास, एका अगदीं अप्रसिद्ध अति छोट्या सन्याशानें अधिक सांगणें योग्य नाहीं जे १९१८ च्या पूर्वी, शिवाजी राजाची निंदा करणाऱ्याच्या नरडीचा घोट घेण्या-इतके सतप्त होत असत, ते स्वत च देशभक्त बनल्यावर शिववाची निंदा स्वत व्याख्यानादिकात करीत असत! याच्या उलट ज्याच्या घरीं भगवान स्वत सर्व कामें करीत असत, आणि गोदावरी-गंगेचें पाणी कावडीनें भरीत असत, ते मध्यान्हसंध्या-ब्रह्मयज्ञ दि करण्यासाठीं भरदुपारीं, अनवाणी, गंगेचें वाळवंट तुडवीत, गंगेवर जात होते!

येथें एवढेंच सुचवावयाचें आहे की, ब्राह्मणवर्गाचा हा अध पात असाच चालू राहिल्यास ब्राह्मणसमाज, हिंदुधर्म, व राष्ट्र याची अवनति अधिकाधिक होत जाईल व जी दुर्दशा होईल तिचें वर्णन न करणेंच चांगलें ब्राह्मणानीं आता तरी सावध होऊन ब्राह्मण्य संपादनाच्या सोप्या साधनाचा अवलंब करावा व न्यायानें धन मिळवून सदाचारी व नीतिसंपन्न व्हावें तो सदाचार कोणता हें पुढील अनेक प्रकरणात त्या त्या विषयाला अनुसरून शास्त्रवचनाधारें स्पष्ट केलें आहे मानवधर्मांतच नीतिधर्मांचा समावेश होतो, तें प्रथम दिलेंच आहेत

ब्राह्मण्यसंपादनाचें स्वाधीन, सुलभ व नित्यचर्येचें मुख्य साधन म्हणजे त्रिकाळ संध्या सांगोपांग यथाविधि करणें तें करण्यास कमीत कमी एक घटका व जास्तींत जास्त चार घटका प्रत्येक वेळीं पाहिजेत रोज १। तासमुद्धा या कार्यासाठीं खर्च करता येणें शक्य नाहीं अशी व्यक्ति असणें अशक्य इच्छा आस्था न भावना याच्या अभावामुळेंच हें घडत नाहीं, आणि आळस हेंहि एक कारण आहेच

अष्टांगयोगाचें साधनहि सध्येंत न कळत केलें जातें **यमनियमांचें** पालनरूपी मानवधर्म तर सर्व साधनाचा पाया आहे, तो पाहिजेच **आसन व प्राणायाम** सध्येंत आहेत, एवढेंच नव्हे तर सर्वोत्तम मन्त्रासहित आहेत इंद्रियांच्या बाह्य धावा थांबवून बलात्कारानें त्यांना आंत, ध्येयाकडे ओढल्याशिवाय एकाग्रता साधत नाहीं, म्हणून **प्रत्याहार** लागतोच व त्याचा हळूहळू अभ्यास होतो हृदय भ्रूमध्य इत्यादि कोणत्यातरी ठिकाणीं चित्ताला स्थिर ठेवल्याशिवाय, म्हणजे **धारणारूपी** साहाय्या साधनाशिवाय ध्यान साधत नाहीं ध्यान साधणें मुख्य आहे **ध्यान** जितकें जास्त एकाग्रतेनें व जास्त वेळ होईल तितका शुद्ध आनंदाचा लाभ जास्त होईल आणि दृढ अभ्यासानें, तळमळीनें व भगवती गायत्रीच्या कृपेनें **समाधि** सुद्धा साधेल, आणि दु खानुभवरहित आत्यंतिक सुखांत निरंतर राहतां येईल, व अशा एकाच्या संगतीनें शेंकडो लोक अधिकाधिक सुखी होतील

जे उपनीत द्विज जानवें घालतात व त्यांतील जे थोडे येडीवाकडी थोडी तरी सन्ध्या करतात ते सुद्धा जीं जानवीं घालतात तींहि शास्त्रशुद्ध नसतात जानवें कसें केव्हां वापरावें हें सुद्धा पुष्कळांस माहीत नाहीं। म्हणून **'यज्ञोपवीत'** प्रकरणांत आवश्यक तेवढी माहिती दिली आहे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनींच फक्त जानवें घालावें, इतरांनीं तें घालणें पाप आहे पण 'जानवें घालतो तो ब्राह्मण' असा मिथ्या भ्रम पसरल्यानें वाटेल ते लोक जानवें घालूं लागले आहेत, व ज्यांनीं घालणें कर्तव्य आहे ते घालीत नाहींसे झाले आहेत, आणि यालाच सुधारणा असें गोंडस नांव देतात सनातन हिंदु धर्माचीच अवनति झाली आहे असें नसून, अगदीं अलिकडे उत्पन्न झालेल्या दोन हजार वर्षांच्या आतल्या धर्मांचीहि अवनति झाली आहे, पण त्यांच्याशीं या ग्रंथाचा संबंध नसल्यानें अधिक विस्तार नको

ब्राह्मणस्य तु देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते ( न इष्यते ) ॥
कष्टाय तपसे चेह ( च इह ) प्रेत्याऽनन्तसुखाय च ॥

ब्राह्मणाचा देह क्षुद्र-तुच्छ-नश्वर कामनांच्या तृप्तीसाठीं दिलेला नाहीं, येथें कष्ट करून, ज्ञानरूपी तप करून इहलोकीं व देहनाशानंतर शाश्वत अनंत सुखासाठीं तो दिलेला असतो संत म्हणतात 'आधीं कष्ट मग फळ।

कष्टनि नाहीं ते निर्फळ॥ ( दा बो ) 'कणाची यरि माजिभाक्री। तूपसाखरे चोरु नको॥' ईश्वरानुग्रहानें नरदेह व त्यात श्रेष्ठतम ब्राह्मणदेह मिळतो

ईश्वरानुग्रहानें मिळालेल्या मनुष्यदेहाचा द्विजदेहाचा, सदुपयोग करून मानवधर्मांच्या तीस लक्षणाची प्राप्ति व परिपूर्णता केली गेली तरच जन्ममरणरूपी कल्पनातीत दुःसह दुःखें, कष्ट, चुकतील, नाहीं तर येथेंहि पूर्ण समाधान, शांति कधीं मिळत नाहीं, आणि मेल्यावर अपार यमयातना भोगाव्या लागतात त्या यातना, ते कष्ट कायमचे टाळण्यास त्रिकालसंध्या वगैरे कर्मांनीं व उपासनेनें ते तीस गुण संपादन करणें सोपें आहे त्या तीस गुणाची प्राप्ति करून घेण्याची ज्याची लायकी आहे तेच जीव मानवजन्मास येतात मानव देह हा स्वतंत्र ( आत्मतंत्र ) तेचा ताम्रपट आहे.

उपनयन झाल्यानतरच त्रैवर्णिकाना सध्योपासना करण्याचा अधिकार प्राप्त होतो, म्हणून उपनयन व पुनरुपनयन याविषयीं थोडी माहिती पुढें एका प्रकरणात दिली आहे

॥ जय जय संध्ये आदिशक्ति जय ॥

० ० ०

प्रकरण २ रें

# संध्योपासना

> अहरहः संध्याम् उपासीत ।
> य संध्याम् उपासते ब्रह्म एव तदुपासते । ( श्रुति )
> संध्यात्रयं तु कर्तव्यं द्विजेनात्मविदा सदा ॥ ( अत्रि )
> यः त्रिसंध्यं उपासीत ब्राह्मणः श्रद्धयान्वितः ।
> तत्तेजः वर्धतेऽत्यन्तं-घृतेनेव हुताशनः ॥ ( स्मृति )
> विप्रो वृक्षः तस्य मूलानि संध्या ।
> वेदाः शाखाः धर्मकर्माणि पत्रम् ।
> तस्मात् मूलं यत्नतः रक्षणीयं ।
> छिन्ने मूले नैव वृक्षो न शाखाः ॥ ( दे. भा )

विप्र हा एक वृक्ष आहे संध्या त्याचीं मुळें आहेत चार वेद त्याच्या मोठ्या शाखा आहेत धर्म व धर्मादिकर्में त्याचीं पानें आहेत, म्हणून संध्यारूपी मुळाचें प्रयत्नपूर्वक रक्षण केलें पाहिजे मुळेंच तुटलीं कीं मग वृक्ष, शाखा इ. कांहींच नाहीं (याच अर्थाचा श्लोक विश्वामित्रकल्पामधें आहे ) भाव हा कीं त्रिकाळसंध्या ब्राह्मणानें जर केली नाहीं तर वेदाध्ययन, इतर सर्व धर्मकर्में व धर्माचरण हीं व्यर्थ होत व तो नावाचा ब्राह्मण राहतो

**मूलानि संध्या**–म्हणून कमींत कमी तीन असा अर्थ होतो श्रीमद्-भागवतात आदिवृक्षाच्या वर्णनात सुद्धा 'एकायनोऽसौ द्विफल त्रिमूलः' तीन मुळें असलेला असंच म्हटलें आहे येथील तीन मुळें म्हणजे प्रात-संध्या, मध्यान्हसंध्या व सायंसंध्या

'ब्रह्मादयोऽपि संध्यायां तां ध्यायन्ति जपन्ति च ॥

वेदा जपंति तां नित्यं वेदोपास्या ततः स्मृता ॥ (दे भा)

ब्रह्मादिक देवसुद्धा संधिकाळीं सध्येचें ध्यान व जप करतात म्हणून तिला वेदोपास्या म्हणतात.

सध्योपासना म्हणजे काय? संध्या + उपासना = सध्योपासना उप- समीप, आसनम्-बसणे, एखाद्याच्या अगदीं जवळ गादीला गादी लावून त्याच्या सिंहासनावर, त्याच्या गादीवर शेजारीं बसणें म्हणजे उपासन हा अधिकार ही लायकी प्राप्त होण्यासाठीं सेवा, पूजा, आज्ञापालन, स्तुति, प्रार्थना इत्यादि जें साधन करावयाचें त्याचें नाव उपासना सध्येची जी उपासना ती सध्योपासना दशरथ राजास इंद्र आपल्या शेजारीं सिंहासनावर बसवीत असत दोघाची पात्रता, लायकी सारखी ठरते तेव्हाच हें घडतें

सध्या म्हणजे काय?

सध्या शब्दाचे येथें अनेक अर्थ आहेत, व त्याप्रमाणें सध्योपासनेचेहि आहेत ते -(१) संध्येति सूर्यगं ब्रह्म-सूर्यमडलातील ब्रह्म म्हणजे सध्या (अत्रि) (२) संध्या नाम चिच्छक्तिरूपा देवता-

या संध्या सा जगत्सूतिः मायातीता हि निष्कला ।

ईश्वरी केवला शक्तिः तत्त्वत्रयसमुद्भवा ॥ (गौतम)

सध्या म्हणजे चित्शक्तिरूपी देवता जी सध्या तीन जगाची उत्पत्ति वगैरे करणारी, मायातीत पूर्ण अशी केवळ ईश्वरी शक्ति 'या संध्या सैव गायत्री, सावित्री च सरस्वती ॥' सध्या म्हणजेच गायत्री, सावित्री, सरस्वती (३) उपासनं संध्या सूर्यस्य (व्यास) सूर्याची उपासना म्हणजे सध्या (४) 'संधौ भवा क्रिया संध्या' (व्यास) सधिकाळात केली जाणारी जी क्रिया ती सध्या

या चार अर्थानुसार 'संध्योपासना'चे तीन अर्थ होतात.-

(१) सधिकाळीं केली जाणारी सूर्यमंडलान्तर्गत ब्रह्माची जी उपासना ती संध्योपासना

(२) सधिकाळीं केली जाणारी सूर्यमंडलातर्गत सच्चिदानदस्वरूपिणी आदिशक्ति सावित्रीची-गायत्रीची, जी उपासना ती संध्योपासना.

(३) संधिकाळीं केली जाणारी सूर्याची जी उपासना ती संध्योपासना.

अधिकारभेदानुसार हे तिन्ही अर्थ उपयुक्त व योग्य आहेत या तीन अर्थानुसार गायत्रीमंत्राचेहि तीन अर्थ आहेत

ही उपासना कशी करावयाची? ' तस्य (तस्याः) दासोऽहम् अस्मि, इति, स. (सा) अस्मि इति वा मतिः ' भवेत् उपासकस्येति ह्येवं वेदविदो विदु.' (स्मृति) त्याचा तिचा मी दास आहे, अथवा तोच-तीच-मी आहे, अशी उपासकाची बुद्धि भावना असावी, होईल असें वेद वेत्त्यानीं जाणलें आहे सूर्यबिंबातर्गत ब्रह्माचें म्हणजे सूर्यरूपी ब्रह्माचें, सूर्यबिंबातर्गत गायत्रीदेवीचें, किंवा सूर्याचें, तो (ती) च मी आहे किंवा त्याचा (तिचा) मी दास सेवक आहे अशा भावनेनें ध्यान चिंतन करणें म्हणजे संध्योपासना—सध्योपास्ति—सध्यावदन

सधिकाळात केलें जाणारें कर्म हा अर्थ फार व्यापक आहे वर दिलेले अर्थ आणि हा अर्थ यातील भेदामुळेंच सध्याकाळ कोणता याचें कथन दोन प्रकारानीं केलेलें आढळतें गायत्रीमंत्राचा ध्यानयुक्त जप करण्याचा काळ व आचमन प्राणायामादिपासून करावयाच्या कर्माचा काळ असे दोन प्रकार होतात.

संध्याकाळ—

' उत्तमा तारकोपेता, मध्यमा लुप्ततारका
अधमा सूर्यसहिता प्रात सध्या त्रिधा मता ।
उत्तमा सूर्यसहिता मध्यमा लुप्तभास्करा । (लुप्ततारका, पा भे)
अधमा तारकोपेता साय सध्या त्रिधा मता ॥ [ मनु इत्यादि )

तारे असता सध्या करणें हा उत्तम काळ, पण तारे मध्यरात्रीं सुद्धा असतात म्हणून दुसऱ्या एका स्मृतींत सांगितलें आहे कीं ' उदयात् प्राक्तनी संध्या घटिकात्रयमुच्यते. ' म्हणजे प्रात. सध्येचा उत्तम काळ सूर्योदयापूर्वी तीन घटका व उपलक्षणानें सायसध्येचा हि सूर्यास्तापासून तीन घटका आचमनापासून आरंभ करण्याचा हा काळ आहे असें कोणास वाटेल म्हणून अत्रिस्मृति वगैरेंत सांगितलें आहे कीं—

संध्याकाल• प्रागुदयात् निम्नस्य द्विमुहूर्तकः ॥
क्षत्रियस्य तदर्धे वा, तदर्धे स्यात् विशोऽप्युत ॥

प्रात सध्येचा उत्तम काळ ब्राह्मणाना सूर्योदयापूर्वी दोन मुहूर्त म्हणजे चार घटका, तसाच क्षत्रियाना व वैश्याना, पण 'वा' शब्दानें सुचविलें आहे कीं, त्यानीं दोन घटिका घेणें दोषाई नाहीं सायसध्येचा काल स्कद-पुराणात सागितला आहे तो –

रवेरस्तमयात् पूर्वं घटिकैका यदा भवेत् ।
सायं संध्यां प्रकुर्वीत

सूर्यास्ताला एक घटका असता सायसध्या सुरु करावी म्हणजेच सूर्योदयापूर्वी चार घटका प्रात सध्येतील आचमनादि कर्मास प्रारभ करावा हा उत्तम काळ, आणि सूर्यास्ताला एक घटका असता आचमनादि सुरु करावें या पुस्तकात दिलेल्या, आचमनापासून न्यासमुद्रापर्यंतच्या सर्व कर्मास एक घटका भरपूर होते, असा अनेकाचा अनुभव आहे अशा रातीने सकाळीं प्रात काळापूर्वी व सायकाळीं सूर्यास्त होण्यापूर्वी अर्घ्ये देता येतात, व मुख्य सध्येचा तीन घटकाचा उत्तम काळ साधतो पुढें गायत्रीजप प्रकरणात साधार सिद्ध केलें आहे कीं, संध्येतील सर्वात मुख्य कर्म म्हणजे गायत्रीचा ध्यानयुक्त जप

**ध्यान–** तीन प्रकारच्या ध्यानात सूर्यबिंबातर्गत ब्रह्माचें ध्यान सर्वात श्रेष्ठ, कारण त्यानेंच, ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवाला ब्रह्मरूप झाल्याचा अनुभव येतो, म्हणजेच दु सरहित नित्य शुद्ध सुखाची, जीवन्मुक्तीची प्राप्ति होते, मानवत्वाची परिपूर्णता होते ज्याना हें ध्यान साधत नाहीं त्यानीं दुसऱ्या प्रकारचें, व तेंहि साधण्यासारखें नसेल त्यानीं तिसऱ्या प्रकारचें म्हणजे लालभडक सूर्यबिंबाचें ध्यान करावें नवीन मुज झालेल्या मुलालाहि हें सहज साधेल, पण त्यास ध्यानाविषयीं काणी काहींच सागत नाहींत! सूर्यबिंबध्यानाला प्रथम प्रारभ करावा, म्हणजे अभ्यासानें व गायत्रीच्या कृपेनें क्रमशः सहज प्रगति होईल, होते व शेवटची पायरी गाठता येते

**द्विजत्व प्रात झाल्यापासून आमरणान्त संध्या केलीच पाहिजे–** सध्यापासना करणे म्हणजे ब्रह्माचीच उपासना करणें होय या अर्थाची

श्रुति प्रारभींच दिली आहे, तसेंच आत्मविद् ( = आत्मज्ञानी ) पुरुषानेंहि तिन्ही काळीं रोज सध्या केली पाहिजे या अर्थाचें अत्रिस्मृतीचें वचन प्रारभींच दिलें आहे श्रीएकनाथ महाराजहि त्रिकाळ सध्या करीत होते मग इतरानीं न करून कसें समाधान लाभेल ?

**शंका**–'सध्याम्' असे एकवचन श्रुतीनें वापरलें असता त्रिकाळ सध्या का ?

**समाधान**–केवळ वेद श्रुति म्हणजेच धर्मशास्त्र नव्हे 'श्रुतिस्मृती उभे नेत्रे पुराण हृदय स्मृतम्' इत्यादि पूर्वींच सागितलें आहे आणि श्रीशंकराच्या ओव्याहि दिल्या आहेत केवळ अत्रिस्मृतींतच त्रिकाळ सध्येची आवश्यकता सागितली आहे असें नाहीं

'एतत् सध्यात्रयं प्रोक्तं ब्राह्मण्यं यदधिष्ठितम् ।
यस्य नास्त्यादर॰ तत्र न स ब्राह्मण उच्यते ॥

( छादोगपरिशिष्ट, गोभिल स्मृ )

अशीं आणखी अनेक वचनें स्मृतींत व पुराणात आहेत पराशर स्मृतींत (जी कलियुगात मुख्य प्रमाण आहे) तर स्पष्ट सागितलें आहे कीं जो मध्यान्ह सध्या करणार नाहीं तो अन्धतामिस्र नरकात जाईल (अ २।२४-२७) याचें कारणहि तेथें दिलें आहे मध्यान्ह सध्याकालनिर्णय गायत्रीजप प्रकरणात पहावा म्हणजे नोकरी वगैरे कारणानीं ही सध्या करणें अशक्य वाटणार नाहीं

**शंका**.– सूर्यमंडलातर्गत ब्रह्माचें ध्यान गायत्रीमत्राचा जप करीत करणें हेंच जर सध्येंतील मुख्य कर्म आहे तर विष्णु राम, कृष्ण शकर, गणपति, इत्यादिसुद्धा ब्रह्मस्वरूप, परमात्माच आहेत व त्याचे मत्रहि भोग ज्ञान-मोक्षदायक आहेत, मग त्याच्या मत्रानें त्याचें ध्यान का करू नये ?

**समाधान** –ब्रह्म म्हणजे ज्याच्यापासून, ज्याच्यामुळें जगाची उत्पत्ति, स्थिति आणि सहार होतात तें तें निष्क्रिय निरजन निर्गुण, निराकार, कार्यकारणातीत अदृश्य अग्राह्य इत्यादि प्रकारचें आहे, राम, शिव, कृष्ण इत्यादि जरी ब्रह्मस्वरूप असले, आणि उत्पत्ति वगैरे कार्यें होत असलीं तरी वृष्टि, धान्य, वनस्पति, प्राणी इत्यादि त्याच्यामुळेंच उत्पन्न

होतात, जगतात व नाश पावतात हें प्रत्यक्ष अनुभवास येतें काय ? जो कोणी या देवाची उपासना करू लागतो त्यानें त्या देवास पाहिलेलें नसतें चोवीस वर्षे, जन्मभर, उपासना करूनसुद्धा बहुतेकास ते दिसत नाहींत त्याच्यामुळेंच पाऊस पडतो, धान्य पिकतें, अन्न पाणी, प्रकाश, उष्णता मिळतात व जगाचे व्यवहार त्याच्याच प्रेरणेनें चालतात हें प्रत्यक्ष प्रयोगानीं वगैरे सिद्ध करता येत नाहीं, इत्यादि अनेक गोष्टी आहेत

सूर्य सर्वांना दिसतो जन्माधाला सुद्धा त्याचें अस्तित्व व त्याच्या उदयास्ताचे परिणाम कळतात सूर्याच्या किरणातील उष्णतेनें जलाची वाफ होऊन ढग बनतात व पाऊस पडतो सूर्याचें ऊन फार दिवस पडलें नाहीं तर धान्य नीट पिकत नाही व मनुष्याना सुद्धा ते दिवस दुर्दिन वाटतात 'मेघच्छन्नेऽन्हि दुर्दिनम्' त्यात उत्साह वाटत नाही व केव्हा एकदा सूर्यदर्शन होईल असें वाटू लागतें

महाराष्ट्रात थडींत सूर्य ११।१०॥ तास च उगवलेला असतो, म्हणजे दिवसाच्या १२ तासापेक्षा तास सवा तासच कमी राहतो, तर 'फार थडी!' करू लागतात चिमण्या वगळे, डास इ जतु व कधीं कधीं काहीं माणसें सुद्धा थडीनें गारठून मरतात ' मग जर सूर्य चोवीस तास उगवलाच नाही तर काय, याची कल्पना ८।१० वर्षांच्या मुलाला सुद्धा करता येईल तसें झालें तर मनुष्यासुद्धा सर्व प्राणी मरून जातील उन्हाळ्यात महाराष्ट्रात सूर्य बारा तासापेक्षा फक्त १।१। तासच जास्त राहतो तर उन्हाळ्याचा किती त्रास ? काहीं माणसें ऊष्माघातानें (सनस्ट्रोकनें) पटापट् मरतात सुध्दा ! सूर्य जर एक दिवस मुळींच मावळला नाहीं, तर सर्व प्राणी, वनस्पति मरून जातील ना ? यावरून कोणासहि पटेल कीं जगाचें जीवन सूर्यावर अवलबून आहे मिनिट, तास इ काळाची गणना सूर्यावरच अवलबून आहे वनस्पतींचे, पत्रपुष्प फलादिकाचे विविध रग व सृष्टिसौंदर्य सूर्यामुळेंच असतें प्राण्याचे व्यवहार सूर्याच्या उदयास्तावरच अवलबून असतात, इत्यादि जसें कोणाहि मनुष्यास कळतें, तसें विष्णु, शकर, गजानन इत्यादींच्या बाबतींत कळणें शक्य नाहीं सूर्य लहान मुलास सुध्दा प्रत्यक्ष दिसतो सूर्य म्हणजे प्राण्याच्या क्रियाना, प्राणाना, प्रेरणा देणारा ( अ. व्या सु ) **सूर्य प्राणांचा प्रेरक**

आहे, याची प्रतीति कोणालाहि घेतां येईल. कोणत्याहि मंत्राचा पहाटेस १।२ तास जप मोजून करावा आणि त्याच दिवशीं सूर्योदयापासून सहा घटका झाल्यावर उन्हांत जाऊन पूर्वीच्याच पद्धतीनें जप करावा, असें आढळेल कीं तेवढ्याच काळात जपाची संख्या सवापटीपासून दीडपटीपर्यंत होते, याचें कारण वाणीला सूर्याच्या तेजानें अधिक प्रेरणा प्राणाकडून दिली जाते प्राणस्पंदन वाढल्यानें वाणीची गति वाढते हा अनुभव पूर्वी अनेक वेळा आला आहे फार काय सूर्याला प्रजाचा प्राण असें म्हटलें आहे

'प्राणः प्रजानाम् उदयति एष सूर्यः' (प्रश्न उ ) ज्या खोलींत सूर्याचा प्रकाश मुळींच येत नाहीं तींत राहिल्यानें मनुष्य फिकट, निरुत्साही होतो, आरोग्यहानि होते, पूर्वी अंधारकोटडीची शिक्षा देत असत 'कलकत्त्याची अंधार कोटडी' हिंदुस्थानच्या इतिहासात प्रसिद्ध कुप्रसिद्ध आहे सूर्यालाच कार्यपरत्वें सविता म्हणतात सविता = जगाची उत्पत्ति वगैरे करणारा त्याची जी चित्शक्ति ती सावित्री, तिलाच गायत्री हें नाव आहे

शंका—अहो? पण उत्तरध्रुवाच्या प्रदेशात सूर्य सहा महिने उगवत नाहीं व सहा महिने मावळत नाहीं मग तेथें माणसें कशीं जगतात व त्याचे व्यवहार कसे चालतात?

**समाधान**— असें मानणारानीं त्या प्रदेशात १।२ महिने जाऊन राहावें, म्हणजे स्वानुभवानेंच कळेल कीं माणसें कशी जगतात, काय खातात, कुठें राहतात व त्याची संख्या किती? कसलें तें जीवन!! त्या भागात धान्य पिकत नाहीं, वृक्ष, लता, तृण इ काहीं नाहीं पाषाण, माती नाही, तलाव, आड, विहिरी, नळाचें पाणी इ नाहीं ज्या सहा मासात सूर्य आकाशात नसतो त्या काळात सूर्याचा परिवर्तित प्रकाश, ज्याला '**ऑरोरा बोरिआलिस**' म्हणतात तो सतत असतो, व ज्या षण्मासात तो मुळींच मावळत नाहीं त्यात तो आपल्या इकडील मावळत्या सूर्याप्रमाणें क्षितिजाजवळ असतो क्षितिजावर राहूनच गोल प्रदक्षिणा करीत फिरत राहतो! त्यामुळें त्याची उष्णता बाधक ठरत नाही मावळत्या सूर्याचे किरण आपल्याकडे जितके सौम्य असतात

तितकेहि ते उष्ण नसतात कारण सभोंवार सर्वत्र बर्फच बर्फ पसरलेलें असतें उन्हाळ्यात सुद्धा बर्फाचें पाणी करून तें पिऊन किंवा बर्फ खाऊनच तहान भागवावी लागते **सूर्योपनिषदांत** तर स्पष्टच सांगितलें आहे कीं सूर्यावरच सर्व जग अवलंबून आहे त्या उपनिषदाचा पद्यानुवाद पुढें एका प्रकरणात अभंगरूपानें दिला आहे

**पाश्चात्य देशांत व विशेषतः अमेरिकेत** आरोग्यासाठीं सर्व शरीर वस्त्रहीन करून सूर्यकिरणात तापवितात त्यास सनबाथ म्हणतात तेवढ्या-साठीं नग्न वस्त्याची (न्यूड सोसायट्याची) निर्मिति पुष्कळ वर्षांपासून झाली आहे हिंदुधर्मशास्त्रातसुद्धा सूर्यकिरणस्नानाचा गौणस्नानात अंतर्भाव केलेला आहे, पण नग्नावस्थेंत नाहीं

अमेरिकेंत मुख्यत आरोग्यासाठीं व इन्द्रियनिग्रहासाठीं स्त्रिया व पुरुष एकत्र राहणाऱ्या नग्न सोसायट्या नियत आहेत तर महाराष्ट्रात बारशा-पासूनच मुलाना पायापासून डोक्यापर्यंत कपड्यात गुरफटून ठेवून त्याच्या त्वचेला सूर्यप्रकाशाचासुद्धा स्पर्श न होऊ देण्याची दक्षता फॅशनला बळी पडून घेतली जाते आणि रोगप्रतिकारशक्ति अगदीं शिशुपणापासूनच खच्ची केली जाते, त्यामुळें डॉक्टराची भर चिंता व कष्ट करण्याची वारंवार वेळ येते

पाण्यावर सूर्याच्या किरणाचे प्रयोग करून विविध रोग बरे करणारी चिकित्सापद्धतिसुद्धा अस्तित्वात आहे तिला क्रोमोपॅथी म्हणतात

सध्या वगैरे कर्मे करताना कञ्चुक (विणलेला किंवा शिवलेला कपडा) अंगात घालू नये असा नियम आहे, गरम वस्त्र पांघरण्यास हरकत नाहीं त्या विषयीं थोडा विस्तार ' वस्त्रधारण प्रकरणात केला आहे

**शंका**–सूर्यबिंबान्तर्गत ब्रह्माची उपासना मान्य पण ती गायत्री वा सावित्री कशाला हवी '

**समाधान**–ब्रह्म निष्क्रिय, निर्गुण निराकार इत्यादि प्रकारचें आहे हें आपणास माहीत नाहीं असें वाटतें ब्रह्म काहींच करू शकत नाहीं, कोणाला प्रेरणा, बुद्धी, गारठा उष्णता इ काहीं देऊ शकत नाहीं श्रीमदाचार्य ' आनंदलहरी 'तील पहिल्याच श्लोकात म्हणतात कीं,

शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं ।
न चेदेवं देवो न खलु भवति स्पंदितुमपि ॥ '

शिव शक्तीनें युक्त असेल तरच तो आपला प्रभाव पाडू शकतो तसें नसेल तर तो जरासें स्पदन, किंचितहि चलनवलन करू शकत नाहीं. श्रीमद्भागवतात हेंच सांगितलें आहे

' न घटते उद्भवः प्रकृतिपुरुषयोः अजयोः ।
उभययुजा भवन्ति असुभृतः जलबुद्बुदवत् । भाग १०।८७

प्रकृति व पुरुष ( आदिशक्ति व ब्रह्म ) अज असली तरी एकाला दुसऱ्याशिवाय कांहींच करता येत नाहीं दोघांचा योग झाला तर भूतांची उत्पत्ति वगैरे क्रिया घडू शकतात शिवानें आदिशक्ति महेश्वरीला म्हटलें आहे कीं हे देवि ! तुझ्यावाचून मी शवासारखा आहें, इत्यादि

' शक्तिं विना महेशानि ' सदाऽहं शवरूपकः ' ( दे भा )
अमृतानुभवात श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं,

' जेणें देवें सपूर्ण देवी । जियेंवीण कांहीं ना तो गोसावी ।
किंबहुना एकोपजीवी । येकमेकांची ॥ '

मनुष्य व त्याची शक्ति यांचेंहि तसेंच आहे मनुष्याच्या आधारा शिवाय त्याची शक्ति काही कार्य करू शकत नाहीं व शक्तीच्या साह्या शिवाय मनुष्य जीव कांहींच करू शकत नाहीं खरें पाहता सर्व कर्तृत्व शक्तीचेंच असतें व ती पूर्णपणें नष्ट झाली कीं मनुष्य शवासारखाच नव्हे तर शवच होतो प्राणाना प्रेरणा देणारी तीच ' जे जडातें जीववी । चेतनातें चेववी । मनाकरवीं मानवी । शोक मोहो । ' ( ज्ञानेश्वर ) हें कार्य जीवभूत पराप्रकृति म्हणजेच जीवाची शक्ति करते दे भागवतामध्यें आदिशक्ति ब्रह्मदेवाला म्हणते कीं, कोणी प्राणी दुर्बल झाला तर म्हणतात कीं तो अशक्त, शक्तिहीन झाला, त्याची शक्ति फार कमी झाली तो विष्णुहीन शंकरहीन झाला, त्याच्यातला विष्णु शंकर कमी झाला असें म्हणत नाहींत सर्वव्यापक ब्रह्म मृतदेहात–शवात सुद्धा असतेंच, पण तें कांहीं करतें का ? यावरून हेंच ठरतें कीं शक्तीशिवाय ब्रह्माला स्पदनसुद्धा करता येत नाहीं ब्रह्म जसें अदृश्य आहे, त्याला स्पर्श करता येत नाहीं, तशीच शक्तिसुद्धा दिसत नाहीं, तिला कोणी स्पर्श करू शकत

नाहीं, ती इंद्रियाचा विषय नाहीं, पण तिचें कार्य दिसतें, अनुभवास येतें, व अनुमानानें तिचें अस्तित्व पटतें, म्हणूनच शक्तीला, आदिशक्तीला 'कार्यानुमेया' म्हणतात माणसाची शक्ति कधीं कोणाला सगुणसाकार-रूपात चर्मचक्षूंनीं दिसू शकत नाहीं, परंतु सूर्यमंडलान्तीं सवित्याची चिच्छक्ति सावित्री, गायत्री सगुणसाकार स्वरूपात अनेकानीं उघड्या डोळ्यानीं पाहिली आहे व तिनें त्यांच्याशीं संभाषणहि केलें आहे गौतम ऋषींस ती साक्षात् दिसली वगैरे गौतमकृत स्तोत्रावरून सिद्ध होतें इ स १३३१ मध्यें जे शृंगेरी मठाचे शंकराचार्य झाले त्या श्री विद्यारण्याना गायत्रीनें दर्शन दिले होतें व त्यांच्याशीं संभाषणहि केलें होतें

**गायत्री ब्रह्माहून निराळी कीं काय?** *नाहीं गायत्री म्हणजे ब्रह्मच 'गायत्री ब्रह्म इति उपासीत' गायत्री ब्रह्म आहे हें जाणून तिची उपासना* करावी **'न भिन्नां प्रतिपद्येत गायत्रीं ब्रह्मणा सह'** (व्यास) गायत्री ब्रह्माहून निराळी असें मानू नये संध्या = ब्रह्म, संध्या = गायत्री **'या संध्या सा एव गायत्री'** म्हणून गायत्री = ब्रह्म 'गायत्र्याख्य ब्रह्म गायत्री–मुखेन उक्तम्' (नृ पू ४।२) गायत्री नावाचें जें ब्रह्म त्याचें गायत्रीमंत्रद्वारा प्रतिपादन केलें जातें

**गायत्री परदेवतेति गदिता ब्रह्म एव चिद्रूपिणी ॥ यया प्रकाश्यते ब्रह्म सच्चिदानन्दलक्षणम्'** (संध्या सू) गायत्रीला श्रेष्ठ देवता म्हटलें आहे ती चिद्रूपिणी ब्रह्मच आहे, पण तिच्या योगानें सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म प्रकाशित केलें जातें, ब्रह्माचा साक्षात्कार होतो, अपरोक्षानुभव येतो या **वचनानें हें सिद्ध होतें कीं गायत्रीमंत्र व गायत्रीदेवी एकच, 'मंत्राः एव तु देवता.'** हा सिद्धांतच यानें सिद्ध झाला

**शंका**–गायत्री हे एका छंदाचें नाव आहे आणि तोच गायत्रीमंत्राचा छंद आहे, त्यामुळें गायत्री म्हणतात कीं काय?

**समाधान**–तसें नाहीं गय = प्राण जीव, त्याचें त्यांचें त्राण संरक्षण, उद्धार करते म्हणून गायत्री म्हणतात (बृह० ५।१४) **'गायन्तं त्रायते यस्मात् गायत्रीति ततः स्मृता'** (अग्नि पु) उपासना करणाराचें संरक्षण, जन्ममरणादिकापासून करते म्हणून गायत्री **'जगदादि प्रसूते'**

म्हणून सावित्री व 'वाग्रूपत्वात्सरस्वती' ती वाग्रूप वाणीरूप शब्दब्रह्म स्वरूप आहे म्हणून सरस्वती, इच्छा, ज्ञान व क्रिया या तीन शक्तींनीं पूर्णसपन्न आहे म्हणून 'त्रिशक्ति' म्हणतात ती गायत्री ब्रह्मविष्णुशिवा त्मिका, भूमि अन्तरिक्ष-द्यौ स्वरूपा व प्राणापानव्यानस्वरूपा आहे (बृह) सार हेंच कीं 'गायत्री वा इदं सर्वं भूतं यत् इदं किञ्च' (छा ३।१२।१) हें सर्व दृश्य जग व जें कांहीं यत्किंचित् इतर असेल तें सर्व गायत्रीच आहे प्रत्येक जीवाच्या हृदयात असणाऱ्या आत्मारूपी सूर्यांत सुद्धा ती आहेच 'सूर्य॰ आत्मा जगत॰ तस्थुष॰ च' (ऋग्वेद स व सूर्योप) सूर्य सर्व जगमाचा व स्थावराचा आत्मा आहे

'आदित्यान्तर्गतं यत् च ज्योतिषा ज्योतिरुत्तमम् ।
हृदये सर्वभूताना जीवभूत च तिष्ठति ॥' (याज्ञ)

आदित्यमडलात जी सर्व ज्योतीपेक्षा श्रेष्ठ ज्योति (दीप्ति भर्ग) आहे तीच स्वत सिद्ध स्वयप्रकाश ज्योति सर्व भूताच्या हृदयात जीवरूपानें आहे येथें जीव व ब्रह्म याचा अभेद सिद्ध झाला गायत्रीच्या आवाहनाच्या मत्रातसुद्धा 'गायन्त त्रायसे यस्मात् गायत्री त्वं तत॰ स्मृता' असें म्हटलेलें असून सध्या करणारे सस्कृत भाषा घेऊन बी ए झालेले सुद्धा यरील दाका विचारतात। यावरून तर्क करावा कीं त्या सध्या करण्यात त्यांचें किती लक्ष असेल।

ध्यान कोठें धरावें– नाभिस्थान, हृदय भ्रूमध्य आणि प्रकार? हीं ध्यानाचीं मुख्य स्थानें असलीं तरी सर्वांना सुलभ, सुखद व कांहीं दुष्परिणाम होण्याची भीति नसलेलें स्थान म्हणजे हृदय येथें हृदय म्हणजे रक्ताशय (हार्ट) नव्हे छातीच्या शिंपीच्या भागात, अनाहतचक्रात जें हृदय आहे तें येथें समजावयाचें भ्रूमध्यात ध्यान केल्यानें ज्ञानप्राप्ति लवकर होते हें जरी खरें असलें तरी उष्णप्रकृतीच्या पित्तप्रकृतीच्या किंवा उष्णपित्त प्रकृतीच्या माणसांनीं किंवा रक्तदाबाधिक्य (हायब्लड प्रेशर) असल्यास त्यांनी तेथें ध्यान करणें फार धोक्याचें असतें एक उदा– बडोद्यात रहात नोकर असलेला गोपाळेश्वर नावाचा ब्राह्मण पूर्वी बरेच दिवस रात्र भ्रूमध्यांत गायत्री जप करीत असे त्याला सतत अतिशय चक्कर येऊं लागली तेव्हां तो गायत्रीजपाचा परिणाम मानून त्यांनीं सध्या सोडून दिली होती व

त्याचा विश्वास लय पावला होता इतकेंच नव्हे तर 'संध्या' नाव ऐकलें कीं चिडतो असें त्याच्या मावाकडून १९३५ च्या सुमारास अजमीर येथें कळलें होतें त्याची वडायास गेल्यावर भेट घेतली व 'संध्या करता का?' असें विचारताच तो चिडला व त्यानें सगळी हकीगत रागारागानें सांगितली तेव्हा त्यास विचारलें कीं 'भ्रूमध्यांत ध्यान करीत, जप करीत होता काय?' तो 'होय' म्हणाला तेव्हा त्यास वरील धोक्याची सूचना दिली, व हृदयांत ध्यान करीत जप करा म्हणजे पूर्वीच्या अनुभवाच्या अगदीं उलट अनुभव येतील त्यानें सुरू केली संध्या! त्यानें पूर्वी जप तसाच चालू ठेवला असता तर कदाचित् अर्धांगवाताचा झटका आला असता, किंवा मेंदूत रक्तस्राव (सेरिब्रल हीमरेज) होऊन तो मेलासुद्धा असता! ब्रह्मरंध्रांत ध्यान करण्यानें यांच्यापेक्षाहि धोका तदा प्रकृतीच्या माणसास संभवतो नाभिस्थानीं ध्यान करण्यानें अग्नि प्रदीप्त होतो, पचनशक्ति वाढते, अपचनानें होणारे विकार सहज बरे होतात, इत्यादि फायदे होतात व दीर्घकाळ तेथें ध्यान केल्यानें शरीरांतील मर्म अवयवादिकांचें ज्ञान प्रत्यक्ष अन्तश्चक्षूंना होतें हें अगदी खरें असलें तरी तेथें अग्निचक्र असल्यानें उष्णता फारच वाढते व त्याचे परिणाम सर्वांनाच सोसतील असें नाहीं

याचें कारण– जेथें ध्यान करावें तेथें प्राण व रक्त यांचे प्रवाह जोरानें जाऊं लागतात, डोक्यांतील सूक्ष्म रक्तवाहिन्यांना ती गति व दाब सोसत नाहीं त्यामुळें डोकें दुखणें, चक्कर करणें, भोंवळ येऊन पडणें वगैरे विकार उद्‌भवतात व शेवटीं त्या रक्तवाहिन्या फुटतात व मेंदूत रक्तस्राव होतो हृदयस्थान रक्ताशयाजवळच असल्यानें त्रास होत नाहीं हृदयांत ध्यान केल्यानें प्रेम, भक्ति यांची प्राप्ति होण्यास फार मदत होते प्रेम नाहीं, दया नाहीं, सद्भावना नाहींत, अशाला हृदयशून्य (हार्टलेस) म्हणतात तें त्यामुळेंच डोक्याचा ज्ञानाशीं संबंध असतो आणि म्हणूनच 'सुपीक डोक्याचा', मठ्ठ डोक्याचा', 'उलट्या डोक्याचा' वगैरे वाक्प्रचार रूढ झाले आहेत

शंका– सकाळीं व सायंकाळीं संधिकाळ असतो, तसा मध्यान्हीं कुठें असतो?

**समाधान**– 'मध्यान्हेऽपि च संधिः स्यात् । पूर्वस्याऽन्हः अपरस्यच ॥' (वृ. पारा. अ ७।८१) मध्यान्हीं सुद्धा पूर्वान्ह आणि अपराह्न यांचा संधि असतो. तो कोणता ते गायत्रीजप प्रकरणात सांगितलें आहे.

लक्षांत ठेवावें की

स्वकाले सेविता नित्यं सन्ध्या कामदुघा भवेत् ।
अकाले सेविता सन्ध्या सा च वंध्या वधुः इव (स्मृति)

ज्या सध्येचा जो उत्तम काल सांगितला आहे त्या काळीं नित्य नियमानें त्रिकाळीं संध्या केली तर ती सध्या कामधेनु बनते. अकालीं केलेली संध्या वंध्या-वांझोट्या पत्नीसारखी ठरते.

**किती अक्षरांची गायत्री ?** 'गायत्री चतुर्विंशत्यक्षरा त्रिपदा' (नारा उ.) ८।८ अक्षरांच्या तीन पादाची त्रिपदा गायत्री, तिच्यात २४ अक्षरें असतात. मोजून पाहता अक्षरें तेवीसच आहेत नुसतें व्यंजन म्हणजे अक्षर नव्हे. येथें पहिल्या पादात सातच अक्षरे आहेत. अशा प्रसंगीं काय करावें हें छंदसूत्रानें सांगितलें आहे **'इयादि पूरणः'** पादः कर् प्रातिशाख्य पटल १७।१४ त्या चरणात इ किंवा उ वगैरे स्वर व्यंजनात मिळवून संख्या पूर्ण करावी उदा० (१) 'आपो ज्योती... स्वरोम्' या शिरोमंत्राला षोडशाक्षरी म्हटलें आहे. 'षोडशाक्षरकं ब्रह्म गायत्र्यास्तु शिरः स्मृतम्' (व्यास, इ) मोजून पाहता त्यात १५ च अक्षरें आहेत. वरील सूत्राधारें स्वरोम् चा उच्चार सुवरोम् करावयाचा. स्‌ र मधील स् मध्यें उकार मिळवावयाचा म्हणजे संख्या पूर्ण होते. तैत्तिरीय असाच उच्चार करतात.

**उदा०** (२) – 'भूमि अन्तरिक्ष द्यौ इत्यष्टाक्षरम् ।' (२) 'प्राण अपान. व्यानः इत्यष्टाक्षरम्' सात सात अक्षरें असून अष्टाक्षर (वृह. उ.) म्हटलें आहे म्हणून 'भूमि अन्तरिक्ष दियौ' आणि 'प्राण अपान. वियान.' आहे असें समजावयाचें विद्याविनोदभाष्यांत असेंच स्पष्टीकरण आहे. या दोन्ही ठिकाणीं इकारानें पूर्णता केली आहे. त्याप्रमाणेच गायत्रीच्या पहिल्या चरणात 'वरेणियम्' म्हणावयाचें, इकारानें पूर्ति

करावयानी हें पद्मपुराण, अग्निपुराण, दे. भा , बृहत्पाराशर स्मृति, मंत्र महार्णव, गायत्रीपुरश्चरणपद्धति (दोन) व गुरुचरित्र या सर्वांत अक्षर न्यासांत रे, णि, यम् अशीं तीन अक्षरें सांगून सिद्ध केलें आहे. 'रेणियं' यांतील 'रे'चा दीर्घ उच्चार चांगला दीर्घ करून णियं यांचा चटकन् उच्चार केला कीं बरोबर जमतें. 'रे' हें गायत्रीचें बीज, 'णि' शक्ति व 'यं' कीलकम् असें वर्णन अनेक ठिकाणीं आढळलें. लहानशा वटबीजांत जसा महान् वटवृक्ष गुप्त असतो, तशा देवता त्याच्या बीजमंत्रात गुप्त असतात. इतर देवतांच्या बीजमंत्राचा उच्चार योग्य विधियुक्त केला कीं, त्या त्या देवता अन्तर्दृष्टींत प्रगटतात व कधीं कधीं अधिकारी व्यक्तींत प्रवेशमुद्रा करतात; तसेंच 'रे' या बीजाचा उच्चार दीर्घ-कास्यघटानिनादवत् केल्यानें घडतें. सुभूमि आणि सुजल यांच्या संयोगानें जसा बीजांतील वृक्ष प्रगट होतो, तसाच बीजस्थ देवता योग्य हृदयभूमि आणि योग्य उच्चारजल यांच्या संयोगानें प्रगट होतात हें केवळ शास्त्र म्हणून येथें सांगितलेलें नसून १९५२।५३ पासून हा अनुभव अनेकानीं अनेक वेळा घेतला आहे.

**प्रेरणा, अन्तःस्फूर्ति**– सध्योपासनेनें प्रेरणा कशी मिळते याविषयीं पाश्चात्यानीं केलेलें वर्णन 'गायत्रीचा महिमा' या प्रकरणात थोडें दिलें आहे अनेकांच्या व लेखकाच्या अनुभवानें येथें एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं जो द्विज उत्तम काळीं उत्तम प्रकारें प्रातःसंध्येत नित्य नियमानें बारावेळ जप आणि मध्यान्ह सायंसंध्यात प्रत्येक वेळीं फक्त १०८जप करील, सदाचारी व नीतिसंपन्न राहील तो वैद्य, डॉक्टर, वकील, ज्योतिषी, व्यापारी इत्यादी कोणीहि असला तरी त्याच्या व्यवसायात त्याला योग्य वेळीं अचूक प्रेरणा होत राहील वैद्यडॉक्टरास रोगनिदान बिनचूक व चटकन करता येईल. विरुद्ध बाजूला त्याच्या साक्षीदाराना कोणत्या प्रकारें उलथून टाकावेत हें वकिलास बिनचूक कळेल. ज्योतिषी स्वभावादिकांचें व भूतभविष्य वर्तमान गोष्टीचें वर्णन बिनचूक करू शकेल. मोठ्या प्रमाणात खरेदी विक्री, साठवण, केव्हा करावी हें व्यापाऱ्यास बिनचूक सुचेल असेंच कोणत्याहि व्यवसायात घडलें व घडतें

## अशौचांत संध्या

सूतके मृतके चैव सन्ध्याकर्म न तु त्यजेत्। मनसोच्चारयेत् मंत्रान् प्राणायामं ते द्विजः॥ (गोभिल) जननाशौचात (सोहेरात) व मृताशौचात (सुतकात) सुद्धा संध्या केलीच पाहिजे, त्याग करू नये, पण मंत्राचा उच्चार मनात करावा, मात्र प्राणायाम मंत्राशिवाय करावा अर्घ्य नेहमीप्रमाणें वैखरीनें मंत्रोच्चार करून द्यावे, मार्जन करावें किंवा करू नये उपस्थान सूर्यबिंबानें ध्यान करून पण नमस्काररूपान करावें (शा रू, पैठीनसि) जननाशौच व मृताशौच याविषयींचे सामान्य नियम श्रीयुत दाते यांच्या पंचांगात असतात म्हणून येथें दिले नाहींत

## आपत्कालीं संध्या

महासंकटात, प्रवासात, आजारीपणात सर्व संध्या वेळेवर करणें शक्यच नसेल तर आचमन, प्राणायाम अर्घ्य, दहा गायत्री जप व उपस्थान इतकें केलें तरी पुरे इतकेंहि शक्य नसेल तर, भस्मस्नान करून १० गायत्री जप तरी वेळेवर करावा, वेळ न साधली तरी प्रायश्चित्त नको

राष्ट्रावर, देशावर, गावावर किंवा घरावर शत्रूची, दरोडेखोराची स्वारी वगैरे कारणानीं संकट आल्यामुळें राजाच्या कोपामुळें, देव, अग्नि, विप्र व राजा यांचें महत्कार्य करावयाचें असता, किंवा एकाएकीं महाभय आल्यामुळें मध्येंचा काळ चुकला किंवा संध्या करताच आली नाहीं तरी प्रायश्चित्त नको आजारीपणात भस्म लावून पडल्या पडल्या, मनातल्या मनात १० गायत्री जप करण्याचीसुद्धा शक्ति नसेल व प्रतिनिधिद्वारा करणेंहि अशक्य असेल तर संध्यालोप दोषार्ह नाहीं (जमदग्नि) प्रतिनिधि, पुनबंधु इत्यादिकास किंवा कोणाहि ब्राह्मणास करण्यास हरकत नाहीं

सूचना—राजाचें महत्कार्य याचा अर्थ आम्ही करीत असलेली नोकरी असा करणें म्हणजे स्वतःचीच फसवणूक करणें ठरेल नोकरीमुळें संध्या करता येत नाहीं असें कोणास म्हणता येणार नाहीं कारण नोकरीसाठीं जास्तींत जास्त १०।१२ तासच सर्वांस लागतात ज्याना नोकरीसाठीं सकाळीं ८ वाजता बाहेर पडावें लागतें त्यास प्रात संध्या व मध्यान्ह संध्या अगदीं वेळेवर करता येतील व ते परत रात्रीं ८ वाजता घरीं येतात असें

मानलें तरी आल्यावर सायमध्या करता येईल व फार तर काललोपासाठीं एक अर्घ्य अधिक द्यावा लागेल त्याना रात्रपाळी रात्रीं बारापासून सकाळीं आठ पर्यंत करावी लागते त्यास प्रात सध्या वेळेवर करता येणार नाहीं व फार तर तीन प्राणायाम करून एक अर्घ्य देणें इतकेंच प्रायश्चित्त करावें लागेल, पण त्यास इतर दोन सध्या अगदीं उत्तम प्रकारें करता येतील म्हणजे कोणाहि नोकरी करणारास फार तर कोणती तरी एक सध्या वेळेवर करता येणार नाहीं इतकेंच, म्हणून नोकरीची अडचण सध्येच्या आड येत नाहीं

पूर्वीं वर्णिलेल्या आपत्तीपेक्षा किरकोळ आपचि आल्यास सध्येंत मुख्य काय हें लक्षात घेऊन त्यानीं त्यानीं तारतम्यानें ठरवावें सध्येंत अर्घ्यदान, जप व उपस्थान हीं तीन मुख्य व त्यातहि जप मुख्य, पण सगळी सध्या करणें मला आवश्यक वाटत नाहीं, इत्यादि सबबी, लवकर उठण्याचा आळस, इत्यादि कारणें आपत्ति मानता येणार नाहींत आचमन व प्राणायाम हीं दोन प्रकरणें वाचल्यानतर कोणासहि असेंच वाटेल कीं याचा त्याग करणें केव्हाही अयोग्यच ठरेल वेळेचा खरोखरच अभाव असेल त्या वेळीं त्यानीं पचमुखी गायत्रीच्या ध्यानाचा मात्र त्याग करू नये यापेक्षा अधिक लिहिणें आवश्यक वाटत नाहीं

## संध्या–देश ( स्थान )

शास्त्रकारानीं सध्येसाठीं विविध स्थाने सागून त्याचें वैशिष्ट्यहि सागितलें आहे तें –घरीं सामान्य फळ, गाईच्या गोठ्यात दसपट, नदीतटीं लक्षपट, राम विष्णु शिव इत्यादि देवता व विशेषत गायत्री देवी याच्या मदिरात अनतपट घराबाहेर व तलाव, झरे याच्या समीप दसपट, देव निर्मित तलाव आणि तीर्थें याच्या काठीं शतपट, भागीरथीच्या काठीं अनतपट फळ पुण्य क्षेत्र, गुहा, पर्वतशिखर, नदीसगम, पवित्र जलाशय, एकान्त उद्यानें (बागा) बेल व पिंपळ या वृक्षाखालीं पर्वताच्या पाय थ्याशीं, आणि सागरतीरीं सध्या करणेंहि फार चागलें तुलसीवनात, गुरू जवळ आणि चित्ताची एकाग्रता होण्यास अनुकूल अशा ठिकाणींहि सध्या करावी आहिताग्नि द्विजानीं अग्निकार्याच्या अनुकूलतेप्रमाणें घरीं किंवा

बाहेर करावी (व्यास, शारदा ति., वसिष्ठ स., आ. सू., इत्यादि)

विशेष लक्षात ठेवावें घराबाहेर संध्या करणें अधिक श्रेयस्कर असलें, आणि त्यासाठीं वरील विविध स्थानें सांगितलीं असलीं तरी स्वच्छता, पावित्र्य, शान्तता व एकान्त असेल आणि वाऱ्याचे झोत अंगावर येत नसतील आणि कुसंगति नसेल तेथेंच चित्ताची एकाग्रता साधणें शक्य असतें जेथें गोंगाट, घाण, गडबड इत्यादि असेल, कुसंगति असेल तेथें एकाग्रता न साधता व्यग्रता येते, भलतेच विचार मनात येण्यास भरपूर वाव मिळतो शान्त, एकान्त स्थान एकाग्रता साधण्यास मदत करतें पवित्रस्थान व सत्संगति पावित्र्य उत्पन्न करतात, मंद, सुगंधि शीतल वायूनें व पवित्र सुवासानें प्रसन्नता येते, व या सर्वांच्या समुच्चयानें सद्विचारच मनात येतात वाऱ्याचा झोत अंगावर लागण्यानें आरोग्यहानि होते, तसेंच ततभूमीवर बसल्यानें (आसन असले तरी) रोग होतात, तसेंच ढेंकूण डास, पिसवा, इत्यादि तेथें असू नयेत

संध्येंत दिशा– कोणत्या वर्मात, केव्हा, कोणती दिशा हें त्या त्या प्रकरणात सांगितलें आहे

कालातिक्रमदोष–प्रायश्चित्ताविषयीं 'गायत्रीजप' प्रकरणात लिहिलें आहे

सूचना–ध्यानयुक्त गायत्रीचा जप हें सर्वांत प्रमुख कर्म आहे पण उपनयन झाल्याशिवाय संध्या करण्याचा अधिकारच प्राप्त होत नाहीं, म्हणून पुढील प्रकरणात उपनयन व पुनरुपनयन याविषयीं वर्णन केलें आहे

० ० ०

प्रकरण ३ रें

# उपनयन व पुनरुपनयन

> गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम् ।
> गर्भात् एकादशे राज्ञः गर्भात् तु द्वादशे विशः ॥ ( मनु )

ब्राह्मण कुमाराचें उपनयन ( मुंज ) गर्भांतील नऊ महिने धरुन आठव्या वर्षी, तसेंच क्षत्रियानें ११ व्या वर्षी व वैश्यकुमाराचें १२ व्या वर्षी करावें हा मुख्य काळ होय, या काळीं गुरु जरी ४।८।१२ वा असला तरी बृहस्पति शांति करून मुंज करावी मुंजीत भिक्षावळ-मिरवणूक काढण्याचा रिवाज आहे तो अशास्त्रीय आहे, तो हिलेच्छूनीं बंद करावा

**उपनेता**- ब्राह्मणाचें उपनयन ( गायत्रीचा उपदेश ) मुख्यत त्याच्या जनकानें करावें त्याच्या अभावी पितामह, चुलता, वडील भाऊ इत्यादि मुख्य पालकानें करावें उपनयन करणाराचें मात्र उपनयन झालेलें असले पाहिजे अनुपनीत जनकानेंहि पुत्राचें उपनयन स्वत करणें निषिद्ध आहे, कारण त्याला गायत्रीमंत्राचा उपदेश झालेला नसल्यानें वेदाधिकारच नाहीं मुंज झालेल्या बटूनें मुंज न झालेल्या स्वत च्या बापाला सुद्धा नमस्कार करू नये इतर कोणाकोणास करू नये हें यावरून समजावें

क्षत्रिय व वैश्य याना दुसऱ्यास वेद शिकविण्याचा अधिकार नसल्यानें त्याच्या पुत्राचें उपनयन, त्याचे कुलगुरु, कुलोपाध्याय यानीं करावें

मुंजीचा जास्तीत जास्त काळ ब्राह्मणास १६, क्षत्रियास २२ व वैश्यास ( गर्भापासून ) २४ वर्षे हा आहे त्या काळींहि उपनयन न झालें तर ते ' व्रात्य ' ठरतात, त्यास सावित्रीपतित असें नाव आहे त्या काळा नतर मुंज करणें ती व्रात्यस्तोम नावाचा यज्ञ करून मग करावयाची असते.

**पुनरुपनयन**

एकदा मुंज झालेली असली तरी काहीं कारणास्तव पुन्हा मुंज करावी लागते, त्या कारणापैकीं प्रायश्चित्तार्थ मुंजीचीं जी कारणें आहेत तींच खालीं दिलीं आहेत बाकीचीं स र माला प्रथात पहावीं

ल्सूण, पलाडु (कांदे) गृंजन (लसणीसारखा एक कंद असें विज्ञानेश्वर मत आहे, गृंजन म्हणजे गाजर नव्हे असें एकानें सिद्ध केलें आहे (स र मा ) आणि छत्राक (कावळ्याची छत्री म्हणतात तो पदार्थ) व पांढरें वार्ग, श्वेत वृताक यापैकीं कोणताहि एक एकदा जरी भक्षण केला, तरी पुन्हा मुंज केली पाहिजे व नंतर तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त केलें पाहिजे अपवाद– हे पदार्थ आपल्या अन्नात आहेत हें न कळल्यानें, चुकून पोटात गेले तर मुंज नको पण तप्तकृच्छ्र पाहिजे वैद्याच्या आज्ञेनें औषध म्हणून यातील पदार्थ खावा लागल्यास प्रायश्चित्त नको, पण तो आपत्काल गेल्यावर भक्षण केल्यास मुंज वगैरे केलेंच पाहिजे

उंटिणीचें दूध, मनुष्यस्त्रीचें दूध, वीर्य (रत), मूत्र (गोमूत्र नव्हे), नरविष्ठा, मद्य, मांस व मांसभक्षक पशूंची विष्ठा, यांचें प्राशन वा भक्षण केल्यास पुन्हा उपनयन संस्कार केला पाहिजे, मृतानिमित्त दिलें जाणारें शय्यादान घेतल्यासहि पुन्हा मुंज केली पाहिजे

निषिद्ध नसलेल्या पशु वगैरेंचें मांस क्षत्रियवैश्यद्विजानीं भक्षण करण्यास हरकत नाहीं ब्राह्मणानीं पशुयागातील यज्ञशिष्टाशिवाय इतर कोणतेंहि मांस भक्षण करू नये

गाढव, उंट, बैल, बोकड व मेंढा या पशूंवर त्यांच्या पाठीवर स्वार होऊन ८।१० मैल प्रवास, पेरफटका केल्यास पुन्हा मुंज केली पाहिजे (अधिक विस्तार व मूळवचनें स र माला प्रथात पहा )

**द्रव्य घेऊन दुसऱ्यासाठीं गायत्री जप**

संहितास्वाहाकाराच्या अधिकारार्थ दहा हजार व गायत्रीचा उपदेश करण्याच्या अधिकारार्थ बारा हजार जप गायत्रीचा करावा लागतो; व अशाच अन्य निमित्तास्तव जो गायत्रीजप सांगितला आहे, तो जप उपाध्यायादि ब्राह्मणाकडून करवितात, व त्यास माहीत नसल्यामुळें उपाध्यायादि करतात अशा प्रकारें द्रव्य (दक्षिणा, वस्त्रें इ मोबदला)

घेऊन गायत्रीजप करणें अधिकाधिक प्रायश्चित्तार्ह आहे

द्रव्य घेवोनि एकापाशीं । जप करिता अनत दोषी
चाण्डालयोनीं मरवशीं । जन्म पावे परियेसी ॥ (गु च ३६।४८३)

अन्यक्षेत्रे कृत पाप पुण्यक्षेत्रे विनश्यति ' पण 'पुण्यक्षेत्रे कृत पाप वज्रलेपो भविष्यति ' हें जसें, तसेंच गायत्रीचें आहे गायत्रीजपानें इतर अनेक पातकाचा सहार करता येतो, पण मोबदला घेऊन गायत्रीचा जप केल्याचें पाप कशानें घालवावयाचें ? दुसऱ्यासाठीं फुकट करण्यास हरकत नाहीं

दुसऱ्यासाठीं १० जप घेल्यास एक कृच्छ्र, शभर केल्यास पराक, हजार केल्यास चाद्रायण, दहाहजार किंवा अधिक घेल्यास, त्याच श्रेयोदान त्या यजमानाला देऊनहि पुन्हा मुज केली पाहिजे नतर चार वेळा चाद्रायण व्रत केलें पाहिजे, नतर औपासनाग्नीचें सधान करून, केशाचे वपन करून, पचगव्य प्राशन केलें पाहिजे, आणि पूर्वी दुसऱ्यासाठीं जेवढा जप केला असेल तेवढा स्वत साठीं पुन्हा केला पाहिजे असे सर्व न केल्यास तो पतित ठरतो

कादा लसूण वगैरे खाऊ नयेत हें पुष्कळांस माहीत असतें, पण ते इतके निषिद्ध आहेत हें जाणणारे अगदीं थोडे, इतर निमित्तें तर फारच थोड्यास माहीत असतील, तसेंच परार्थ गायत्री जपाचें आढळलें, म्हणून येथें दिलें आहे

* * *

प्रकरण ४ थें

# यज्ञोपवीत (जानवें)

पवित्रं परमं गुह्यं आयुष्य च धनावहम् ।
औजस्यं ब्रह्मवर्चस्यं ब्रह्मसूत्रं तयोदितम् ॥

मुंज झाल्यावर जानवें घालावें लागतें म्हणून त्याविषयीं लिहिणें ओघानें प्राप्त झालें

**यज्ञोपवीत**—यज्ञातील हुतें ज्या परमात्म्याला यज्ञ म्हणतात त्याचें जें उपवीत तें यज्ञोपवीत. **'यज्ञः स्यात् आत्मनि मखे नारायणहुताशयोः (हैम)'** आत्मा, मख (याग) नारायण व अग्नि असे यज्ञ शब्दाचे अर्थ आहेत. **'यज्ञो वै विष्णुः'** जानव्यालाच यज्ञोपवीत, यज्ञसूत्र, ब्रह्मसूत्र, व सूत्र अशीं नावें आहेत. उपवीत म्हणजे धारण केलेलें, घातलेलें, गुडाळलेलें सूत्र–सूत.

**जानवें तयार करणें**–ब्राह्मणानें, त्याच्या पत्नीनें किंवा रजोदर्शन न झालेल्या कुमारींनीं काढलेलें, मधें गाठ न पडलेलें व अखंड अशा सुताचें केलेलें पाहिजे. हाताच्या चार बोटाच्या मुळाशीं, त्या चार बोटांना ९६ फेरे गुडाळून तें सूत न तोडता त्याला आणखी ९६ चौंगे सूत जोडावें, व सूत न तोडता पुन्हा ९६ चौंगे जोडावे चौंग्याचें माप जानवें ज्याला वापरावयाचें असेल त्याच्या बोटाच्या चौंग्याचें पाहिजे या तिहेरी केलेल्या ९६ चौंगे लांबीच्या सुताला पीळ दिला कीं त्रिसुती होते. तें न तोडता त्यातील १/३ मोजून तें मूळ तिहेरी सूत, पुन्हा तिहेरी करुन त्याला चांगला घट्ट पीळ द्यावा, म्हणजे नऊसुती दोरा तयार होतो मांडी घालून गुडघे चांगले वर उचलून तें सूत दोन्ही गुडघ्याभोंवतीं तीन फेरे येतील

असें गुंडाळावें व यथाविधि ब्रह्मगाठ मारावी पीळ कसा द्यावा व गाठ कशी मारावी हें कोणाजवळ तरी शिकावें सुताचें जानवें तयार करणें तें ब्राह्मणानें, भोजनापूर्वी, अनध्यायाचे दिवस सोडून इतर दिवशीं, तयार केलें पाहिजे तें सूत विधवेनें काढलेलें, गाठ पडलेलें, अर्धवट तुटलेलें असू नये यापैकीं एका दोषानेंहि युक्त असलेलें जानवें त्याज्य होय, वापरू नये, असें घातलें गेलें असल्यास परम पवित्र घालून त्या अपवित्राचा त्याग करावा आपत्काळीं विधवानीं काढलेलें सूत चालेल

**सूत**– शुद्ध कापसाचें उत्तम, कापूस न मिळाला तर ताग (सण) आवाडी वगैरेंच्या धाग्याचें किंवा कमलनालातील ततूचें चालेल

**जानव्याची लांबी व जाडी**– डाव्या खांद्यावर राहून उजव्या खाके खालून असलेलें जानवें कमरेपर्यंतच पोंचेल इतकें जास्तींत जास्त लांब असावें जास्तींत जास्त आखूड म्हणजे बेंबीपर्यंत पोचेल इतकें जास्त लांब असलें तर तपाचा नाश व जास्त आखूड असलें तर आयुष्यक्षय होतो मोहोरीच्या जून झालेल्या शेंगेपेक्षा जाड नसावें व त्याहून फार बारीक नसावें जाडें असलें तर यशाची हानि व जास्त बारीक असलें तर धनाची हानि होते

**किती घालावीं**– ब्रह्मचारी-बटू याने एक आणि गृहस्थ व वानप्रस्थ यानीं दोन घालावीं कुटीचकादि यतींनीं एकच उपवस्त्राच्या अभावीं एक जास्त घालावें ज्याचा बाप जिवत असेल, वडील भाऊ जिवत असेल त्यानीं उपवस्त्र (उपरणें) किंवा त्याच्या जागीं एक जास्त जानवें वापरू नये

**धारण करण्याचे प्रकार**– उजवा बाहु वर केल्यावर डाव्या खांद्यावर राहील असें जें तें उपवीती (सव्य म्हणतात) दोन्ही खांद्यावरून छातीवर लोंबणारें तें निवीती (माळली) उजव्या खांद्यावर राहून डाव्या कुशीकडे लोंबणारें तें प्राचीनावीती (अपसव्य) जानवें अभिमंत्रित करून घालावें

**यज्ञोपवीतनाश प्रायश्चित्त**– कमरेच्या खालीं सरलें, गेलें, मलमूत्र त्यागाच्या वेळीं निवीती करून उजव्या कानास न गुंडाळलें, रक्त, थुकी, शेंबूड, कफ, मांस, विष्टा, मूत्र इत्यादींचा जानव्यास स्पर्श झाला, किंवा एकच जानवें असून तें तुटलें तर त्या जानव्याचा त्याग करून प्रायश्चित्त होम करून नवीं अभिमंत्रित घालावीं प्रायश्चित्त होम धर्म सिंधूत पाहावा

**जानवें गळ्यातून काढणें**- शास्त्रानें आवश्यक सांगितलेलें अभ्यंगस्नान, समुद्रस्नान, आईबापाचे श्राद्धदिवस या निमित्ताशिवाय इतर वेळीं जानवें धुण्यासाठीं सुद्धा गळ्यातून काढलें तर वरीलप्रमाणेंच प्रायश्चित्त होम केला पाहिजे (तैत्तिरीय, कठ, काण्व, चरक व वाजसनेयी यांना हा नियम लागू नाहीं ) स्वच्छ राहाण्यासाठीं जानवीं स्नानाच्या वेळीं घासून धुणें जरूर आहे, पण त्यास साबू लावणें योग्य नाहीं गळ्यातून न काढता, निवीती करून हातानीं रोज चोळून धुवावें कोणी गळ्यातून काढून आंगठ्यात धरून घासतात तें प्रायश्चित्तार्ह आहे कोणी कमरेच्या भोवतीं घासतात, तेंहि प्रायश्चित्तार्ह

**प्रायश्चित्त** -डाव्या खांद्यावरून खालीं दंडावर गेलें, कोपरापर्यंत गेलें किंवा कोपराच्या खालीं गेलें तर तीन, सहा, व बारा प्राणायाम ( क्रमश ) प्रायश्चित्त केलें पाहिजे

**स्वत. तोडणें**- रागानें किंवा इतर निमित्तानें स्वत च आपल्या गळ्यातील जानवें ( जानवीं ) तोडलें, तर अभिमंत्रित न केलेलें नवें घालून, गार पाण्याचें स्नान करून नतर अभिमंत्रित जानवें जानवीं धारण करून छेदनपापक्षयार्थ १००८ गायत्री जप केला पाहिजे

**शुद्ध जानवें वर्ज्य**- महापातक्यानीं त्या पातकाचें शास्त्रोक्त प्रायश्चित करीपर्यंत अभिमंत्रित किंवा नऊसुती ब्रह्मगाठ मारलेलें जानवें घालू नये साधें सूत साधी गाठ मारून घालावें सप्यादि विप्रकर्म न करणारे जे पतित *ब्राह्मण*, केवळ नामधारी *ब्राह्मण*, *अविवाहित स्त्रीला कन्येला झालेला* पुत्र ( कानीन ), कुण्डगोलक ( मनुस्मृति पाहा) व्रात्य ( सावित्रीपतित ), श्वेतकुष्ठी व महारोगी आणि अपवर्तिमान यानीं ब्रह्मगाठ असलेलीं पण अभिमंत्रण न केलेलीं जानवीं वापरावीं

**यज्ञोपवीत त्याग**- चिताकाष्ठ, चिताधूम, रजस्वला, चाण्डाल, कोणाचाहि मृतदेह (नर, पशु इ ) *व बाळतीण* यांचा स्पर्श झाला तर सचैल स्नान गार पाण्यानें करून अभिमंत्रित जानवीं घालून, पूर्वीचीं काढून टाकावीं आणि जननाशौच व मृताशौच संपल्यावरहि तसेंच करावें केव्हाहि घातलेलीं जानवीं, चार महिन्यानीं नवीं अभिमंत्रित घालून, टाकावीं द्विजानें एक क्षणसुद्धा यज्ञोपवीतविरहित राहू नये एक

क्षण जरी तसा गेला तरी नवें सविधि घालून १०० गायत्रीजप करावा

**यज्ञोपवीत नसता भोजन**– म्हणें पिणें केलें किंवा मलमूत्र त्याग केला तर, नवीं घालून आठ हजार गायत्रीजप प्रायश्चित्तार्थ करावा जुनें वापरलेलें यज्ञोपवीत काढून टाकणें तें जलाशयात ओ भूर्भुव स्व समुद्र गच्छ स्वाहा ' या मत्रानें विसर्जन करावे

दिवसेंदिवस जानवीं मनून देणारे मिळणें कठीण होत चाललें आहे पोथ्यात दिलेला विधि मोठा व मत्र अपरिचित, असा आहे, म्हणून अगदीं सोपा असा **देवलकथित** विधि खालीं दिला आहे

आचमन प्राणायाम करून देशकालाचा उच्चार करून ' **नूतनयज्ञोपवीताभिमन्त्रणमहं करिष्ये** ' असा सकल्प करावा सिद्ध पदार्थांना मत्र योजावे ' या न्यायानुसार तयार असलेल्या जानव्यावरच सरकार करायचा म्हणून, *ब्रह्मगाठ मारलेलें जानवें शुद्ध जलात धुऊन डाव्या हाता* वर ठेवून 'आपोहिष्ठा०' इत्यादि तीन मत्रानीं दर्भांनीं पाणी प्रोक्षण करावें नतर पुन दहा वेळा गायत्री मत्र म्हणत प्रोक्षण करावं, ( हा नव सुती करून गाठ मारण्यापर्यंतचा विधि झाला ) पुन्हा प्रत्येक जानव्यासाठीं प्रोक्षण करावें ओं ब्रह्मणे नम ओ विष्णवे नम ओं शिवाय नम ' म्हणून तीन वेळा नमस्कार करावे व नतर —

आचमन प्राणायाम करून देशकालादिकाचा उच्चार करून '**एवंगुण विशेषणविशिष्टाया शुभपुण्यतिथौ श्रौतस्मार्त-कर्मानुष्ठान-सिध्यर्थं-नूतनयज्ञोपवीतधारणमहं करिष्ये** ' असा सकल्प करावा व ' यज्ञोपवीतमितिमत्रस्य परमेष्ठी ऋषि । यज्ञोपवीत देवता । त्रिष्टुप् छन्द । यज्ञोपवीतधारणे विनियोग ।' असें म्हणून खालील मत्र म्हणत यज्ञोपवीत धारण करावें

**ओं यज्ञोपवीतं परमं पवित्रं प्रजापतेर्यत् सहज पुरस्तात् ।**
**आयुष्यमग्र्यं प्रतिमुञ्च शुभ्रं यज्ञोपवीत बलमस्तु तेज. ॥**

**अर्थ**–यज्ञोपवीत अत्यत पवित्र असून हें ( पुरस्तात् ) फार पुरातन काळीं ( प्रजापते सह ज ) ब्रह्मदेवाबरोबरच उत्पन्न झालें आहे त यज्ञोपवीत ( अग्र्य, शुभ्र आयुष्य ) उत्तम, कीर्तियुक्त आयुष्य, ( बल तेज ) बल व तेज माझ्यात स्थापन करो प्रत्येक जानवें घालताना वरील मत्र

म्हणावा पण एक घातल्यानंतर आचमन करून दुसरं, याप्रमाणें धारण करावीं नंतर जुनीं धमरेच्या म्हालून, पाय न लावता काढावीं व पूर्वी सांगितलेल्या मंत्रानें जलात विसर्जन करावीं

यज्ञोपवीत-मंत्रात म्हटलें आहे कीं यज्ञोपवीत महादेवाच्या बरोबरच उत्पन्न झालें, याचा कोणी विचार करीत नाहींत म्हणूनच (स्मृतिप्रकाशे) म्हटलें आहे कीं—

' यज्ञोपवीतस्योत्पत्तिं जानाति ब्राह्मणो न चेत् ।
स वै वहति भाराय पुस्तकानि यथा वृष. ॥ '

ब्राह्मणाला यज्ञोपवीताच्या उत्पत्तीचें ज्ञान नसेल तर त्यानें अध्ययन केलेले ग्रंथ म्हणजे बैलाच्या पाठीवरील ओझें !

### यज्ञोपवीतोत्पत्ति-कथा

प्रथम शिव एकटेच अद्वितीय होते त्यांना वाटलें कीं सृष्टि उत्पन्न करावी तोंच त्यास गुणमयी माया दिसली, तेव्हा तिला त्यांनीं सूत्रासारखें रूप दिलें तिच्या योगानें शिवानें शिवात्मक ( परब्रह्मस्वरूप ) विष्णूला निर्माण केला व त्याच्याकडे देवाच्या पालनाचें कार्य सोंपविलें नंतर शिवानें सृष्टीची उत्पत्ति करविण्यासाठीं ब्रह्मदेवाला निर्माण केला, व संहार करण्यासाठीं आपलेंच एक रूप असलेला रुद्र निर्माण केला ज्ञानात्मक विष्णूनें, ब्रह्मदेव उत्पन्न होताच त्याला तें मायारूपी सूत्र घातलें, म्हणून ब्रह्मसूत्र म्हणतात यज्ञानें म्हणजे विष्णूनें घातलें म्हणून यज्ञोपवीत म्हणतात गुण (सूत्र) मय मायेचें सूचक म्हणून सूत्र म्हणतात ' सूचनात् सूत्रम् इति आहु. ' ( श्रुति ) ती माया ब्रह्याहून भिन्न नाहीं म्हणूनहि तिला सूत्र म्हणतात ( सूत्र नाम परं पदम् ) ती सुद्धा ( पर पद ) परम प्राप्तव्य सच्चिदानन्दरूपिणी—ब्रह्मस्वरूपिणीच आहे

**काहीं शंका**— जानव्याला नऊ सुतें का व तें अखंड असा एकाच सुताचें का ?

**समाधान** —अखंड एकरस ब्रह्मरूपी सूत्र ( परपद ) सर्वत्र व्याप्त आहे, सर्वांचें अधिष्ठान आहे हे सुचविण्यासाठी एकच अखंड सूत सूत त्या एका अखंड सूत्रापासूनच अकार उकार मकार हे मात्रात्रय व देवत्रय व त्रिगुण इत्यादि सर्व त्रैत उत्पन्न झालें हें सुचविण्यासाठीं, प्रथम त्या

एका अखंड सूत्राचीच तिसुती 'शमो दम• तप शोचं क्षांति• आर्जवम् एवच । ज्ञानं विज्ञान आस्तिक्यं' या नऊ प्रमुख गुणांची प्राप्ति त्याच्या गाठ्यानें श्रौतस्मार्त कर्में सिद्दीस नेऊन करावयाची, हें सुचविण्या साठीं नऊ सुतें पाहिजेतच, (गुण = सूत्र, सूत दारा व सद्गुण) म्हणूनच यज्ञोपवीत धारणसंकल्पात 'श्रौतकर्म (श्रुतिकथित कर्में') व स्मार्तकर्म (स्मृतिकथित कर्में) सिद्धीसाठीं यज्ञोपवीत धारण करतो, असें म्हणावें लागतें जगाची उत्पत्त्यादि करणाऱ्या प्रणवादि नऊ देवता सर्वश्रेष्ठत्व, निर्विकारत्व, इत्यादि अनेक गोष्टी त्या नऊ सुतानीं सुचविल्या जातात, आणि नऊ सुताच्या आश्रयानेंच स्वर्गादिकाची प्राप्ति होऊ शकते 'सुतानें स्वर्गास जाणें' या म्हणीचें मूळ हें सूत आहे

'परम पवित्र' ज्याला म्हणतात तें शास्त्रोक्त रीतीनें तयार केलें आणि श्रद्धेनें यथाविधि वापरलें तरच तें शुद्ध असणार व शुद्ध राहणार। पण सध्या करणाऱ्या ब्राह्मणापैकींसुद्धा पुष्कळाच जानवें मुळातच अशुद्ध असत अशास्त्रीय असतें तें वापरावें कसें हें बहुसंख्य ब्राह्मणानाच नव्हे तर उपाध्यायादिकास सुद्धा माहीत नसतें व माहीत असले तरी यथाविधि वापरीत नाहींत किल्ली सुरक्षित अडकवून ठवण्याची एक खुटी! यापेक्षा त्याला जास्त आदर दिलेला बहुधा दिसत नाहीं। मग श्रौतस्मार्त कर्में सुफल व्हावीत कशीं आणि शमदमादिकाची प्राप्ति होऊन मानवतेची पूर्ति व्हावी कशी! अति अपवित्र धातूची किल्ली ज्याला परमपवित्र म्हणावयाचें त्याला अडकवायची! जानवें कमरेच्या खालीं वीतभर लांब। एकाच अखंड सुताचें तिसुती नऊसुतीयुक्त फार क्वचित्! आणि कोणी तरी वाटेल त्या वेळीं काढलेलें सूत! इत्यादि सर्वच अशास्त्रीय। आता तरी जागृत होऊन स्वत च्या मापाचीं स्वत काढलेलीं शास्त्रोक्त जानवीं प्रत्येक ब्राह्मणानें तरी वापरावीं आणि व्यक्ति, कुटुंब धर्म आणि देश यांचें हित करावे

यज्ञोपवीत परम पवित्र, परमशुद्ध आयुष्यवृद्धि व धनवृद्धि करणारें ओज वाढविणारें, ब्रह्मतेज वाढविणारें ब्रह्म सूत्र (सूत्ररूपानें असलेलें ब्रह्मच आहे,' श्लोक प्रकरणारंभीं आहे ) आहे असें असता ब्राह्मणसमाजाची अशी सर्वतोपरीनें अवनति कशामुळें झाली याचा विचार करावा

यज्ञोपवीत प्रथम ब्रह्मदेवाच्या गळ्यांत घातलें गेल्यावर त्यानीं कमल-नालातील तंतूंचें यज्ञोपवीत तयार केलें; पुढें कापसाचीं केलीं जाऊं लागलीं.

**यज्ञोपवीतं परमं पवित्रं विभूषणं ब्राह्मणलक्षणं च ।**
**पद्मासनस्थेन पितामहेन उत्पादितं पंकजनालसूत्रात् ॥** (स्मृतिप्रकाश)

जानव्यावर तीन वेद तीन देव, तीन अग्नि, तीन लोक इत्यादि वास करतात. गाठीवर तीन मात्रा व नाद यासह ओंकार आणि गाठीतून बाहेर आलेल्या टोकावर गायत्रीदेवी वास करते व म्हणूनच सविधि तयार करून साविधि धारण करून यथाविधि, यथाकाल संध्या करणाऱ्याच्या गळ्यातील जानव्याची गाठ दाखविली गेली कीं भूतपिशाचें धूम पळतात !

ज्या मुलाची तब्येत ७-८ वर्षेपर्यंत नेहमीं नेहमीं बिघडते त्यानी मुंज केली कीं ती आपोआप सुधारते, हें वारंवार कितीक वर्षे पाहिलें आहे. हा जो फरक पडतो तो उपनयन-संस्कार, गायत्रीचा उपदेश, ज्याचा प्रभाव वर वर्णिला आहे तें यज्ञोपवीत धारण करणें, आणि संध्या करणें याच्या योगानें पडतो !

ख्रिस्ती धर्मातील बॅप्तिस्मा संस्कारानें त्या व्यक्तीच्या रक्तात फार सुधारणा होते हें एका फ्रेंच शास्त्रज्ञानें यत्राच्या साह्यानें सिद्ध करून दाखविलें आहे ही माहिती 'सिद्धान्त' या हिंदी साताहिकात प्रसिद्ध झाली होती तशाच प्रकारचें संशोधन निदान उपनयन संस्काराच्या बाबतींत भारतीय शास्त्रज्ञानीं सप्रयोग का करू नये ?

मुंज न झालेल्या मुलाना ज्या प्रमाणात पिशाचबाधा सहज होते तशी मुंज झालेल्याना होत नाहीं पूर्वजन्मींचें ऋण, हत्या, वैर यामुळें मात्र होऊं शकते.

यज्ञोपवीत धारण प्रथम मुंजींत केलें जातें आणि त्याच्या साह्यानें ज्या गायत्रीजपाचा अधिकार प्राप्त होतो त्या गायत्रीचा महिमा पुढील प्रकरणात थोडासा वर्णन केला आहे व त्यात पाश्चात्यांचेहि अनुभव सचित्र दिले आहेत

या प्रकरणास मुख्यत सं र. माला ग्रंथातील अनेक स्मृत्यादिवचनाचा आधार घेतला गेला आहे

* * *

प्रकरण ५ वें

# गायत्रीचा महिमा

गायत्र्या नास्ति घाऽप्राप्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥ (स्मृति)
गायत्र्या न परं जाप्यं गायत्र्या न परं तप. ।
गायत्र्या न परं ध्यानं गायत्र्या न परं हुतम् ॥ (यम स्मृति)

श्रुतिस्मृति पुराणादि अनेक ग्रंथात गायत्रीचा अपार अनंत महिमा वर्णिलेला आहे अशी एकहि स्मृति किंवा पुराण सापडणार नाहीं कीं, ज्यात गायत्रीचें वर्णन मुळींच नाहीं छांदोग्य, बृहदारण्य, नारायण, नृसिंह-पूर्वतापिनी, सूर्य, सावित्री, त्रिपुरातापिनी, इत्यादि अनेक उपनिषदामध्यें गायत्रीचें वर्णन आहे पद्म पु, (सृ ख, उ ख), अग्नि पु, नारद पु, बृहन्नारद पु, विष्णुपु, स्कंद पु, कूर्म पु इत्यादि सर्व पुराणात न्यूनाधिक प्रमाणात आहेच देवी भागवत पुराणात तर स्कंध ११तील बरेच अध्याय व बारावा स्कंद जवळजवळ सर्व व इतर काहीं स्कंदात मिळून कमींतकमी २५ अध्याय गायत्री व संध्यावर्णनात खर्ची पडले आहेत!

**श्रीमद्भागवत** पुराणाचा आरंभ व समाप्ति 'धीमहि' शब्दानें केली असून मधॆमधें सुद्धा गायत्रीमंत्र गुंफला आहे, असें भागवताच्या श्रीधरी टीकेंत दाखविलें आहे

वाल्मीकि रामायण २४ हजार श्लोकाचें आहे याचें कारण प्रत्येक हजाराच्या आरंभींच्या श्लोकाचा प्रारंभ क्रमश गायत्री मंत्रातील २४ अक्षरानीं केलेला आहे उदा० पहिला श्लोक 'तप स्वाध्यायनिरत० हा आहे गायत्रीचें पहिलें अक्षर त' त्याच्या आरंभीं आहे दुसरे अक्षर

'स' दुसऱ्या हजाराच्या आरभीच्या 'स हत्वा राक्षसान् सर्वान्' या श्लोकाच्या आरभीं आहे तिसरें अक्षर 'वि' तिसऱ्या हजाराच्या पहिल्या 'विश्वामित्र स धर्मात्मा०' या श्लोकाच्या आरभीं आहे याप्रमाणेंच बाकीचीं अक्षरें क्रमानें आहेत वा रा च्या पुष्कळ प्रतींत पुष्कळ श्लोक घुसडून दिलेले असल्यानें सर्व प्रतींत जरी हें सिद्ध झालें नाहीं तरी तशा प्रकारची शुद्ध प्रत उपलब्ध आहे आता काही महत्वाचीं वचनें पाहा—

सर्वेषा एव वेदाना गुह्योपनिषदा तथा ।
सारभूता तु गायत्री निर्गता ब्रह्मणो मुखात् ॥ (छा परि )

सर्व वेद व गुह्य उपनिषदें याचें सारसर्वस्वरूप असलेला गायत्री मन्त्र (गायत्री) ब्रह्मदेवाच्या मुखातून बाहेर पडला

गायत्रीं चैव वेदाश्च तुलया समतोलयत् ।
वेदा एकत्र सांगा• तु गायत्री चैकत• स्मृता ॥ (बृ पु )

एकदा ब्रह्मदेवानें साग चारी वेद एका पारड्यात घातले व तराजूच्या दुसऱ्या पारड्यात गायत्री मत्र घातला, तेव्हा त्याचा तोल सारखा झाला 'रुक्मिणीनें एका तुलसीदलानें गिरिधर प्रभु तुळिला' तसेंच हें ब्रह्मदेव स्वत च नारदास म्हणाले कीं,

चतुर्वेदा च गायत्री पुरा वै तुलिता मया ।
चतुर्वेदात् परा गुर्वी गायत्री मोक्षदा शुभा ॥ '
(पद्म पु सृ ख ४३।१९२।९३ )

पूर्वी एकदा मी एका बाजूस चारी वेद व दुसऱ्या बाजूस गायत्री घालून तोल केला तेव्हा ठरलें कीं, गायत्री त्याच्यापेक्षा अधिक (गुर्वी-वजनदार) श्रेष्ठ, शुभ व मोक्षदायक आहे, म्हणून नारदा तू गायत्रीचें जप ध्यान कर पुढें म्हटलें आहे कीं,

इमा यो वेत्ति गायत्रीं सर्वबीजसमन्विताम् ॥
स वेत्ति चतुरो वेदान् योगं ज्ञान जगत्त्रयम् ॥ '

प्रणवयुक्त तीन व्याहृतीरूपी बीजासह या गायत्रीला जो जाणतो, त्यानें चारी वेद, योग ज्ञान व त्रैलोक्य जाणलें यामुळेंच यमस्मृतींच्या (प्रारभीं दिलेल्या) वचनात म्हटलें आहे कीं, जप करण्यास गायत्रीसारखा

श्रेष्ठ दुसरा मंत्र नाहीं, गायत्रीच्या उपासनेसारखें दुसरें तप नाहीं, गायत्रीसारखें श्रेष्ठ दुसरें ध्यान नाहीं आणि हवनांत गायत्रीमंत्राच्या हवनासारखें हवन नाहीं गायत्रीच्या अनुष्ठानानें प्राप्त होणार नाहीं असें त्रैलोक्यात कांहींहि नाहीं. (श्लोक प्रारभ' आहे) असा गायत्रीचा प्रभाव असता, ब्राह्मणासदेखील रोज १॥ तासमुद्धा तिच्या उपासनेंत खर्च करण्याची इच्छा होत नाहीं! हें त्याचें, समाजाचें व राष्ट्राचें दुर्भाग्य!!

गायत्रीच्या जपानें त्रैलोक्यात काहीं अप्राप्य नाहीं असें जें एका स्मृतींत म्हटलें, त्याचा विस्तार दे भा [स्क ११ अ २४] मध्यें केला आहे, त्यातील सार पाहा १ कवित्व, २ अमोघ वाणी, ३ त्रिकालदर्शित्व, ४ सूर्याचें सगुण सावयव दर्शन, ५ अणिमादि अष्टमहासिद्धि, ६ इच्छित देह रूप धारण करणें, ७ देवत्व, ८ मनुत्व, ९ इंद्रपद, १० प्रजापतिपद, ११ ब्रह्मदेवपद, याची प्राप्ति सुद्धा गायत्रीच्या जपानें, तप केल्यानें होते, मग इतर पाहिजे तें मिळेल यात नवल काय?

कदमूलफलाहार, हविष्याहार, दुग्धाहार करून दिनकराच्या उदयापासून १४ घटिका होईपर्यंत एका पायावर निराधार, उभ्यानें व दोन्ही बाहू वर ताठ पसरलेले ठेवून गायत्री जप १, २ ३, ४, ५, ६, ७, ८, ९, १०, ११, १२ वर्षे केल्यानें वरील ११ गोष्टी क्रमश मिळू शकतात

गायत्रीचा जप, ध्यान होम यानीं इतर काय काय घडू शकतें व कसें प्राप्त होतें याविषयीं गायत्रीचे सकाम प्रयोग या प्रकरणात लिहिलें आहे

> अष्टादशासु विद्यासु मीमांसाऽति गरीयसी ।
> ततोऽपि तर्कशास्त्राणि पुराणं तेभ्य एव च ॥
> ततोऽपि धर्मशास्त्राणि तेभ्यो गुर्वी श्रुतिर्द्विज ।
> ततोऽप्युपनिषत् श्रेष्ठा गायत्री च ततोऽधिका ॥ (दे भा )

१८ विद्यामध्यें पूर्वमीमांसा श्रेष्ठ, तीपेक्षा तर्कशास्त्र, त्यापक्षा पुराण श्रेष्ठ (अठरा पुराणें व उपपुराणें मिळून एक पुराण ग्रंथ होतो जसा 'ज्ञानकोश' नावाचा ग्रंथ एक असतो पण त्याचे पुष्कळ विभाग खड असतात तसेंच हें आहे) (याच दृष्टीनें छादो उ मध्यें 'इतिहासपुराण,' 'इतिहास पुराण' असें म्हटलें आहे) पुराणापेक्षा धर्मशास्त्र-स्मृति श्रेष्ठ, त्यापेक्षा

श्रुति-वेद, आणि त्यापेक्षा उपनिषद श्रेष्ठ व त्यापेक्षा गायत्री (मंत्र) श्रेष्ठ होय, आणि म्हणूनच 'ब्रह्मादयोऽपि सन्ध्यायां तां ध्यायन्ति जपन्ति च' (दे. भा.) ब्रह्मदेवादि सर्व देवसुद्धा संध्येत तिचें ध्यान जपादि करतात कारण **'गायत्री तु परं तत्त्वं गायत्री परमा गतिः'** म्हणूनच

> सर्वाऽमरैः इयं ध्याता सर्वं व्याप्तं तया जगत्।
> उत्पद्यते त्रिपदायाः पुनस्तस्यां विशेत् इदम्।
> गायत्री प्रकृतिर्ज्ञेया ओंकारः पुरुषः स्मृतः।
> एतयोरेव संयोगात् जगत् सर्वं प्रवर्तते॥

इत्यादि पुष्कळ महिमा बृह पारा. (अ ३) मध्यें वर्णिला आहे वेदसुद्धा तिची उपासना करतात हें पूर्वीच सांगितलें आहे तिन्ही पादाच्या उपासनेचें हें अत्यल्प महत्त्व सांगितलें गायत्रीच्या एक एक पादाचा महिमा बृह उ मध्यें वर्णिला आहे (५।१४।१-३)

भूमि अन्तरिक्ष द्यौ (दियौ) हीं आठ अक्षरें आहेत, तशींच गायत्रीच्या प्रथम पादांत आहेत (वरेण्यम् = 'वरेणियम्' समजावयाचें) याप्रमाणें गायत्रीचा पहिला पाद त्रिलोकीस्वरूप आहे जो या पहिल्या पादाची उपासना करतो तो पृथ्वी, अन्तरिक्ष आणि स्वर्ग (भू भुव स्व) या तिन्ही लोकांना जिंकतो, 'ऋच यजूंषि सामानि' अशीं वेदत्रयीचीं आठ अक्षरें आहेत गायत्रीच्या दुसऱ्या पादांत अशींच आठ अक्षरें आहेत, तिन्ही वेद हा गायत्रीचा दुसरा पाद आहे या दुसऱ्या पादाची जो उपासना करतो त्याला तिन्ही वेदांचें संपूर्ण फळ मिळतें, 'प्राण अपान व्यान' (वियान) हीं आठ अक्षरें आहेत गायत्रीच्या तिसऱ्या पादांतहि आठ अक्षरें आहेत गायत्रीच्या तिसऱ्या पादाची जो उपासना करतो, तो प्राणापानव्यानमय असलेल्यास म्हणजे सर्व प्राणिमात्रास जिंकतो गायत्रीचा तिसरा पाद प्राणापानव्यानस्वरूप आहे 'परो रजसे सावदोम्' या गायत्रीच्या चतुर्थ पादाचाहि असाच महिमा पुढें वर्णिला आहे तो रजतमोऽतीत दर्शनीय पद ब्रह्मरूप आहे तोच तुरीयस्वरूप परमात्मा सूर्यादिरूप होऊन सर्वांस प्रकाश, उष्णता, प्रेरणा वगैरे देतो गायत्रीच्या तुरीय पादाची जो उपासना करतो तोहि श्रीयश इत्यादींनी सर्वांवर आपला प्रभाव, प्रकाश, तेज पाडतो (त्रिपदेच्या जपाच्या १/८

जप याचा करावा असें अनुभवास आलें आहे कीं, चतुर्थ पादाचा मुळींच जप न करतां जे केवळ त्रिपदेचाच करतात, त्याच्यापेक्षां त्रिपदेचा करून त्याच्या १।८ चतुर्थ पादाचा जप करणारांचा प्रभाव जास्त पडतो. तुरीय चैतन्यरूपी गायत्री सर्व प्राण्याच्या हृदयात स्वयज्योति (स्वयप्रकाश) प्रत्यक्चैतन्य (प्रत्यगात्मा) रूपानें राहिली आहे जे ब्राह्मण अर्थ जाणून भावनापूर्ण हृदयानें गायत्रीची उपासना करतात त्यानीं कोणताहि प्रतिग्रह घेतला तरि त्यास दोष लागणार नाहीं, इत्यादि बरेंच वर्णन पुढें ५ व ६ या मंत्रात आहे येथें अधिक विस्तार नको लक्षात ठेवावें कीं, कोणताहि प्रतिग्रह बाधक न होण्यास उपनयन झाल्यापासून सध्यालोप एकदाहि झालेला नाहींच चालणार, पण मुख्यकाल सुद्धा एकदाहि चुकलेला असता नये, शिवाय सदाचार व नीतिपालन चागलें असलें पाहिजे याविषयीं पुष्कळ उदाहरणें आहेत, पण विस्तारभयास्तव देणें इष्ट नाहीं

गायत्रीची सर्वव्यापकता, ब्रह्मस्वरूपता, पापविनाशक प्रभाव, आधि-व्याधिनिवारक सामर्थ्य, भोगमोक्षदायक शक्ति, इत्यादींचें दुसऱ्या अनेक उपनिषदात, स्मृतीत, पुराणात व इतर ग्रंथात पुष्कळ वर्णन आहे फार कशाला, धनुर्वेदात वर्णिलेले अस्त्रविद्येचे मंत्रसुद्धा मुख्यत गायत्रीमंत्राचेच बनलेले आहेत

इतर कोणत्याहि वेदमंत्राचें अनुष्ठान सिद्ध होण्याची पात्रता येण्यास, गायत्रीची नित्य उपासना करणारानें सुद्धा, प्रायश्चित्तादि विधीपूर्वक गायत्रीचें २४ लक्षाचें एक तरी पुरश्चरण सविधि केलेलें पाहिजे नतर वेदमंत्राचें किंवा धनुर्वेदोक्त अस्त्रमंत्राचें पुरश्चरण केलें तर त्याची सिद्धि होण्याची शक्यता असते, तथापि या कलिकालात तें अशक्य झाले आहे ज्या अस्त्रमंत्राचें अनुष्ठान करणें असेल तो मंत्र ज्याचा सिद्ध झाला आहे असा उपदेश करणारा गुरु लागतो, परतु ती परपरा लुप्त झाली आहे एक अगदीं दहा वीस वर्षांपूर्वीचें उदाहरण देऊन काहीं अस्त्राचे मंत्र नमुन्यासाठीं म्हणून देऊ

उत्तर हिंदुस्थानात एक सवाई सिद्धेश्वर ब्रह्मचारी नावाचे ब्राह्मण होते, (ते आज असतीलहि कदाचित्) त्यानीं मंत्रानुष्ठानानें इतकी सिद्धि

मिळविली होती कीं ते एकटे होते तरी, २०२५ माणसाच्या पालन-पोषणास लागणारें द्रव्य, इतर काहीं उद्योग न करता, त्यास प्राप्त होत असे ते कोणाकडून काहींहि घेत नसत व परान्नहि घेत नसत सनातन वैदिक धर्मावर होत असलेलें परधर्मीयाचें आक्रमण व हिंदुस्थान देशाचें पारतंत्र्य, पाशुपतास्त्र सिद्ध करून नष्ट करणें हा त्याचा हेतु होता, पण ३६ वर्षे अनुष्ठान करून मुद्रा त्यास तें साधलें नाहीं त्याची ती तळमळ मरणक्षणापर्यंत टिकली तर कोणत्यातरी जन्मात त्यास पाशुपतास्त्र सिद्ध होईल, यात मात्र शंका नाहीं तें अनुष्ठान करीत असल्याची माहिती १९३८ मध्यें अजमीर येथें जाणें झालें असता समजली होती

**ब्रह्मास्त्रमंत्र**-गायत्रीमन्त्र उलटा म्हटला कीं तोच ब्रह्मास्त्र मन्त्र होतो पण त्याला काहीं बीजें लावावीं लागतात त्याचें अनुष्ठान एक निखर्व करावें लागतें प्रयोग करताना 'श्रीं पशु' हु फट् अमुक शत्रु (शत्रून्) हन हन हु फट्' असें म्हणावें लागतें

**ब्रह्मदण्ड**-वसिष्ठाच्या ज्या ब्रह्मदंडानें विश्वामित्रासारख्यास 'धिग् बलं क्षत्रिय बल ब्रह्मतेजो बल बलम् । एकेन ब्रह्मदण्डेन हत मे क्षत्रिय बलम्' असें म्हणावयास लावलें, तो ब्रह्मदण्ड म्हणजे ब्रह्मदण्ड नावाचें अस्त्र होय त्याचा मन्त्र 'ओ प्रचोदयात्रो यो धियो धीमहि देवस्य भर्गो वरेण्य सवितु तत्' हा आहे

**अग्न्यस्त्र, नारायणास्त्र** इत्यादि अस्त्राचे मन्त्र गायत्रीमन्त्रातील शब्दाच्या विविध क्रमानेंच तयार झालेले आहेत जो **मृत संजीवनी मन्त्र** फक्त शुक्राचार्यांनाच सिद्ध होता, तो 'त्र्यंबक यजामहे' मन्त्राच्या चार चरणाच्या मधेंमधें गायत्रीचे तीन चरण घातल्यानें होतो

**बलातिबलाविद्या मंत्र**- यानें क्षुधादिकाचें पूर्ण निरसन होऊ शकतें व अपार तेज, बल, ओज इत्यादींची प्राप्ति होते ही विद्या विश्वामित्राकडून श्रीरामलक्ष्मणास मिळाली होती या मन्त्रात गायत्री मन्त्रातील सर्व पदें मधें मधें वापरलेलीं आहेत हा मन्त्र **सावित्री-उपनिषदांत आहे.** कलिकालात अस्त्रविद्येतील मन्त्र सिद्ध होणें जरी अशक्य असलें तरी हा मन्त्र सिद्ध होऊ शकेल अशी खात्री वाटते पण त्यापूर्वीं १० चांद्रायणें व ४९ दिवस पिण्याकयत करून एक गायत्रीपुरश्चरण (२४ लक्षांचें) केलें पाहिजे.

त्या मंत्राचें एक पुरश्चरण एक मंडल दिवसांचें (मंडल = ४९) रोज जप १०८. चार पुरश्चरणें गुरुमुखानें मंत्र श्रवण करून केलीं पाहिजेत; गुरु उत्तम अधिकारी पाहिजे. पारेकृत पुरश्चरण पद्धतींत वर दिलेल्या ब्रह्मास्त्र मंत्राच्या अर्धी आणखी बराच भाग आहे.

असा अपार, कल्पनातीत सामर्थ्यसंपन्न मंत्र गायत्री मंत्राशिवाय दुसरा एकहि नाहीं; पण लक्षांत ठेवावें कीं त्या अस्त्राचा उपयोग करणारे महा धनुर्धर क्षत्रिय महावीर, रणांगणात सुद्धा अगदीं योग्य काळीं, संक्षिप्त प्रकारें सन्ध्या करीत असत. रात्रंदिवस युद्ध चालू असता सुद्धा संध्यालोप किंवा काळलोप करीत नव्हते. अस्त्रप्रयोग करण्यापूर्वी रणांगणांत सुद्धा आचमन करीत असत, इत्यादि महाभारताभ्यासूंना माहीत असेलच.

**शंका**– गायत्रीचा जप न करता नुसत्या मंत्रार्थाचें मातृभाषेत चिंतन केलें तर काय बिघडेल?

**समाधान**–मागें दिलेल्या ब्रह्मदंड मंत्रात गायत्री मंत्रातील सगळे शब्द, पदें आहेत; एक सुद्धा जास्त नाहीं; अर्थहि तोच आहे, मग परिणाम अगदीं निराळा का! शब्द तेच असून पदाचा क्रम बदलला; तीं सर्व पदें ब्रह्मदेवाच्या मुखातूनच निघालेलीं आहेत; तरी सुद्धा जर विपरीत परिणाम होतो, तर मग आम्हीं पामर मानवानीं वापरलेल्या मातृभाषेतील शब्दांनीं तेंच फळ कसें मिळेल!

**त्रिविध प्रकारें मंत्रपरिणाम**–काहीं मंत्राचें कार्य त्यातील शब्दाच्या ध्वनीनें, कांहींचें अर्थानें व काहींचें मंत्रदेवतेच्या प्रसादानें होतें, तर काहींचें यातील दोन किंवा तीनाच्या संयोगानें होतें. काहीं मंत्र तर असे आहेत कीं त्याचा काहीं अर्थच होत नाहीं. त्याचें कार्य केवळ ध्वनीनें घडतें. शाबर मंत्र केवळ ध्वनीनें कार्य करणारे आहेत. म्हणूनच तुलसीरामायणात म्हटलें आहे कीं,

> 'अनमिल आखर अर्थ न, जापू।
> प्रगट प्रभाउ महेस प्रतापू॥'

शाबर मंत्रातील अक्षरात, शब्दात, काहीं ताळमेळ नाहीं, अर्थ नाहीं; फक्त जप, उच्चार! पण प्रभाव मात्र प्रगट दिसतो; कारण त्या मंत्राची निर्मिति 'हर-गिरिजा' यानीं केली आहे.

कलि बिलोकि जगहित हरगिरिजा ।
साबर मंत्रजाल जिन्ह सिरिजा ॥

कलियुगातील माणसाची दुर्दशा पाहून त्याच्या हितासाठीं हरगिरिजा यानीं शाबर मंत्राचा समूह निर्माण केला त्यास शाबरी विद्या म्हणतात तेवढ्यासाठीं शंकरपार्वती यानीं शबर (भिल्ल), शबरी (भिल्लीण) याचें रूप घतलें होतें शबरापासून झालेले ते शाबर हे मंत्र विशेषत भिल्ल, कोळी ठाकुर, कातकरी, वारली वगैरे वनात राहणाऱ्या लोकात अद्यापहि प्रचलित आहेत व प्रभावी आहेत, पण ते लोक तेवढ्यासाठीं अनेक कठीण नियमाचें पालन करतात महेशाचा, त्या मंत्राच्या ऋषींचा प्रताप व त्या शब्दाचा ध्वनि यानी त्या मंत्राचें फळ मिळतें भूतपिशाचबाधा, सर्पदंश, वृश्चिक दंश, रोग इत्यादि विविध पीडा निवारण करणारे विविध मंत्र त्यात आहेत मानसिक जपातील ध्वनि सुद्धा कार्य करतो मंत्र कोणत्याहि प्रकारें कार्य करणारा असला तरी मंत्रनिर्मात्या ऋषीचा प्रभाव त्याच्या पाठीशीं असतोच, म्हणूनच मंत्राचा उपयोग करण्यापूर्वीं त्याच्या ऋषीच्या नावाचा उच्चार करावा लागतो राम, कृष्ण दत्त, शिव इत्यादींच्या नाम-मंत्राचे सुद्धा ऋषि, छंद व देवता याचे उल्लेख, मंत्रवर्णनात उपनिषदात सुद्धा आहेत, न्यासहि आहेत

गायत्री मंत्राचा प्रभाव ध्वनि, देवता व अर्थानुसधान यापैकीं एक किंवा तिन्ही प्रकारानीं पडतो अस्त्रविद्येतील गायत्री मंत्रात ध्वनि व देवताप्रसाद यानीं कार्य घडतें, म्हणूनच त्या देवतेचें अस्त्र असेल त्या देवतेच्या कृपेशिवाय तो मंत्र फलदायी होत नाहीं, ब्रह्मास्त्र, ब्रह्मदंडास्त्र, ब्रह्मदेवाच्या कृपेनेंच सिद्ध होतात पाशुपतास्त्र पशुपति शंकराच्या कृपेनें सिद्ध होतें म्हणूनच द्रोणाचार्यांकडून मंत्र मिळालेला असताहि भिल्लरूपात असलेल्या पशुपति शंकराशीं अर्जुनाला युद्ध करावें लागलें असेंच इतर अस्त्रमंत्राचें आहे

**पाश्चात्याचे अनुभव**-काहीं ख्रिस्ती पाश्चात्यानीं गायत्रीमंत्र व इतर अनेक वेदमंत्र याचे अनुभव प्रयोगानीं घेतलेले वर्णन केले आहेत अशा व्यक्तींत थिऑसॉफिकल सोसायटींतील डॉ ॲनी बेझंट व बिशप लेड बिटर याचीं नांवें उल्लेखनीय आहेत. आणि त्यास चार्ल्स लेडबीटर यांचें

नांव विशेष उल्लेखनीय आहे. त्याना काहीं मंत्राने जे परिणाम अतींद्रिय ज्ञानानें दिसले तें त्यानीं 'ए टेंपल थॉट फॉर्मे' या लेखात सचित्र वर्णन केले आहेत.

The Chakras (षट्चक्रदर्शन) हाहि त्याचा एक सुंदर अनुभविक ग्रंथ आहे. व त्यात चक्राची माहिती व कुंडलिनी जागृति याविषयीं मार्गदर्शक चागली माहिती आहे; धोक्याच्या सूचना म्हणजे निषेधहि वर्णिले आहेत. सुशिक्षित म्हटला जाणारा बराचसा ब्राह्मणसमाज परप्रत्ययनेयबुद्धि झाला आहे व तो मॅक्सम्यूलर व त्याचे अनुयायी अशा पाश्चात्य पंडितानीं हेतुपूर्वक केलेल्या बुद्धिभेदाचा परिणाम आहे. श्रुति-स्मृति इतिहासपुराणावरील त्याचा विश्वास उडाला आहे. जेव्हा हिंदु-शास्त्रात सांगितलेल्या एकाद्या सिध्दान्तावर पाश्चात्य पंडिताच्या मान्यतेचा शिक्का बसून तें पार्सल इकडे येतें,तेव्हा निदान वाणीनें तरी मान्य करण्याची प्रवृत्ति होते. (पर) परकीयाच्या (प्रत्यय) प्रत्ययानें-अनुभवानें (नेय) वळविली जाणारी ज्याची बुद्धि असते ते पर-प्रत्यय-नेय-बुद्धि. अशासाठीं व गायत्रीमंत्राचा प्रभाव श्रद्धावन्तास कळावा म्हणून हा खटाटोप व विस्तार करून गायत्रीमंत्रोच्चाराविषयींचे त्याचे अनुभव द्यावे लागत आहेत; पण ईंहि दिसून आलें आहे कीं त्या साहेबानीं काहीं बाबतींत प्रयोग करून पाहिले नसावेत.

एका माणसानें किंवा अनेकानीं एकाच वेळीं गायत्री मंत्र म्हणावा व अदृश्य सृष्टींत होणारे त्याचे परिणाम लेडबीटर यानीं पाहावे, असे प्रयोग त्यानीं केले अदृश्य सृष्टींत होणाऱ्या घडामोडी पाहण्याइतकी अतींद्रिय-शक्ति त्याच्या ठिकाणीं होती 'सनातनी' म्हणविणाऱ्या वाचकानीं साशंक होऊन कान टवकारण्याची आवश्यकता नाहीं. अतींद्रिय दृष्टीन ज्योतिषशास्त्राचें सखोल व अपूर्व ज्ञान प्राप्त झालेले, रॅफेल, चारसेल, ॲलनलिओ इत्यादि द्रष्टे त्याच्यात सुद्धा होते; आणि विचारप्रक्षेप, (थॉट ट्रॅन्स्मिशन) शेंकडों मैलावरून करणारे पुरुषहि पाश्चात्यात होते, आजहि असतील!

लेडबीटर याना मुख्यत असें आढळलें कीं, गायत्री मंत्र हा ध्वनीचा मंत्र नसून अर्थाने परिणाम करणारा मंत्र आहे; पण हें म्हणणें अर्धसत्य

आहे हें प्रयोगांनीं अनेकवार सिद्ध झालें आहे; अर्थ न समजतां, अर्थाकडे लक्ष न देतां, गायत्री उच्चारल्यास जो परीणाम होतो तो निराळ्या प्रकारचा असतो इतकेंच. प्रत्यक्ष मिळालेल्या अनुभवापैकीं एकच छोटेंसें उदाहरण पुढें दिलें आहे.

सातारा जिल्ह्यांतील एका M. B. B. S. डॉक्टरांच्या मुलाची मुंज, हा लेखक तेथें असतां ठरली. ते डॉक्टर, त्यांची पत्नी, पुत्र व कन्या चांगल्या संस्कारी व्यक्ति आहेत. गायत्रीमंत्रोपदेशकानें १२ हजार गायत्री जप आधीं करावा लागतो, तो त्यांच्याकडून करविला गेला होता. सर्व विधि अगदीं यथाशास्त्र, यथाविधि करविले गेले. मंत्रोपदेश कसा करावयाचा, मंत्र गुप्त असल्यास उपदेशसमयीं जाग्रत कसा करावयाचा वगैरे सर्व यथामंत्रशास्त्र डॉक्टरास सांगितलें गेलें होतें. उपदेशकाळीं तेथें आसुपासुस तिसरी व्यक्ति असूं नये म्हणून असलेल्यांस युक्तीनें कसें दूर घालवावें वगैरे सर्व सांगितलें होतें. 'गर्भाष्टमे वर्षे' मुंज उत्तम मुहूर्तावर लागली होती, उपदेशकालहि ज्योतिषशास्त्रदृष्ट्या चांगला ठरविला होता. त्या डॉक्टरांस गायत्री मंत्राचा अर्थ माहीत नव्हता; ते दत्तोपासक आहेत. तो मुलगा मुंजीपूर्वीं बरेच महिने घरींच स्वतंत्र ठिकाणीं हनुमंताच्या मूर्तीची पूजा व 'हनुमान' या नावाचा जप करीत असे. मंत्रोपदेश करण्यापूर्वीं वपन केलेल्या मस्तकावर उजवा हात ठेवून त्या मंत्राचा दहा वेळां तरी मनांत जप करावयाचा असतो. पण या गोष्टी कोणास बहुधा माहीत नाहींत. डॉक्टरांनीं ठरलेल्या मुहूर्तावर मुलाच्या मस्तकावर हात ठेवून यथाविधि सर्व केलें; तोंच त्या बटूला अंतःचक्षुसमोर पंचमुखी देवी दिसली. त्यानें गायत्रीचें चित्र कधीं पाहिलें नव्हतें. तो सर्व विधी उरकल्यावर, तो बटु त्वरेनें आईजवळ गेला व तिला विचारलें कीं, 'आई, हातांत चाबूक असलेली पांच मुखांची देवी कोण?' ती म्हणाली 'मला नाहीं ठाऊक, माडीवर जाऊन स्वामींना विचार.' तो तडक आला व नमस्कार करून त्यानें विचारलें. तें ऐकतांच या स्वामीला बोलवेना! नेत्र वाहूं लागले! (हें लिहीत असताहि तसेंच होत आहे). कसेंतरी सांवरून त्यास सांगितलें गेलें कीं, 'बाळ! ती गायत्री देवी बरं!' नंतर लगेच त्यास 'मुक्ताविद्रुम०' हा गायत्रीच्या ध्यानाचा श्लोक सार्थ शिकविला. हा गायत्रीध्यानाचा श्लोक

संध्येच्या वेळीं म्हणणाऱ्या ब्राह्मणास विचारलें तर 'कशा' म्हणजे चाबूक हें त्यास माहीत नाहीं असेंच बहुधा दिसेल; व कदाचित हेंहि दिसेल कीं, गायत्रीच्या तशा चित्राचें रोज पूजन करणारास, किंवा गायत्रीमंदिरातील देवीचें अनेक वेळा दर्शन घेतलेल्यास सुद्धां हें माहीत नसेल कीं गायत्रीच्या एका हातात चाबूक आहे। यावरून अनुमानें काढणें तीं वाचकानीं काढावीं. हे प्रयोग मुद्दाम करून पाहावे। त्या सात वर्षांच्या बटूला गायत्री देवीचें जें दर्शन झालें तें अर्थानुसंधानाचा किंवा ध्वनीचा परिणाम म्हणता येत नाहीं. तो केवळ गायत्री देवीच्या कृपेचा परिणाम होय. लेडबीटर यानीं गायत्रीच्या प्रसादानें येणाऱ्या अनुभवासाठीं प्रयोग करविले नसावेत, किंवा ज्यानीं प्रयोग केले त्या गुरुशिष्य व्यक्ति कृपापात्र नसाव्यात असें म्हणावें लागतें. इतकें मात्र खरें कीं, कौमार्यात जसे सहज अनुभव येतात तसे तारुण्यात किंवा वार्धक्यात फारच थोड्या प्रमाणात येतात. **म्हणूनच कौमारे आचरेत् प्राज्ञः धर्मान् भागवतान् इह** (भाग.) असें म्हटलें आहे.

***ओंकाराविषयीं त्यांचा अनुभव–***

लेडबीटर म्हणतात, ॐ हा ध्वनि आहे. त्याचें कार्य ध्वनीनें होतें, त्याच्या उच्चाराच्या अनेक पद्धति आहेत (कोणत्या तें त्यानीं दिलें नाहीं; पण येथें पुढें सांगितलें आहे). ज्या पद्धतीनें तो उच्चारावा त्या ध्वनी-प्रमाणें कार्य घडतें; मनुष्याच्या सूक्ष्म देहातील कण शिस्तींत येतात; ते बेमदशाही सोडून देतात, व मंत्रशक्ति त्या माणसाच्या देहात प्रवेश करण्यास अनुकूलता उत्पन्न होते, हें त्यांच्या म्हणण्याचें सार आहे. हे त्याचे अनुभव अर्धसत्यासारखे आहेत. नुसत्या सूक्ष्मदेहातील सूक्ष्मद्रव्येंच नव्हेत तर स्थूलदेहातील, रोम, त्वचा, रसवाहिन्या, रक्तवाहिन्या, स्नायू, शिरा, फार महत्त्वाच्या विविध ग्रंथि, इत्यादींवर सुद्धा प्रणवाच्या उच्चारानें हित-कारक परिणाम घडतात

ध्वनीनेंच स्थूल देहावर घडणाऱ्या परिणामाचा अनुभव येण्यास जसा प्रणवाचा उच्चार केला पाहिजे तसा करणारे त्यास कोणी भेटले नसावेत व स्वतःहि त्यास तसा उच्चार करता येत नव्हता हें यावरून ठरतें; कारण त्या उच्चाराचे परिणाम उच्चार करणारालाहि सहज कळतात.

स्वामी रामतीर्थांनीं प्रणवाचा दीर्घ उच्चार केला कीं, श्रोत्यांच्या अंगावर निदान शहारे तरी येत असत, रोमांच उभे राहात असत तसा दीर्घकाळ घंटानिनादवत् उच्चार करणारी काहीं मंडळी आजहि महाराष्ट्रात आहेत प्रणवाचे अनेक अर्थ पुढें एका प्रकरणात दिले आहेत, त्यांतील **'उच्चार्यमाणः एव प्राणान् ऊर्ध्वं उत्क्रामयति'** हा एक आहे केवळ उच्चार केल्याबरोबर प्राणापानादि सर्व प्राणाना वर (हृदयाकडे, मेंदूकडे) जाण्यास ऊर्ध्वगति देतो' म्हणून प्रणव म्हणतात अशा प्रणवाच्या उच्चारानें इंद्रियांची बाहेरची धाव थांबते व तीं अन्तर्मुख होऊं लागतात, म्हणजे प्रत्याहार आपोआप होऊं लागतो दशप्राणांची गणना लिंगदेहात-सूक्ष्मदेहात केलेली असली तरी त्यांचें कार्य स्थूल देहावर घडतेंच चलन वलन, प्रसरण, आकुंचन इत्यादि, उचकी, जांभई, ढेकर, शिंक इत्यादि गोष्टी प्राणाचींच कार्ये आहेत प्रणवोच्चारानें प्रत्याहार साधतो, म्हणूनच भ गी मधें **'सर्वेन्द्रियाणि संयम्य मनो हृदि निरुध्यच '** वगैरे कसें-कशानें साधावें हें पुढल्याच श्लोकारभीं **'ओम् इति एकाक्षरं ब्रह्म व्याहरन्'** (ओं या एकाक्षर ब्रह्माचा उच्चार करीत) या शब्दानीं स्पष्ट सांगितलें आहे त्यापुढें **'माम् अनुस्मरन्'** माझें स्मरण करीत असें जें सांगितलें तें स्मरण चिंतन त्या प्रणवाच्या अर्थाच्या अनुसंधानानेंच करावयाचें असतें

प्रणवाच्या अर्थाच्या विवेचनानें अनेक उपनिषदें भरलीं आहेत प्रणवाच्या मंत्राच्या ज्ञानानें सुद्धा क्रमश काय फळ मिळतें याचें प्रथम माण्डूक्योपनिषदात आणि पुढील अनेक उपनिषदांत वर्णन आहे, केवळ प्रणवार्थाचें चिंतन केल्यानें सुद्धा आत्मज्ञान व मोक्ष प्राप्त होतो असें अनेक उपनिषदादि ग्रंथात सांगितलें आहे व तो नुसता अर्थवाद नसून सत्य सिद्धांत आहे लेडबीटरना फक्त त्याच्या ध्वनीचा व तोहि अर्धवट अनुभव आला, पण जो अनुभव त्यांना आला तो असत्य नाहीं प्रणवाच्या परिणामाविषयीं आणखी पुष्कळ सांगण्यासारखें असलें तरी येथें त्याची आवश्यकता नाहीं प्रणवानंतर तीन किंवा सात व्याहृति (काहीं वेळा) गायत्रीपूर्वी उच्चाराव्या लागतात, त्यांविषयीं व गायत्रीविषयीं त्यांचे अनुभव देऊन प्रणवाच्या उच्चाराचे प्रकार सांगणें बरें.

At each repetition of गायत्री a great shaft of light which immediately pours down upon and into the reciter, comes as though from the Physical Sun, in whatever direction that Sun may happen to be, even below horizon, for then the shaft comes up at once through the Earth ! (see Fig 1)

The shaft is white just slightly tinged with gold, but when it has filled the soul of the reciter, he promptly shoots it from him again in seven great rays, cones of light, having the colours of spectrum It is as though the singer acts as a prism

All these rays, cones of light, which radiate from the reciter have the diameter of his aura as their base

They do not radiate in a circle in all directions but in a semicircle in the direction which the reciter is facing

Further more these rays have a curious appearance of solidifying as they grow narrower, until they end in a point of blinding light

And a still more curious phenomenon is that, these points act as though they were living, if a man happens to come in the way of one of them, that point curves with rapidity and touches his heart and his brain causing them to glow momentarily in response Each ray appears to be able to produce this result on an indefinite number of people in succession (see Fig 2)

तीन व्याहृती-ते म्हणतात-प्रणवानंतर तीन लोकांच्या नावाचा उच्चार करावयाचा असतो भूर्लोक ही पृथ्वी, भुवर्लोक म्हणजे या पृथ्वी-भोंवतीं असलेल्या वायूच्या आवरणासारखें पण त्याहून फार विरळ द्रव्याचें आवरण आहे तें स्वर्लोक म्हणजे स्वर्गलोक, हे भुवर्लोकापेक्षाहि अधिक विरल अशा द्रव्याचें आवरण आहे तें तिन्ही लोकांवर गायत्रीचा

परिणाम घडावयाचा असतो, म्हणून प्रणवानंतर या तीन लोकांचा नामनिर्देश करावयाचा असतो

त्यांच्या म्हणण्यावर शंका अशी येते की, त्यांचा नामनिर्देश न केला तर त्यावर गायत्रीचा परिणाम होईल की नाही? होणार नसेल तर का? सार इतकेंच की या तीन व्याहृतींनें होणारे परिणाम त्यास दिसले नाहींत, पण काहीं तरी सांगणें क्रमप्राप्त झाल्यानें केवळ तर्कानें सांगितलें सातव्या-छटींच्या उच्चाराचे दिसलेले परिणाम त्यांनीं सचित्र वर्णिलेले पूर्वींच सचित्र दाखविलें आहे त्यांनीं यांच्या अध्यात्मपर अर्थाचाहि उल्लेख केलेला नाहीं भू = सत्, भुव = चित्, व स्व = आनंद हे अर्थ श्रीमदाचार्यांनीं व इतर भाष्यकारांनी स्पष्ट सांगितले आहेत आणखी अर्थ आहेत ते प्रणवार्थानंतर ह्याच प्रकरणात दिले आहेत

गायत्रीचें कार्य काय व कसें घडतें याविषयीं ते म्हणतात कीं – 'ज्याला चांगलें संस्कृत येत नसेल त्यानें अर्थाकडे लक्ष ठेवून निष्ठेनें ते शब्द उच्चारले पाहिजेत त्याप्रमाणें शब्द उच्चारले गेले कीं सूर्या-पासून एक तेजाची शलाका-प्रवाहधारा त्या उच्चार करणाराकडे प्रत्येक मंत्रोच्चारावरोबर येते, व त्याच्या अंतरात प्रवेश करून, हृदय व मेंदू यास व्यापून भरून टाकते (छपराच्या किंवा भिंतीच्या) एकाद्या भोकातून, छिद्रातून सूर्यप्रकाशाची तिरीप–शलाका जशी सरळ घरात येते तशी सरळ येते उज्वल, शुभ्र पण सोनेरी छटा तिची असते मंत्र म्हणण्याच्या वेळीं सूर्य क्षितिजाखालीं गेलेला, कोठेंहि असला तरी ती



तेजोरेषा, शलाका, सूर्य जिथें असेल तिथून सूर्यादिन निघून पृथ्वीच्या पोटातून वर येऊन उच्चार करणाऱ्याच्या तेजोवलयापर्यंत सरळ रेषेंत येते. (चित्र १ पहा) चित्रातील माणसाच्या भोंवतीं जो परीघ दिसतो तें त्याच्याभोंवतीं असलेलें तेजोवलय आहे ते मनुष्याच्या अधिकारानुसार लहान मोठें असतें. जी दुहेरी रेषा दिसते ही सूर्यादिन आलेली तेजोरेषा होय

अंतरांत शिरलेलें तेज थोड्याच वेळात बाहेर पडतें बाहेर पडताना त्या माणसाच्या समोरच्या बाजूनें, त्याच्या तेजोवलयातून, शंकूच्या आकृतीसारख्या किंवा चेवड्याच्या पातीसारख्या सात प्रवाहानीं बाहेर पडतें. त्याचा वर्ण इंद्रधनुष्यासारखा किंवा काचेच्या लोलकातून बाहेर पडणाऱ्या सात रंगाच्या सारखा असतो असें म्हटल्यास चालेल. ते सात प्रवाह मूळाकडे रुंद असून हळुहळू निमुळते होत जातात व शेवटीं एक अगदीं सूक्ष्म टोंक येतें. हें टोंक इतकें कल्पनातीत तेजस्वी असतें कीं डोळे दिपतात.

त्या प्रवाहांचें विशेष आश्चर्य म्हणजे ते सजीव ज्वाळांसारखे असतात व त्याच्या टोकाच्या आसपास पुढेंमागें कोणी मनुष्य असला किंवा गेला तर त्याच्याकडे बाजूला तें टोंक वळतें किंवा पुढें मागेंहि सरतें व त्याच्या हृदयात, मेंदूत शिरून त्यास मारून टाकतें



अनेक माणसें त्या सात प्रवाहाच्या कक्षेत असल्यास त्या सर्वांवर त्याचा परिणाम होतो मात्र सगळे प्रवाह सर्वांवर परिणाम करीत नाहींत त्या प्रवाहाच्या कक्षेत जे असतील त्यांच्यावरच त्यांचें कार्य घडतें

**अनेकांनीं एकाच वेळीं गायत्रीचा उच्चार** केला तर प्रत्येकाकडे निराळी तेजशलाका येत नाहीं, पण जास्त रुंद प्रवाह त्याच्याकडे येतो व त्या सर्वांवर पूर्वीसारखाच परिणाम करतो बाहेर पडताना प्रत्येकातून सात प्रवाह बाहेर न पडता त्या मंडळींतून सातच (सतरंगाचे) प्रवाह पूर्वीसारखे पण मोठ्या आकाराचे बाहेर पडतात व त्यांच्या कक्षेत येणारांवर पूर्वीसारखेच परिणाम करतात (चित्र २ पहावें)

याप्रमाणें गायत्रीमंत्र मनुष्याच्या (मानवतेच्या) उन्नतीला साह्य करतो, जप करणाराच्या बुद्धींत प्रेरणा, स्फूर्ति, भावना इत्यादींना उत्तेजन मिळतें *आणि त्याच्याजवळ असणारांनाहि उत्तेजन मिळतें या मंत्रानें माणसाच्या* भोंवतालचें वातावरणच भारलें जातें, उच्च प्रकारचें बनतें हें त्याच्या लेडबिटरच्या-अनुभवाचें सार आहे

**सूर्यबिंब म्हणजेच सविता**- सवितृ देव नव्हे, सूर्यबिंबातर्गत ब्रह्म म्हणजे सविता, हें जसें श्रुतिस्मृति पुराणें व भाष्यें इत्यादींत सांगितलें आहे तसेंच पण थोड्या निराळ्या प्रकारें लेडबीटरनें सांगितलें आहे

**लेडबीटर याचे उपकार**- हें थोडेसें महत्कार्य करून त्यानीं वैदिक सनातन धर्मावर व धर्मीयावर मोठे उपकारच केले आहेत त्याच्या यशोधनातें जरी न्यूनता असली तरी तें विचारवतास व स्वहिताकांक्षी लोकास कार्यप्रवण करण्यास पुष्कळ उपयोगी पडेल यात शंका नाहीं मायासाह्यानें जीवानें केलेलें कार्य केव्हांहि परिपूर्ण किंवा निर्दोष होणें शक्यच नाहीं स्वयंपरिपूर्ण व पूर्णनिर्दोष असें फक्त 'ब्रह्म' परमात्मा, परमेश्वरच, बाकी सर्व 'गुणदोषमय जगत्' भारतातील ब्राह्मणात कोणीच अतींद्रिय दृष्टिसंपन्न नसेल असें नाहीं, त्यानीं असले प्रयोग का करू नयेत ? लेडबीटर सारख्या परदेशीय, परधर्मीयाच्या वचनावर असल्या बाबतींत लोक जेवढा विश्वास ठेवतील तेवढा स्वदेशीय, स्वधर्मीयावर ठेवणार नाहींत हें खरें असलें तरी थोडे लोक तरी ठेवतीलच !

लेडबीटरनीं अतींद्रिय शक्तीनें काहीं अशीं ऋषींच्या सारखेंच कार्य केलें आहे या साहेबानीं जें सांगितलें तेंच ऋषींनीं स्मृतिकारानीं सांगून ठेवलें असतें तर त्याच्या वचनावर विश्वास ठेवला गेला नसता

'अग्नौ प्रास्ताऽऽहुतिः सम्यक् आदित्यम् उपतिष्ठते।'

अर्थात यथाविधि दिलेली आहुति आदित्यमंडलात पोंचते हें व असें आणखी पुष्कळ ऋषींनीं सांगितलेलें आहे, पण कोण ठेवतात खरा विश्वास

**अनुभव**– आचारसंपन्न व नीतिसंपन्न राहून श्रद्धेनें जे गायत्रीची उपासना घरीं करतात किंवा करूं लागतात, त्यांच्या संगतींत येणारे व त्यांच्या घरीं काहीं दिवस राहणारे, यांच्यावर फार चांगला परिणाम होतो, व तेहि पुढें हळुहळू गायत्री जप संध्या वगैरे करूं लागतात, याचे अनुभव अनेक वर्षे, अनेक ठिकाणीं घेतले आहेत त्यावरून हें निश्चित ठरतें कीं, लेडबीटरनीं जें लिहिलें आहे तें कपोलकल्पित, कादंबरी नाहीं, तें अनुभूत सत्य आहे

'न धियः प्रचोदयात्' (प्रचोदयति) हें कसें घडतें हें आता निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं

प्रणवाच्या उच्चाराचे प्रकार अनेक आहेत इतकें त्यांनीं सांगितलें, पण प्रकार कोणते तें सांगितलें नाहीं तीं नांवें व त्यांचें वैशिष्ट्य वृ पाराशर स्मृतींत सांगितलें आहे

> कर्मारंभेषु सर्वेषु त्रिमात्रः संप्रकीर्तितः॥
> स्थितो यत्र यथोक्तश्च स्मर्तव्यः स तथैव च ॥ १९॥
> ऋग्वेदे स्वरितोदात्त उदात्तश्च यजुःश्रुतौ॥
> सामवेदे च विज्ञेयो दीर्घः स प्लुत एव च ॥ २०॥
> प्लुत त्रिमात्रके (हैम)

तीन मात्रांच्या उच्चाराला प्लुत म्हणतात कोणत्याहि कर्मारंभीं प्रणवाचा त्रिमात्रात्मक = प्लुत उच्चार करावा ऋग्वेदांत स्वरितोदात्त करावा, यजुर्वेदात उदात्त करावा व सामवेदात प्लुत व दीर्घ उच्चारावा, जिथें जसा उच्चार सांगितला तसा तिथें करावा याप्रमाणें उदात्त,

स्वरितोदात्त, प्लुत व प्लुत दीर्घ असे चार प्रकार, कर्मारंभ व वेदत्रय यांच्या योगानें झाले. शिवाय **दीर्घघंटा निनादवत्** (काशाच्या घंटेच्या दीर्घ घुमणाऱ्या नादासारखा) हा पाचवा प्रकार लययोगाभ्यासात सांगितला आहे. वृहत्पाराशर-स्मृतींतहि आहे.

गायत्री जपध्यान हेंच संध्येंत सर्वांत प्रमुख कर्म असल्यानें त्याचा महिमा व मंत्राचें कार्य कसें घडतें या गोष्टी सांगतांना संध्येपासून लाभ-फायदा काय होतो याचें थोडेसेंच दिग्दर्शन झालें आहे; म्हणून संध्येपासून लाभ काय हें पुढील प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे.



प्रकरण ६ वें

# संध्या करण्यानें लाभ काय?

यस्तु संध्यां उपासीत श्रद्धया विधिवत् द्विजः ।
न तस्य किंचित् अप्राप्यं त्रिषु लोकेषु विद्यते ॥ (स्मृति.)
संध्यां उपासते ये तु नियत संशितव्रताः ।
विधूतपापा ते यान्ति ब्रह्मलोकं अनामयम् ॥ (यम.)

ब्रह्मलोकं सनातनं (पा. मे ) अत्रिस्मृति—

जो द्विज यथाविधि व श्रद्धेनें नेहमीं संध्या करील त्याला मिळणार नाहीं असें त्रैलोक्यात कांहीं नाहीं ॥ १ ॥ जे मनस्थ सदाचारसंपन्न राहून नित्य नियमानें (त्रिकाळीं) संध्योपासना करतात ते सर्व पापापासून मुक्त होऊन, क्लेशदु:खरहित, सनातन ब्रह्मलोकास जातात ॥ २ ॥ दिवसा किंवा रात्रीं अज्ञानानें जें पाप घडलें असेल तें

त्रिकालसन्ध्याकरणात् तत् सर्वं च प्रणश्यति ।

सर्व त्रिकाल संध्या केल्यानें नष्ट होतें (याज्ञ मनु.)

ऋषयः दीर्घसंध्यत्वात् दीर्घं आयुः अवाप्नुयु ।
प्रज्ञां यशश्च कीर्तिं च ब्रह्मवर्चसम् एव च ॥ (मनु )

दीर्घकाल संध्या केल्यामुळें ऋषींना दीर्घायुष्य, प्रज्ञा, यश, कीर्ति व ब्रह्मतेज याची प्राप्ति झाली ( इतरांसहि होईल )

यस्तु तां केवलां संध्यां उपासीत स पुण्यभाक् ।
तां परित्यज्य कर्माणि कुर्वन् आप्नोति किल्बिषम् ॥ (याज्ञ०)
'संध्यालोपस्य चाऽकर्ता स्नानशीलश्च यः सदा ।
तं दोषा न उपसर्पंति गरुत्मंतं इवोरगाः ॥' (कात्यायन)

जो फक्त त्रिकाळ संध्याच उत्तम काळी, यथाविधि श्रद्धेनें करील तो पुण्यवान होतो. (पुण्याचें फळ सुख व पापाचें फळ दुःख), पण संध्या न करता इतर जपपूजादि कर्में पुष्कळ केलीं तरी पापी होतो ॥ १ ॥ जो कधीं त्रिकाळ स्नान चुकवीत नाहीं आणि संध्येचा लोप (व काललोप) करीत नाहीं, त्याला दोष, पापें स्पर्श करणार नाहीत, जसे भुजंग गरुडाच्या जवळसुद्धा येत नाहीत त्याप्रमाणेंच

शास्त्राचारविरुद्ध वागणारे जे द्विज त्याना पावन करण्यासाठीं ब्रह्मदेवानें (स्वयंभूनें) संध्या निर्माण केली (याज्ञ ) पूर्वीं सांगितलेलें

'ब्रह्मादयोऽपि संध्यायां तां ध्यायन्ति जपन्ति च'

हें वचन लक्षात असेलच

कालें तु वंदिता संध्या स्वर्ग-मोक्ष-प्रदायिनी। (गा पु प)

उत्तम काळीं केलेली संध्या स्वर्ग व मोक्ष सुद्धा देते

गायत्रीजपकृत् भक्त्या सर्वपापैः प्रमुच्यते।
सर्व पापानि नश्यंति गायत्रीजपतो नृप॥
ब्रह्महत्यादि पापानि गुरूणि च लघूनि च।
नाशयत्यचिरेणैव गायत्रीजापको द्विजः॥

ब्रह्महत्यादि महापातकें, उपपातकें इ सर्व पापें भक्तीनें गायत्रीचा जप केला असता नष्ट होतात, फार काल लागत नाहीं अशा सर्व पापाचा संहार करून उद्धार करते म्हणूनच तिला गायत्री म्हणतात (बृ पा, भविष्य पु, अग्नि, पद्म, व व्यासस्मृति) कोणत्या पापाच्या नाशासाठीं किती जप केला पाहिजे तें 'गायत्रीचे सकाम प्रयोग' या प्रकरणात पहावें.

'ऐहिकाऽमुष्मिकं सर्वं गायत्रीजपतो भवेत्' (अग्नि पु )

गायत्रीच्या जपानें सर्व प्रकारचें ऐहिक व पारलौकिक सुख मिळतें 'सदा प्रसन्न राहून, विपुल सुखोपभोग भोगून मोक्ष प्राप्त होईल' (गौतम स्मृ) जो तीन वर्षें केवळ गायत्रीजपपरायण राहील, म्हणजेच गायत्रीच्या उपासनेशिवाय इतर काही उद्योग न करता सर्वकाळ गायत्रीच्या उपासनेंतच घालवील त्याला परब्रह्मप्राप्ति होईल, तो परब्रह्मस्वरूप होईल, (मनु)

याज्ञवल्क्य-मुंज झाल्यापासून मरेपर्यंत त्रिकाळ जो फक्त सात जप करील त्याचा देह पवित्र होईल, दहा केल्यानें स्वर्गप्राप्ति, वीस केल्यानें शिवलोकप्राप्ति होते, व १०८ केल्यानें भवसागरातून तरतो, जन्म मरणाचें तोंड पुन्हा पहावें लागत नाहीं

हें कसें शक्य होतें ? अशा प्रकारची शंका म्हणजे दुस्तर्क होय या शंकेचें उत्तर संध्येच्या संकल्पातच आहे. 'मम उपात्त-दुरित-क्षय द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ' संध्यतील इतर कर्में व गायत्रीजप यानीं पापाचा क्षय होतो पापनाशाचें फळ भगवतानींच सांगितलें आहे —

येषा तु अंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वन्द्व-मोह निर्मुक्ताः भजन्ते मां दृढव्रताः ( भ गी )

पुण्यकर्मांनीं ज्यांच्या पापाचा नाश होतो ते सुखदु खादि सर्व द्वन्द्वा पासून व मोहापासून मुक्त होतात, व दृढ मनानें मला भजतात-माझ्या स्वरूपात ब्रह्मात ऐक्य पावतात

'न गायत्र्या समं किंचित् दिवि च इह च पावनम् '

गायत्रीसारखें पावन करणारें स्वर्गात व या लोकात दुसरें काहीं नाहीं, म्हणूनच म्हटलें आहे —

न तथा वेदजपत पापं निर्दहति द्विज. ।
सावित्रीजपत. पापं यथा निर्दहति द्विज. ॥ (बृहद्यम)
वेदाः सांगास्तु चत्वारोऽधीता सर्वेऽथ वाङ्मया' ।
गायत्रीं यो न जानाति वृथा तस्य परिश्रम. ॥ (यो याज्ञ)
गायत्रीमात्रसंतुष्ट. श्रेयान् विप्र. सुयंत्रितः ।
नाऽयंत्रित. त्रिवेदी च सर्वाशी सर्वविक्रयी ॥ (यो याज्ञ )

सवितृशक्ति-सावित्री गायत्रीच्या जपानें जसा सर्व पापाचा नाश होतो, तसा सर्व वेदाच्या पठनानें सुद्धा होत नाहीं चारी वेद त्याच्या अंगासह सार्थ पाठ केले आणि सर्व वाङ्मयाचा अभ्यास केला, पण गायत्रीचें अर्थ जाणून अनुष्ठान केलें नाहीं तर वेदादिकाचें तें अध्ययन म्हणजे व्यर्थ परिश्रम ! उलट जो विप्र केवळ गायत्रीच्याच अनुष्ठानानें संतुष्ट राहून यमनियमाचें पालन करून, शास्त्रशुद्ध आचार-आहारादींनीं मन, इंद्रियें,

प्राण व देह याना चागली शान्यात ठेवतो तो, भक्ष्य अभक्ष्य, पेय अपेय इत्यादींचा विचारहि न करता उपजीविका करणाऱ्या व वाटेल त्या पदार्थांची निषिद्ध सुद्धा विक्री करणाऱ्या तीन वेद मुखोद्गत असणाऱ्यापेक्षा फार श्रेष्ठ

**शंका व समाधान**-कोणी म्हणतात कीं, जे वेळेवर संध्या करणारे दिसतात त्यांच्या ठिकाणीं संध्येचा-गायत्रीचा प्रभाव का दिसत नाहीं? याचें अद्यात. उत्तर सर्वांशी सर्वविक्रयी याव आहे, तथापि थोडा विस्तार करणें जरूर आहे प्रभाव न दिसणाऱ्या अनेक कारणापैकीं काहीं पहा —

१ संध्या ति ही काळी होत नाहीं २ यथाविधि होत नाहीं ३ गायत्रीचा व संध्येंतील इतर मंत्राचा अर्थ माहीत नसतो ४ गायत्रीचें किंवा सूर्यबिंबाचें ध्यान करीत जप केला जात नाहीं ५ आचमनाला जल पाहिजे तसें नसतें ६ प्राणायामाचें तर नुसतें नाटकच केलें जातें ७ अर्घ्यादि इतर कर्मेंसुद्धा यथाविधि होत नाहींत ८ पवित्रक बहुधा घापरीत नाहींत ९ जानवीं कशीं असतात व त्याविषयीं आदर किती असतो हे पूर्वी वर्णिलें आहेच १० न्यायानें, सत्यानें, नीतीनें धन मिळविलें जात नाहीं ११ सत्य भाषण व वचनपालन याची बहुधा फारकतच झालेली असते कोणाशीं बोलतानासुद्धा व्यवहारात, जाता येता, ज्यांच्या हातातील उघड्या तुलसीमालेचे मणी फिरविले जात असत असे एक प्रतिष्ठित ब्राह्मण म्हणाले कीं, 'स्वामी? काय करणार! हल्लीच्या काळात खोटें बोलल्याशिवाय जगताच येणार नाहीं' तेव्हा राम जोशाचें पद्य मनात आलें—

'ती बाळ करामधिं माळ कशाला तुळशीचीं लाकडें। आतुनि बाहेर हरिशिं वाकडें' मुळात 'गळ्यामधिं' आहे १२ परनिंदा व परदोष वर्णन करून स्वत चा शहाणपणा व प्रतिष्ठितपणा मिरवण्यात भूषण वाटतें १३ शास्त्रोक्त ब्रह्मचर्यपालन नसतें १४ चहा, कॉफी, बिडी तबाखू इत्यादि अनावश्यक व आरोग्यविघातक व्यसनें असतात फार काय काहीं तरी निमित्तें पुढें करून त्या व्यसनाची आवश्यकता वादविवादानें सिद्ध करू पाहतात १५ अस्तेय (चोरीचा अभाव) तर पुष्कळापासून फार दूर रहातें खुषीनें दिलेली लाच घेणें सुद्धा चोरीच दुसऱ्याची वस्तु

(तुलसीपत्र, मूठभर मातीहि) मालकाच्या खुशीच्या परवानगीशिवाय घेणें म्हणजे चोरीच, असें मुळींच न करणें म्हणजे अस्तेय १६ हिंसा करण्यास जराहि कचरत नाहींत १७ चित्ताची एकाग्रता तर क्षणभर-सुद्धा होत नाहीं १८ श्रद्धा, भक्ति नसते १९ सुसंगतीचा अभाव व कुसंगतीची आवड २० असद्ग्रंथाचें वाचन २१ कठोर भाषण इत्यादि अनेक कारणें आहेत

हीं सगळींच सध्या करणाऱ्या सर्वांतच असतात असा याचा अर्थ नाहीं पण यांतील पुष्कळ पुष्कळांत असतात हें मात्र खरें. असत्य भाषण, वचनभंग, परनिंदा व परदोषचर्चा यांतील प्रत्येक दोष, दारू पिणें, मांस खाणें, इत्यादींपेक्षाहि घोर पातक आहे, हें सोदाहरण सिद्ध झालें आहे कोणत्याहि सत्कर्माला सत्य, अहिंसादि यमनियमांचा पाया नसेल तर तें सत्कर्म केलें न केलें सारखेंच, काहीं चांगलें फल-मानवतेची वृद्धि-चित्तशुद्धि तर प्राप्त होत नाहींच पण मी सध्या करतो' हा अहंकाररूपी कॅन्सर (अर्बुद) मात्र वाढत जातो याच्या उलट अर्सेहि आढळलें आहे कीं —

असत्य, परनिंदा, परदोषचर्चा, आत्मप्रौढी आणि अन्यायानें अनीतीनें धनार्जन याचा समूळ त्याग करून, माणुसकीनें वागून, जे नियमानें निदान प्रात सायंसध्या सविधि, प्रेमानें, निष्ठेनें करतात, त्यांना नुसत्या गायत्री मंत्राचा अर्थ साधारण कळत असला तरी त्यास सध्येच्या प्रभावाचे अनुभव येतात, त्यांचें तेज, आरोग्य, समाधान वाढतें, 'देहेंद्रु ख तें सौख्य मानीत जावें' हें हळुहळू साधतें, माणुसकी वाढते, ते हळुहळू दैवी सपत्तीचे वारस होतात

**थोडे अनुभव**— या कलिकाळात वरील थोड्याशा नियमांचें पालन करून गायत्री जप करणारे फारच थोडे पुण्यातील एका सज्जनाचा रक्त दाबाधिक्य रोग (हाय ब्लड प्रेशर), एकाचा दु सह ज्वर बरा झाला, (अगदीं अलिकडे) एकाला वार्धक्य आलें नसताहि एकाएकीं दोन मिनिटांतच साफ दिसत नाहींसें झालें होतें त्यानें गायत्रीचा दहा हजार जप केला व एक हजाराचें हवन केलें व त्यास बरेंच दिसू लागलें होतें त्याचें नाव अभ्यंकर, ते पूर्वी रेल्वेंत मोठे अधिकारी होते ते आता नाहींत

भूत प्रेत पिशाचें तर नुसती जानव्याची गाठ दाखविली म्हणजे पळतात, हें मुद्दाम करून कळलें असल्यानें १०।१२ व्या वर्षीसुद्धा रात्रीं हा एकटा, काळोखात जाण्यास भीत नसे निवासस्थानाला लागूनच असलेल्या ज्या तळ्यात, अमावास्येच्या दिवशीं शेंकडों भुतें दिवट्या घेऊन नाचत असता घरातून दिसत, तेथें हा उन्हाळ्यात रात्रीं दोन वाजता, त्या तळ्यात उणलेल्या झऱ्यानें पाणी आणण्यास जात असे

ज्या वर्षी आळंदीस पचाग ऐक्य परिषद भरली होती, त्याच वर्षी त्या परिषदेनतर मंत्रशास्त्रपरिषद भरली होती तेथें देऊळगाव राजाचे श्रीयुत ग ना कुलकर्णी मंत्रशास्त्रविशारद गेले होते त्यानीं महासमर्थानें पछाडलेल्या एका दाढीजटाधारी धिप्पाड पुरुषावर आपल्या मंत्राचा प्रयोग केला त्या पिशाच्याचा संचार त्या माणसात झाल्यावर त्याला त्यानीं काहीं प्रश्न विचारले, तेव्हा तो समध चिडला, व जटा पिंजारून उन्मत्त होऊन दंड थोपटीत त्या मांत्रिकावर धावला त्याचे इतर मंत्र निष्क्रिय ठरले, तेव्हा मांत्रिक थोडे घाबरले, पण धीर धरून हातात पाणी घेऊन गायत्री मंत्राचा उपयोग करण्यासाठीं संकल्प करूं लागले, तोंच त्या समधानें हात जोडले व विनविलें कीं ' कृपा करून जाळू नका ? मी आता या माणसाला पुन्हा त्रास देणार नाहीं ' हे मांत्रिक दोन वर्षांपूर्वीच एकाएकीं रोगानें दिवगत झाले ते उत्तम ज्योतिषीहि होते विद्यमान व्यक्तींचा नामनिर्देश त्याच्या समतीशिवाय करणें योग्य नाहीं

**संध्या व कर्णपिशाच**– कर्णपिशाचविद्या सिद्ध करून, ज्योतिष सागून पैसे उकळणारे पुष्कळ ज्योतिषी महाराष्ट्रात दिसतात ते वर्तमान क्षणापर्यंतचें सर्व अगदीं बिनचूक सागतात, कारण तें वशीकृत पिशाच त्याच्या कानात येऊन त्याना हळूच सर्व सागत असतें व पुढील भविष्य ते तर्कानें 'पड्यायचें नि सागायचें' यासारखें सागतात कोणी त्या ज्योतिषास गायत्रीपुरश्चरण करणाराकडे घेऊन जाऊं लागला तर काहीं तरी कारण सागून जाण्याचें तो टाळतो हे अनुभव पूर्वीचे आहेतच, पण हल्लीं पुरश्चरण करीत असलेल्यास विचारता हाच अनुभव कानीं आला! सदाचारसंपन्न संध्यानिष्ठ ब्राह्मणानें अज्ञाना दूर बसू न देता ?१ १॥ हात अंतरावर बसवावें व मग मजा पाहावी! बहुतेक प्रश्नाचीं उत्तरें चुकतात, कारण त्या

सध्यानिष्ठ ब्राह्मणाच्या समीप तें पिशाच येऊच शकत नाहीं! जळून जाईल म्हणून घाबरतें मग तसा एक ज्योतिषी म्हणाला, "का बर आज सुकल? आज मगळवार नाही का? कुत्र्याला भर्जी घालायचीं विसरलों?" मगळवारीं कुत्र्याला भजीं घालण्याचा व ज्योतिषशास्त्राचा सबध काय? पण असा सालापाला लावला नाहीं तर अब्रू जाते। व ज्योतिषाच्या नावाखालीं लोकास लुबाडता येत नाही ही घटना १९३५ च्या पूर्वीची आहे कर्णपिशाच मत्राचा आणि मगळ ग्रह व मगळवार याच्याशीं काहीं सबध नाहीं याचें अनुष्ठान ११ दिवसाचें असतें चार अनुष्ठानें केलीं की जन्मकुडलींत विशिष्ट ग्रहयोग असलेल्या ब्राह्मणास तें पिशाच सहज वश होतें अधिक विस्तार करणें बरें नाहीं कोणी म्हणतील कीं द्विजेतरानीं गायत्रीच्या ऐवजीं काय करावें? म्हणून त्याविषयीं आता थोडें मार्गदर्शन केलें पाहिजे

**द्विजेतरांनीं काय करावें?**

द्विजेतराच्या मनुष्यत्वाची पूर्णता करून, त्याना सुद्धा जन्ममरणचक्रातून सोडविण्यासाठीं शास्त्र व सत यानीं भरपूर साधन सागून ठेवलें आहे पुढील अनेक प्रकरणात तें दाखविलें आहे सध्येची जी उत्तम वेळ सागितली आहे, त्या सूर्योदयापूर्वीच्या तीन चार घटकात, त्यानीं नित्य नियमानें नाममत्राचें अनुष्ठान, त्याचीं पूर्वांग कर्में करून करावे

मंत्र पूर्वसस्कारानुसार व प्रवृत्तिअनुसार पूर्ण अनुकूल म्हणजे रुचि असलेल्या देवतेचा व तोहि शक्य तो 'सुसिद्ध' जातीचा असला पाहिजे व तो सुयोग्य गुरुकडून मत्रशास्त्रविधीप्रमाणें, अनुकुल मुहूर्तावर मिळाला पाहिजे, पण या विषयाचें मत्रशास्त्रज्ञान लुप्तप्राय झालें आहे, म्हणून गुरु करण्याची घाई करू नये, स्वत ची पात्रता वाढवावी, ती वाढविण्याचें साधनहि शास्त्रात आहे

पूर्वी व पुढें सागितलेल्या नियमाचें पालन करून '**हरे राम हरे राम राम राम हरे हरे। हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे**' या मत्राचा जप करावा या **एकाच मत्राला गुरूची व न्यासादिकाची आवश्यकता नाहीं**, व मोठ्यानें उच्चार करण्यास हरकत नाहीं कसें, केव्हा उभें राहावें किंवा बसावें या विषयीं गायत्रीजप प्रकरणात पाहावें जपाच्या वेळीं पाळावयाचे नियम, व जपमाळेविषयींचे नियम सर्वांस

सारखेच आहेत जेथें अपवाद आहेत तेथें त्याप्रमाणें त्या त्या प्रकरणात सागितलें आहे या मत्रात १६ शब्द आहेत ती सबोधनें आहेत त्यात ८ वेळा 'हरि'ला, चार वेळा रामप्रभूना व चार वेळा कृष्णप्रभूना हाका आहेत राहत्या घराला आग लागल्याचें किंवा चोर भिंत फोडीत असल्याचें समजताच मालक व मालकीण जेवढ्या आर्तपणानें, कळवळून, ज्या भावनेनें, घरातील माणसास व शेजाऱ्यास जशा आवाजानें हाका मारतील तशा भावनेनें व आवाजानें त्या शब्दाचा उच्चार करावा अमुक एवढा जप करायचा असें ठरवू नये, थोडा झाला तरी चालेल, पण वर सागितल्याप्रमाणें उच्चारल्यास १० जपानें जें कार्य होईल तें घाईनें भावनाविरहित अशुद्ध उच्चार करीत केलेल्या हजार दोन हजार जपानें सुद्धा होणार नाहीं

**जप करताना ध्यान**— सूर्यबिंबाचें करावें हरि = सूर्य, सविता हा अर्थ आहेच, व सूर्य ब्रह्मा विष्णु शिवात्मक आहे हें पूर्वी दाखविलेंच आहे कामधदा करताना मधुर सुरावर हा मत्र मुखानें गुणगुणत राहावें,

**एक नियम करावा** कीं स्नान करून शकराला पाणी घालून एक तरी बेलाचें त्रिदळ वाहिल्याशिवाय भोजन करावयाचें नाहीं. ताजीं बिल्वपत्रें मिळणें कठिण असल्यास शाकणाच्या, कोऱ्या, स्वच्छ डबीत, न दाबता, ठेवलीं कीं ८।१० दिवस टिकतात, वाळलीं तरी पानें गळत नाहींत पण देंठाला हलूच धरून काढावें व हिसका न देता वाहावें

**याचें फळ** – जपध्यान व ही पूजा याचें १०।१२ महिन्यात हें फळ मिळेल कीं, **तुमची इष्टदेवता ध्यानात किंवा स्वप्नात दिसूं लागेल, सूर्यबिंब न दिसता इष्ट देवताच दिसूं लागेल** असें वारवार एकाच देवतेचें दर्शन झालें कीं, तीच तुमची इष्टदेवता असें नक्की समजावें नतर हेंहि सहज कळेल कीं मत्र कोणत्या गुरुकडून घ्यावा, तें कळण्याचे मार्ग अनेक असल्यानें येथें किती सागणार! हें त्या भोलानाथाच्या कृपेनें कळेल तशी कृपा होण्यास पूजा भावनामय हृदयानें झाली पाहिजे भावना कशी असावी हें पूर्वेतील रहस्य या प्रकरणात पाहावें

**अर्घ्य**-जपापूर्वी वाटल्यास एकच अर्घ्य 'श्रीसूर्यनारायणाय नम ' इद अर्घ्य दत्त न मम असें म्हणून प्रात सध्येतील अर्घ्याप्रमाणें द्यावें पण

त्यांत लाल फूल, तुलसीपत्र किंवा बिल्वपत्र घालून द्यावा. हा सूर्यपूजेतला अर्घ्य म्हणून एकच व फूल वगैरे.

**उपस्थान**– सूर्योदयाच्या वेळीं व अस्ताच्या वेळीं लाल बिंबाकडे टक लावून बघत एकाद्या सूर्यस्तोत्रानें स्तुति करावी व नमस्कार करावा.

समोर रस्ता आडवून उभीं राहिलेलीं ३।४ पुरुष उंच व तशींच धिप्पाड दिसणारीं पिशाचें, किंवा पिशाच्याचे समुदाय राम, शिव, दत्त, महावीर (हनुमान) इत्यादि नामाच्या दीर्घ उच्चारानेंहि धूम पळत सुटतात.

**विवाहित स्त्रिया व कन्या**– स्त्रियांनीं पतीच्या व कन्यानीं पित्याच्या, पालकाच्या खुषीच्या परवानगीशिवाय गुरु करूं नये. स्त्रियानीं पतीला व कन्यानीं माता-पिता यास देव मानून त्याची सेवा, स्वतःच्या सुखाची इच्छा बाजूस ठेवून, करावी पतीची वा माता-पित्याची जी आवड-नावड तीच त्याची असावी. वरील १२ अक्षरी मंत्राचा उच्चार, काम-धंदा करीत असता, करीत राहावें. रामायणादि भक्तिमार्गीय ग्रंथ व भक्त-स्त्रियाचीं चरित्रें याचून मनन करावें. लहान मुलावर प्रेम करून त्यास प्रेमानें व डोळ्यानीं धाकात ठेवून, त्यांस नीतिमान, सदाचारी, सुशील, निरोगी बनविण्याचा प्रयत्न करून करावा त्यास सहज भक्ति-मार्गाकडेहि वळवावीं.

**सुशिक्षित स्त्रियांनीं** बालसगोपन, लहान मुलास होणारे रोग व त्याचीं लक्षणें, स्त्रियाचे रोग व त्याचीं लक्षणें, गर्भिणी धर्म, गर्भिणीपति-धर्म याचें शास्त्रशुद्ध ज्ञान संपादन करणें, कॉलेजच्या व इतर परीक्षा देत बसण्यापेक्षा अधिक आवश्यक आहे स्त्रियाच्या व बालकाच्या रोगाचे प्रतिबंधक व रोगनिवारक (घरीं, डॉक्टरकडे न जाता करण्यासारखे) उपाय याचेंहि ज्ञान मिळविणें फार आवश्यक आहे. याविषयीं माहिती 'संजीवनी चिकित्सा पद्धति' या मोठ्या पुस्तकात दिलेली पुरेशी आहे.

सदाचारपालनाविषयीं मागील प्रकरणात व यातहि अनेकवार उल्लेख आले आहेत; म्हणून आता अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करणे क्रमप्राप्त झालें आहे.

## सदाचाराचे थोडे मुख्य नियम

**सत्यभाषण वचनपालन—**

प्रेतवत् वर्जनीयो हि नरः सत्यबहिष्कृतः ।
नाऽतः परतरं धर्मं वदन्ति पुरुषस्य हि ।
यादृशं पुरुषव्याघ्र स्वसत्यस्याऽनुपालनम् ॥
अग्निहोत्रं अधीतं च दानाद्याः सकलाः क्रियाः ।
भवन्ति तस्य विफलाः वाक्यं यस्याऽनृतं भवेत् ॥
सत्यं अत्यन्तं उदितम् धर्मशास्त्रेषु धीमताम् ।
तारणाय अनृतं तद्वत् पातनायाऽकृतात्मनाम् ॥

हरिश्चंद्र राजाची राणी त्या विकट प्रसंगीं 'कार्येषु मंत्री' प्रमाणें हरिश्चंद्रास सांगते– हे पुरुषश्रेष्ठा! ज्यानें सत्याचा त्याग केला तो पुरुष मृतदेहाप्रमाणें (प्रेताप्रमाणें) त्याज्य ठरतो; व सत्यपालनापेक्षा श्रेष्ठ असा दुसरा धर्म नाहीं! ज्या पुरुषाचें वचन खोटें ठरतें–जो आपलें वचन पाळीत नाहीं. त्या पुरुषाच्या सगळ्या क्रिया– अग्निहोत्र, वेदादि सर्व शास्त्रांचें व विद्यांचें अध्ययन, आणि दान, धर्म-कर्म इत्यादि सर्व निष्फळ ठरतात. बुद्धिमंत असणाऱ्या मनुष्याच्या तारणासाठीं (भवसागरांतून तरून जाण्यासाठी) शास्त्रांनीं सर्वांत श्रेष्ठ साधन सत्यपालन हें वर्णिलें आहे. तसेंच अनृत हें मूढाच्या पतनासाठीं आहे.

**धन-द्रव्य-संपादन—**

अन्यायोपार्जितेनेह द्रव्येण सुकृतं कृतम् ।
न कीर्तिरिहलोके च परलोके न तत्फलम् ॥
अद्रोहेणाऽर्जितं द्रव्यं प्रशस्तं धर्मकर्मणि ।
द्रोहार्जितेन द्रव्येण यत्करोति शुभं नरः ॥
विपरीतं भवेत्तत्तु फलकाले नृपोत्तम ॥

अन्यायानें पैसे, वस्त्रें, भूमि वगैरे संपत्ति मिळवून, इथें त्या द्रव्यानें पुष्कळ सत्कर्मे केलीं तरी त्या पुण्य कर्मानें या लोकीं कीर्ति मिळत नाहीं आणि परलोकांत त्या पुण्यकर्मांचें कांहींच फळ मिळत नाहीं. प्राण्याचा जीवाचा द्रोह, हिंसादि करून मिळविलेलें द्रव्य धर्मकर्मांत अगदीं अयोग्य! अगदीं

निरुपयोगी! कारण कीं द्रोहानें मिळविलेल्या धनानें केलेल्या शुभ पुण्यकर्मांचें हे नृपोत्तमा! अगदीं विपरीत उलटेंच फळ तीं कर्में करणाऱ्याच्या पदरात पडतें

**सदाचाराचें फल**– *सदाचारालाच आचार म्हणतात आचार,* अनाचार व दुराचार असे प्रयोग त्यामुळेंच केलेले आढळतात

**दुराचार** = दुष्टासारखें आचरण, निंद्य आचरण अनाचार म्हणजे सदाचाराचा, शास्त्राचाराचा अभाव आचारानें–सदाचारानें आयुष्य, प्रजा, पुरेसें अन्न, हीं मिळतात व आचारानें पातकाचा नाश होतो मनुष्याचें कल्याण करणारा श्रेष्ठ धर्म म्हणजे आचारपालन आचारपालनानें या लोकीं व परलोकीं सुख मिळतें, आचारसंपन्न मनुष्य सदा पवित्र व सदा सुखी असतो हे नारदा, आचारपालन करणारा मनुष्य सदा धन्य होय, हें सत्य सत्य सांगतो आचारहीन माणसाचें येथें किंवा परलोकांतहि कल्याण, शुभ होत नाहीं! सदाचाराचें उल्लंघन करून वागणाऱ्या माणसानें केलेली यज्ञ, दान तप, जप इत्यादि कर्में त्याचें खरें कल्याण करू शकत नाहींत, दैवी संपत्ति देऊ शकत नाहींत इत्यादि प्रकारें अनेक स्मृति-पुराणग्रंथात वर्णन आहे

येथें **आचार = सदाचार** त्याच्या त्याच्या मनानें ठरविलेले किंवा एकाद्या राजकीय पक्षाच्या आधुनिक नेत्यानीं ठरविलेले आचरणाचे नियम नव्हेत *ज्ञानेश्वरादि–तुलसीदासादि पूर्वकालीन सुप्रसिद्ध संतानीं* सांगितलेले व श्रुति-स्मृति पुराणात सांगितलेले आचरणाचे नियम म्हणजे आचाराचे नियम

**बृहन्नारदीय पुराणांतील खालील वचनें विशेष लक्षांत ठेवावींत** म्हणजे 'रामायण, दासबोध, ज्ञानेश्वरी आम्ही वाचतों त्यानेंच आमची संध्या होते!' 'नामस्मरण केलें म्हणजे झाली संध्या!' 'इतकें वैराग्य व ज्ञान असून संध्या करीत बसलात?' 'अहो! स्वामी! लोकसेवा, देशभक्ति करणें म्हणजे संध्याच! मग संध्या, देवपूजा, तो वैश्वदेव कीं पैश्वदेव म्हणतात तें करण्यात काय विशेष?' इत्यादि प्रकारचे प्रलाप काढावेसे वाटणार नाहींत

यः स्वाऽऽचारपरिभ्रष्टः सांगवेदान्तगोऽपि वा ।
स एव पतितो ज्ञेयः यतः कर्मबहिष्कृतः ॥ १ ॥
हरिभक्तिपरो वाऽपि हरिध्यानपरोऽपि वा ।
भ्रष्टो यः स्वाऽऽश्रमाचारात् पतितः सोऽभिधीयते ॥२॥
वेदो वा हरिभक्तिर्वा भक्तिर्वाऽपि महेश्वरे ।
आचारात्पतितं मूढं न पुनाति द्विजोत्तमम् ॥ ३ ॥
स्वाऽऽश्रमाचारयुक्तस्य हरिभक्तिर्यदा भवेत् ।
तस्य त्रिषु लोकेषु सदृशोऽस्ति अजनंदन ॥ ४ ॥
यः स्वधर्मं परित्यज्य भक्तिमात्रेण तुष्यति ।
न तस्य तुष्यते विष्णुः आचारेणैव तुष्यति ॥ ५ ॥
तस्मात् कार्या हरेः भक्तिः स्वधर्मस्याऽविरोधिनी ।
स्वधर्महीना भक्तिश्चाऽप्यकृतैव प्रकीर्तिता ॥ ६ ॥
स्वाऽऽश्रमाचारशून्यश्च पतितः प्रोच्यते बुधैः ।
सदाचारपरः विप्रः वर्धते ब्रह्मतेजसा ॥ ७ ॥

स्वतःच्या वर्णाश्रमधर्मांच्या आचरणापासून जो भ्रष्ट झाला, तो जरी (अर्थासह) सांगवेदाध्ययन केलेला असला तरि पतित (एव) च कोणी हरिभक्तिपरायण किंवा हरिध्यानपरायण असला आणि जर तो स्वतःच्या वर्णाश्रमाचाराचें पालन करीत नसला, तर त्याला (सुद्धा) पतितच गणतात ॥ २ ॥ वेद, हरिभक्ति किंवा महेश्वर शिवाची (गणेश इ. कोणाचीहि) भक्ति आचारहीन माणसाला पावन करु शकत नाहीं ॥३॥ (पण) जो वर्णधर्म व आश्रमधर्म यांच्या आचाराचें पालन करुन हरि (हरादि) भक्ति करीत असेल, त्याच्या सारखा हे अजनंदना- महादेव पुत्रा नारदा, त्रैलोक्यात श्रेष्ठ कोणी नाहीं ॥ ४ ॥ जो स्वधर्म पालन न करता भक्ति करण्यातच संतोष मानतो त्याच्यावर विष्णु (शंकर आदि कोणी) प्रसन्न होत नाहीत, आचारानेंच प्रसन्न होतात ॥ ५ ॥ म्हणून स्वतःच्या वर्णाश्रमधर्मांचा लोप न करता हरिभक्ति करावी जो स्वतःच्या वर्णाश्रमाचाराचें पालन करीत नाहीं, वर्णाश्रमधर्माचारहीन झाला, त्याला शास्त्रे, मत पतित म्हणतात, समजतात गणतात जो ब्राह्मण नेहमीं आचारपरायण राहील त्याचें ब्रह्मतेज वाढतें ॥ ७ ॥

वरील वचनांचें पालन महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या संतांनीं केलें; त्यांतील थोडीं उदाहरणें—नाथमहाराज ब्राह्मणाचीं सद्य कर्में (संध्या पूजा वगैरे) करीत होते ज्ञानेश्वरादिकांना उपनयनाची परवानगी मिळाल्यावर त्यानीं विवाहासाठीं हट्ट धरला नाहीं. तुकाराम महाराज वैश्य म्हणून त्यानीं वैश्य देहानें निळोबाला मंत्रोपदेश दिला नाहीं; कारण निळोबा ब्राह्मण! सांवता माळ्यानें शेतीचा—माळ्याचा धंदा सोडला नाहीं; सेना न्हाव्यानें न्हाव्याचा धंदा सोडला नाहीं; इतकेंच नव्हे तर स्वतःचा परंपरागत धंदा सोडून भक्ति करणाराविषयीं अगदीं कठोर भाषेंत लिहिलें आहे. 'भिक्षा पात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें' (तुकोबा) हें शास्त्रवचनाचेंच सार आहे ब्राह्मण गृहस्थाश्रमी मनुष्यास पोटासाठीं माधुकरीचा अधिकार नाहीं त्यानें तपश्चर्येसाठीं कोरडी भिक्षा किंवा माधुकरी (कांहीं काळ) मागण्यास हरकत नाहीं. ब्रह्मचारी ब्राह्मणानीं कोरडी भिक्षा किंवा माधुकरी मागावी, व परमहंस (एकदण्डी) सन्याशानीं माधुकरी वगैरे पांच प्रकारानीं, शिजलेल्या अन्नावर राहावें—इतरास भिक्षा मागण्याचा अधिकार नाहीं, म्हणून प्रसिद्ध ब्राह्मणेतर संतानीं कधीं भिक्षा किंवा माधुकरी मागितली नाहीं.

आपापल्या वर्णांच्या व आश्रमाच्या आचारांचें पालन केलेंच पाहिजे, हें ज्ञानेश्वरादि पूर्वीच्या सर्व संतानीं आपल्या काव्यात वर्णिलें आहे. 'स्वे स्वे कर्मणि' स्वधर्मे निधनं श्रेयः' वगैरेवरील ज्ञानेश्वरी पहा

ग्रामाचार, कुलाचार, देशाचार जे जसे पूर्वपरंपरेनें चालत आले असतील त्यांचेंहि पालन केलें पाहिजे कुलधर्म, कुलाचार सोडल्यानें देवता व पितर यांचा क्षोभ होतो ग्रामाचार सोडल्यानें ग्रामदेवताचा क्षोभ होतो. व देशाचाराविरुद्ध वागल्यानें लोकनिंदेला तो पात्र होतो लोक त्याची निंदा करूं लागतात; व त्या निंदेला कारण ती व्यक्ति स्वतःच असल्यानें ती व्यक्ति दोषी ठरते.

एकच उदाहरण घेऊं—दण्डी सन्याशानें सुद्धा चामड्याचे जोडे (पायताण इ.) घालून भिक्षेला जावें वगैरे, आणि काष्ठपादुका (खडावा) घालून भिक्षेला जाऊं नये, गेल्यास त्याचे पाय तोडून टाकावे, असें वर्णन यतिधर्मनिर्णय या हजार पृष्ठाच्या संस्कृत ग्रंथात भिक्षाप्रकरणात आहे

'कुंडिकोपनिषदात म्हटलें आहे कीं, सन्याशानें जोडे वगैरे पादत्राणाचा त्याग करू नये उत्तर हिंदुस्थानात पुष्कळ सन्यासी बूट वगैरे चामड्याचे घालतात, पण महाराष्ट्र देशात तशी परपरा नाहीं, तसा आचार नाहीं, म्हणून महाराष्ट्रीय सन्याशानीं महाराष्ट्रात जोडे वगैरे वापरणें देशाचार विरुद्ध ठरतें, व तें करणें अधर्म, अनाचार ठरतो 'यद्यपि शुद्ध लोकविरुद्ध नो करणीय नाऽऽचरणीयम्' हें वचन हेच सागतें कीं, शास्त्रानें शुद्ध असलें, शास्त्राधार असला, तरी लोकविरुद्ध आचरण, लोकविरुद्ध कर्म करू नये 'शास्त्रात् रुढिर्बलीयसी' म्हणतात तें अशा प्रसगाविषयीं आहे, आणि जेथें शास्त्रवचनात विरोध, मतभेद असेल तेथें त्यातील ज्या मताला रूढी अनुकूल असेल तें मत मानावें

याप्रमाणें सर्वसाधारण सदाचाराचें थोडेंसें वर्णन केलें पुढें शौच, स्नान वगैरे अनेक कर्मांतील आचाराचे म्हणजेच विधिनिषेधाचें वर्णन त्या त्या विविध प्रकरणात केलें आहे

सध्या केल्यानें लाभ फायदा काय हें सागितल्यावर, सध्या न केल्यास तोटा हानि काय हें सागणें क्रमप्राप्त झालें अन्वय आणि व्यतिरेक या दोन्ही प्रकारें सिद्ध करणें भाग आहे, म्हणून पुढील प्रकरणात त्याविषयीं थोडें वर्णन केलें आहे 'यथेच्छसि तथा कुरु' असे जरी अर्जुनाला सागितलें तरी शेवटीं 'न श्रोष्यसि विनक्ष्यसि' सागतो तसें न केलेंस तर तुझा विनाश होईल' असें सागावें लागलेंच।

॰ ॰ ॰

प्रकरण ७ वें

# त्रिकाल संध्या न करण्याचें फल

संध्या येन न विज्ञाता संध्या येनाऽनुपासिता ।
जीवमानो भवेत् शूद्रो मृतः श्वा चाऽभिजायते ॥
(गोभिल, मरीचि, याज्ञ व वाघल स्मृति)
मौंजीबंधनं आरभ्य सायं प्रातश्च कालयोः ।
मध्याह्नेऽपि च कर्तव्यं यावत्प्राणविमोचनम् ॥ (व्यासः)
एतत् संध्यात्रयं प्रोक्तं ब्राह्मण्यं यदधिष्ठितम् ।
यस्य नास्त्यादरः तत्र न स ब्राह्मण उच्यते ॥ (छा परि)

बृहत्पाराशर स्मृतींत तर म्हटलें आहे की, माध्यान्ह संध्या न करणारा अधतामिस्र नरकात जातो (अ २।२४।२७) अत्रि, दक्ष, गोभिल, शौनक इ स्मृति व विष्णु पद्म, अग्नि व दे भागवत पुराणें इत्यादींत पुढील वर्णन आहे

आत्मवेत्ता–आत्मज्ञानी जरी असला तरी द्विजानें नेहमीं संध्या तिन्ही काळीं केली पाहिजे, मरेपर्यंत रोज केली पाहिजे त्रिकाळसंध्या करण्यावरच ब्राह्मण्य अवलंबून आहे असतें ज्याला त्रिकाळ संध्येविषयीं आदर नाहीं, तो ब्राह्मण नव्हे (नुसता नामधारी ब्राह्मण!) मध्यान्हकाळीं मुद्दा संधि असतो हें पूर्वी साधार दाखविलें आहे

**आणखी थोडें पाहावें.**–आपत्तिकाळ नसताहि जो धूर्तबुद्धि द्विज संध्या करीत नाहीं, त्याला महापातक्याचा राजा म्हणावा (नारद पु) जो द्विज संध्योपासना न करता इतर मंत्राचा जप वगैरे करतो, तो दुर्बुद्धि

पच पक्वानाचें भोजन (पुढें वाढलेलें ताट) लायाडून भिक्षेसाठी भटकतो ! जे सध्या करीत नाहींत ते तामिस्र नरकात पडतात (वसिष्ठ स्‍) तीन दिवस सध्या न केली तर द्विज पतित होतो

सध्याकाल प्राप्त झाला असता जे ब्राह्मण द्विज सध्या करीत नाहींत व त्याना सध्येचें सार्थ ज्ञान नाहीं ते जिवत असता शूद्रासारखे व मेल्यावर कुत्रे होतात म्हणूनच असें दिसतें कीं, काहीं कुत्र्याच्या गळ्यात सोन्याचे पट्टे, चादीची साखळी– बसण्यास व झोंपण्यास गाद्या असतात, मोटारींत हिंडतात, तर काहींच्या पाठींत जळतीं लाकडें, दगड धोंडे बसतात ! तर एका कुत्रा कुत्रीच्या लग्नात एका सस्थानिकानीं लाखों रुपये खर्च केले ! ज्या ब्राह्मणादि द्विजानीं इतर विविध प्रकारचें दानधर्मादि कार्य पुष्कळ केलें असेल पण सध्या केली नसेल, त्यास कुत्र्याचा जन्म मिळूनसुद्धा ऐष आरामात राहाता येतें, इत्यादि गोष्टी कर्मविपाक सिद्धान्तानुसार सिद्ध होतात

सध्याहीन विप्र नेहमीं अशुचि (सुतक्यापेक्षाहि अपवित्र) असतो त्याला इतर कोणतेंहि श्रौतस्मार्त कर्म करण्याचा अधिकार राहात नाहीं जीं इतर कर्में तो करील त्याचें फल त्यास मिळत नाहीं (सुतकात सुद्धा सध्या केली पाहिजे) (गोभिल दक्ष) जे ब्राह्मण सध्या करीत नसतील त्यास धार्मिक राजानें खुशाल शूद्रकर्म करण्यास लावावें (शाकल इ ) शूद्रकर्म म्हणजे नोकरी, चाकरी हल्ली निधर्मी राजसत्ता असल्यामुळें धर्म शास्त्रभगाबद्दल कोणालाच शिक्षा केली जात नाहीं, तरी कलिकालयत्ता ब्राह्मणास स्वत च त्या कर्मासाठीं अधिकाऱ्याकडे पुन पुन्हा अर्जरूपी विनत्या, वशिले लावणें, लाच देणें इत्यादि करण्यास भाग पाडीत आहे !

सार हेंच कीं, ब्राह्मणानीं आता तरी स्वधर्म कर्मतत्पर व्हावें, व नोकरीस्तव किंवा परीक्षा पास होण्यासाठीं चिकाटीनें जितके कष्ट केले जातात, तितके कष्ट करून चिकाटीनें गायत्रीचीं सकाम अनुष्ठानें करावींत म्हणजे अधिक सुखसमाधानान जगता येईल

सध्या न करणाऱ्यास द्विजास सर्व द्विजसमाजाने बहिष्कृत करावेंत पण हल्लीच्या कायद्यानें सामाजिक बहिष्कारास बदी आहे असें म्हणतात

संध्या न करणाऱ्यास सूर्यहत्येचें, गोहत्येचें, पातक लागतें, हजारों नरकांतून बाहेर पडल्यावर शुद्राचा जन्म येतो, असेंहि अनेक स्मृत्यादिकांत म्हटलें आहे

गतकालीं संध्या न केल्यामुळें ब्राह्मण कितीहि पातकी झाला असला तरी पश्चात्तापपूर्वक तो पुन्हा संध्योपासना व्यवस्थित करूं लागेल तर त्यास सर्वपापयुक्त करण्याचें सामर्थ्य गायत्रींत आहे. (पद्म पु )

अपि चेत् सुदुराचारो भजते मा अनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्य सम्यग् व्यवसितो हि स ॥ (भ गी )

असें भगवतानींहि आश्वासन दिलेलें आहे

ब्रह्महत्या, गोहत्या इत्यादि महापातकें केलेल्या द्विजाना इतर कर्मे करण्याचा अधिकार नसला तरी त्यानीं संध्या केलीच पाहिजे संध्यात्याग म्हणजे गायत्रीचा त्याग! ज्या गायत्रीच्या उपासनेनें सर्व पापापासून मुक्त होता येतें, तिचाच त्याग केल्यास पापनाशासाठीं काहींच साधन उरत नाहीं म्हणून धर्मशास्त्रानें महापातक्याना संध्येचा अधिकार ठेवला आहे

गायत्रीचे सकाम प्रयोग हें प्रकरण पुढें आहेच

संध्या करताना पळी, पुल्पात्र वगैरे भाडीं लागतात, म्हणून त्याविषयीं पुढल्या प्रकरणात सांगितलें आहे

* * *

प्रकरण ८ वें

# संध्येंतील पात्रें (भांडीं)

संध्येची पळी, भांडें (फुलपात्र), तांब्या (लोटी, लोटा) व ताम्हन हीं चारच पात्रें लागतात. तीं सोनें, चांदी, तांबें या धातूंचीं किंवा मृत्तिकेचीं अथवा पिंपळ, उंबर इत्यादि लाकडाचीं असावीं. पितळ, लोखंड, शिसें, जस्त इत्यादि इतर कोणत्याहि धातूचीं नसावीं, वापरूं नयेत.

हीं चारी पात्रें आंतून बाहेरून अगदीं निर्मल, स्वच्छ असलीं पाहिजेत. फुटकीं, गळकीं, तडे गेलेलीं नसावीं. चारी पात्रें एकाच जातीचीं असलीं पाहिजेत. एक तांब्याचें, एक चांदीचें असा भेद नसावा.

*मृत्तिकेचें पात्र पाणी वगैरे पिण्यास वापरलें गेलें तर टाकून द्यावें लागतें.*

संध्येपूर्वीं शौच, आचमन-स्नानादि कर्में करावीं लागतात, म्हणून या उपांग व इतर अंगभूत कर्मांनीं काय फायदे होतात तें त्या त्या प्रकरणांत दाखवून पुढील प्रकरणें आवश्यक त्या क्रमानें दिलीं आहेत.

द्विजेतरानाहि त्यांतील बरींच कर्में आवश्यक आहेत म्हणून त्याबद्दलहि सांगितलें आहे. 'शौच' हें पुढलें प्रकरण आहे.

* * *

प्रकरण ९ वें

# शौचविधि

शौचे यत्नः सदा कार्यः शौचमूलो द्विजः स्मृतः।
शौचाचारविहीनस्य समस्तं कर्म निष्फलम् ॥ (ना पु)
शौचात् स्वाग जुगुप्सा परै असंसर्गश्च। (पा यो सू)

शौच म्हणजे शुद्धि, पवित्रता, पण येथें मुख्यत मलमूत्रविसर्जनानें प्राप्त करावयाची शुद्धि असा अर्थ आहे बद्धकोष्ठ = शौचास साफ न होणें, हें अनेक रोगाचें मूळ आहे, त्यानें उत्साह, प्रसन्नता, शक्ति इत्यादि कमी होतात शौचाच्या वेळीं माती व भरपूर पाणी याचा उपयोग करणें आरोग्यदृष्ट्याहि फार हितावह आहे गजकर्ण, नायटे, कड सुटणें इत्यादि रोग त्या मुळें होत नाहींत

शौचाचे दोन प्रकार- शुद्ध शौच व लौकिक शौच

अहं ममेति विण्मूत्रलेप-गन्धादि-मोचनं।
शुद्धशौचं इति ज्ञेयं मृज्जलाभ्यां तु लौकिकम् ॥
(मैत्रेयि उ० २।८)

मी व माझें या विष्टा व मूत्र यांच्या लेपाचा व गंध (वास) वगैरेंचा त्याग म्हणजे शुद्ध शौच, आणि माती व पाणी यांनीं विष्टामूत्रलेपगंध इत्यादींचा त्याग तें लौकिक शौच शौचादिकांतील आचाराचें चांगलें पालन करून त्रिकालसंध्या श्रद्धेनें यथाविधि केली कीं, शुद्ध शौच सहज साधतें तें साधल्यानेंच ज्ञान होतें 'मी, माझें' हाच बंध, हेंच दु खाचें कारण

*१९३१ पासूनचा असा अनुभव आहे कीं, शौचाच्या वेळीं मृत्तिकेचा* उपयोग केल्यानें ओटीपोटापासून मलद्वारापर्यंतच्या भागांत कधीं जरा सुद्धा

कंड सुटत नाहीं; खाजविण्याची प्रवृत्तीच होत नाहीं व त्वचारोग नाहींत.

नुसत्या पाण्यानें त्या भागाची कितीहि स्वच्छता केली तरी थोडा दुर्गंध व सूक्ष्म लेप राहतोच. त्यामुळें तेथें अगणित अतिसूक्ष्म जंतु उत्पन्न होतात व त्यामुळें कंडु वगैरे विकार उत्पन्न होतात मृत्तिका वापरल्यास जरा सुद्धा लेप व दुर्गंध राहात नाहीं. साबु वापरणारे सुद्धा पाटलोणी-वरून अनेक वेळा खाजवितात हेंहि अनेक वेळा दिसलें आहे.

गुरु-चरित्रात सांगितलें आहे, तेवढ्या वेळा सुद्धा माती लागत नाहीं. सुपारीएवढी ओली माती भरपूर होते. माती मात्र अगदीं लोण्यासारखी मऊ, अगदीं चिकट व शुद्ध व स्वच्छ पाहिजे. काळी किंवा पाढरी चिकण माती, पाण्यात कालवून जाड फडक्यातून तें मातीचें पाणी मोठ्या पातेल्यात गाळून घेतलें व तें निवळूं दिलें कीं वरचें पाणी ओतून टाकावें व खालीं राहिलेला चिखल उन्हात वाळवावा, म्हणजे पाहिजे तशी माती तयार होते. ती झाकणाच्या डब्यात भरून ठेवावी व शौचास जाताना थोडी हातात न्यावी व तेथें भिजवून दोन, तीन गोळ्या कराव्या व वापराव्या. शौचाचे वेळीं तपेलींत पाणी नेणें व ती नतर माती लावून घासणें शुद्धतेसाठीं आवश्यक आहे टमरेल वापरणें तेवढें सुफल-दायी होणार नाहीं.

**मृत्तिकाशौच करणें** ब्रह्मचर्य रक्षणासहि पुष्कळ मदत करतें. संध्या, ध्यान, जप, पूजा इत्यादि कर्में करताना त्या भागात खाजवावें लागत नाहीं, अपवित्र मागीं हात लावावा लागत नाहीं, कंड सुटल्यानें त्या वेळीं चालू असलेल्या कार्यांत एकाग्रता होत नाहीं. माती वापरल्यानें खाज-विण्याची प्रवृत्तीच होत नाहीं व एकाग्रतेंत विघ्नें येत नाहींत असा तीस वर्षांचा अनुभव आहे जे कोणी मृत्तिका वापरूं लागतील त्यानाहि असेच अनुभव येतील (कांहीं काळानें) अशी खात्री वाटते मृत्तिका वापरल्यानें हाताला घाणीचा स्पर्शहि सहसा होत नाहीं. इतर समयीं लघ्वीच्या वेळीं एक तपेलीभर नुसतें पाणी वापरून शौच करणें तितकेंच आवश्यक आहे, यानेंहि ब्रह्मचर्यरक्षणास मदत होते

दोन्ही प्रकारचें शौच करताना, तोंड उघडें ठेवल्यानें, बोलण्यानें, त्या घाणींतील आरोग्यविघातक अदृश्य जंतु वगैरे मुखातून प्रवेश करतात.

त्याच्या वेळीं बोलणें, थुंकणें, जोरानें श्वास घेणें वगैरे गोष्टी शास्त्रानें निषिद्ध ठरविल्या आहेत, त्या आरोग्यरक्षणाच्या हेतूनेंच.

याशिवाय वस्त्रशुचित्व, पात्रशुचिता, अन्न-आहारशुचिता इत्यादि सर्व प्रकारचें शुचित्व-पवित्रता-निर्मलता पाहिजेत; म्हणूनच नारदपुराणांत म्हटलें आहे कीं, शौचपालनाचा प्रयत्न मनुष्यानीं उत्तम प्रकारें केला पाहिजे. शौच, शुचिता तर द्विजत्वाचें मूळ आहे. शौचादींतील आचाराचें जे पालन करीत नाहींत, त्यांनीं केलेलें सर्व कर्म निष्फळ ठरतें; (फारच अल्प फल मिळतें ).

शौचाचें पालन पूर्णपणें होऊं लागल्याचें लक्षण म्हणजे स्वतःच्या देहाचा-अंगाचा सुद्धा किळस वाटूं लागणें व इतर कोणालाच स्पर्श करूं नये असें सहज वाटूं लागणें. [ वचनें प्रकरणारंभीं आहेत ]

उपनयनानंतर सुमारें २९ वर्षे लघुशंकेच्या वेळीं पाणी व शौचाच्या वेळीं मृत्तिका न वापरण्याचा अनुभवहि याच मनुष्यादिकानीं घेतल्यामुळें त्या दोन अवस्थांतील महदंतरानें पूर्ण खात्री पटली; तरी कोणाचीहि खात्री वर सांगितल्या प्रमाणें केल्यानें होईल. 'केल्यानें होत आहे रे' (दा.बो.)

शौचास साफ न झाल्यानें उत्साह, प्रसन्नता नष्ट होतात व कर्मात, ध्यान-जपादिकांत, स्वस्थता नसते, एकाग्रता साधणें कठीण जातें, अनेक आध्यात्मिक ताप विघ्न करतात, म्हणून ती अडचण वरची दूर करावी हें सांगणें उपयुक्त ठरेल

शौचास साफ न होण्याचीं अनेक कारणें असलीं तरी विरुद्धधर्मी पदार्थ एकाच भोजनांत-फराळांत खाणें; चर्वण चांगलें न करणें, जेवतांना फार पाणी पिणें, पाणी कमी पिणें, व्यायामाचा अभाव, आणि जेवीत असतां, खात असतां, पुस्तक, वर्तमानपत्र वगैरे वाचणें हीं मुख्य कारणें आहेत. दोन वेळा जेवणाऱ्या माणसानें थंडीच्या दिवसांत रोज २॥-३ शेर व उन्हाळ्यांत ३॥-५ शेर पाणी सर्व दिवसांत पिणें जरूर आहे शरीरांतून बाहेर टाकून देण्याजोगे अनिष्ट पदार्थ, घाण (टॉक्झिन्स्) इत्यादि वाहून नेऊन आंतील सर्व गटारें साफ ठेवण्यास पुरेसें पाणी पोटांत न गेल्यानें घाण आंतल्या आंत साचत जाते, मूत्रपिंड, यकृत् वगैरेंच्या कार्यांत अडथळे

येतात अपानवायु कार्यक्षम रहात नाहीं व त्यामुळें बद्धकोष्ठ, दमा, खोकला, खरुज, गळवें, कॅन्सर इत्यादि अनेक रोग होतात केवळ भरपूर पाणी, दिवसात वेळोवेळीं पिण्यानेंच दमा, खोकला, बद्धकोष्ठ हे रोग अनेक वृद्ध-तरुण व्यक्तींचे बरे झाले आहेत

पहाटेस उष पान करावें, भोजनापूर्वी १ तास तरी अर्धा शेर पाणी प्यावें, जेवताना किंवा जेवण सपताच पाणी पिऊ नये, नतर १-१॥ तासानें जशी तहान लागेल तसें थोडेंथोडें पाणी प्यावें, याची शास्त्रीय उपपत्ति सागण्यानें विस्तार फार होईल म्हणून लेखणी आवरावी लागत आहे वरील पथ्य पाळूनहि शौचाच्या तक्रारी दूर न झाल्या तरच खालील उपाय करावा

पाव तोळा त्रिफळा चूर्ण गोळी करण्यास आवश्यक तेवढ्या तुपात कालवून तुपाच्या इतकीच साखर घालून गोळी करावी व झोपण्यापूर्वी ती चाऊन खावी व नतर १॥ पावशेर चागलें कडकडीत पाणी प्यावें, म्हणजे काहीं ( कमी जास्त ) दिवसानीं शौचाच्या सर्व तक्रारी दूर होतील

वर सागितल्या प्रमाणें शौच द्विजानींच नव्हे तर प्रत्येक मनुष्यानें करणें जरूर आहे शौचाहून आल्यावर हातपाय धुऊन चूळ भरून टाकीपर्यंत तरी भाषण करणें, बोलणें हितावह नाहीं शौचानतर आचमन करावें लागतें, म्हणून पुढील प्रकरणात आचमनाविषयीं सोपपत्तिक विवेचन सविस्तर केलें आहे



प्रकरण १० वें

# आचमन

'अन्तर स्विद्यते यस्मात् तस्मात् आचमनं स्मृतम्' (मनु)

**आचमन** – ठराविक प्रमाणात, ठराविक पद्धतीनें, तीन वेळा थोडें थोडें जल पिणें व विशिष्ट अवयवाना जलानें स्पर्श करणें, वगैरे

**आचमन केव्हां घेतलें पाहिजे?** – झोंपून उठल्यावर, शौचानंतर हातपाय धुणें, चूळ भरणें झाल्यावर, शिंक, जामई, किंवा ढेकर आल्यावर, ठसका लागणें, उचकी लागणें, थुंकणें, नाक शिंकरणें यानंतर, स्नानाच्या पूर्वी व नंतर, भोजनापूर्वी व नंतर, वारा सरल्यावर, दातांत अडकलेलें उच्छिष्ट तोंडात आलें तर, कोणतेंहि धार्मिक कार्य करण्यापूर्वी व शेवटीं, (सध्येंत अनेक प्रसंगीं आचमन आहे.) स्नान करून वस्त्रें नेसल्यावर, पतितादिकाशीं भाषण केल्यावर, रस्त्यावरून जाऊन आल्यावर, दान देताना वा घेताना, अश्रुपात, असत्यभाषण, क्रोध, माजराचा स्पर्श, इत्यादि गोष्टी घडल्यानंतर आचमन केलें पाहिजे

**आचमनानें फायदा** – वरील आचमननिमित्ताकडे लक्ष दिल्यास सहज कळेल कीं, ज्या ज्या वेळीं दशविध प्राणापैकी एक किंवा अधिक प्राणाच्या शक्तीचा व्यय होतो, त्या त्या वेळीं त्या खर्च झालेल्या प्राणशक्तीची भर पाई करण्यासाठीं आणि त्या त्या क्रियानीं इंद्रियास व इंद्रियद्वारास शुष्कता येणें, उष्णता वाढणें, मलिनता येणें इत्यादि झालेले दुष्परिणाम दूर करून आरोग्य टिकण्यास मदत होण्यासाठीं शास्त्रानें आचमन सागितलें आहे

उदा०(१) चार पाच वर्षांच्या बालकास ठसका लागला किंवा उचकी लागली कीं, त्याच्या माता वगैरे सांगतात कीं थोडें पाणी पी पाहू! घोटभर पाणी पिण्यानें हे विकार थांबतात हें त्यांना परंपरेनें माहीत झालेलें असतें (२) एकाएकीं शिंक येऊ लागली व ती किंचित् आडकली व आली म्हणजे नाकाडोळ्यांना पाणी येणें व ओटीपोटापर्यंत पोटांत हिसका बसणें वगैरे दुष्परिणाम होतात हें स्पष्ट कळतें (३) ढेंकर येतांना मुखाच्या आतील भागावर दुष्परिणाम होतात ते कळतात, कित्येक वेळां अन्ननलिकेवर परिणाम झालेला कळतो, खालेल्या काहीं पदार्थांचा दुर्गंध मुखांत पसरतो याप्रमाणेंच काहीं तरी दुष्परिणाम इतर प्राणाचा व्यय होतांना कमीअधिक प्रमाणांत घडतात

प्राण-अपान इ पाच व नाग-कूर्म इत्यादि पाच प्राण हे वायु तत्त्वाचेच प्रकार आहेत वायूनें जलतत्त्वाचें शोषण होतें ती शुष्कता दूर करून अवयवाच्या व इंद्रियांच्या ठिकाणीं आर्द्रता, ओलेपणा उत्पन्न करणें व त्यायोगें त्या त्या भागांत उत्पन्न झालेली घाण, मलिनता सूक्ष्म जंतु वगैरेंना विसर्जनाच्या मार्गास लावणें व इंद्रियांत उत्साह, तरतरी आणणें हा आचमनांतील हेतू आहे 'अन्तर स्विद्यते' या श्लोकांत हेंच सांगितलें कीं अन्तर म्हणजे आतील इंद्रियें वगैरे आणि मनबुद्धि इत्यादि, यांत ओलावा उत्पन्न करतें म्हणून आचमन म्हणतात ( मनु स्मृति ) दुसऱ्या एका स्मृतींत 'स्विद्यते'च्या जागीं 'शुध्यते' असा पाठ आहे, शुद्धि केली जाते असा त्याचा अर्थ आहे

पतितांशीं संभाषण करतांना त्यांच्या श्वासादून व मुखादून पसरणाऱ्या वायूचा परिणाम समोरच्या माणसावर होतो मांजर हा पशूतील सर्वांत दुष्ट, कृतघ्न, हिंसक, मांसभक्षक प्राणी! त्याचे श्वास व स्पर्श दोषोत्पादकच असणार!

**इंद्रिय देवता आचमनानें प्रसन्न होतात**- शिंक, जांभई इत्यादिमुळें मलिनता वगैरे इंद्रियांत उत्पन्न होतात व त्यामुळें इंद्रिय देवतांना सुद्धा त्रास होतोच, आचमनानें व जलस्पर्शानें ते दोष दूर केले गेले म्हणजे त्या देवता प्रसन्न होतात म्हणूनच शंखस्मृति वगैरे ग्रंथांत म्हटलें आहे कीं-

त्रिः प्राश्नीयात् यदम्भः तु प्रीताः तेन अस्य देवताः।
ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च भवन्तीत्यनुशुश्रुम ॥ १ ॥
गंगा च यमुना चैव प्रीयते परिमार्जनात् ।
नासत्यदस्रौ (अश्विनीकुमार) प्रीयेते स्पृष्टे नासापुटद्वये ॥२॥
स्पृष्टे लोचनयुग्मे तु प्रीयते शशिभास्करौ ।
कर्णयुग्मे तथा स्पृष्टे प्रीयेते अनिलाऽनलौ ॥ ३ ॥
स्कंन्धयोः स्पर्शनादस्य प्रीयन्ते सर्वदेवताः ।
मूर्ध्नस्तु स्पर्शनादस्य प्रीतस्तु पुरुषो (परमात्मा) भवेत् ॥४॥

आचमनास उदक- शुद्ध, स्वच्छ, अग्नीनें न तापलेलें, गरम नसलेलें फेस किंवा बुडबुडे नसलेले, दृष्टीलाहि स्वच्छ दिसणारें, असे असलें पाहिजे त्यात क्षार, मचूळपणा नसावा (*मचूळ पाण्याचें कृत्रिम बर्फसुद्धा चांगलें होत नाहीं व त्या पाण्यानें केलेला चहा तर फार बिघडतो! मग त्यानें शुद्धि कशी होईल?*) ज्यात दिवसा भरपूर सूर्यकिरण व रात्रीं भरपूर चंद्रकिरण पडतात अशा जलाशयातलें, सूर्योदयापूर्वी आणलेलें पाहिजे व तें जाड, स्वच्छ वस्त्रातून गाळून आणलेलें असावें. असें हल्लीं सर्वांस मिळणें कठिण आहे.

**निसर्गोपचार पद्धतीनें** केवळ आचमनानें कांहीं दुर्धर रोगसुद्धा बरे करता येतात. खात्री करून घेणें असल्यास डॉ कुन्हे कृत 'जलचिकित्सा' हे पुस्तक पाहावें. तें जल मात्र वर वर्णिल्याप्रमाणें पाहिजेच.

**पाश्चात्यांचे मत-** *इ. स. १८७० च्या सुमारास निरोगी राहण्याचा* सर्वांस सुलभ व सोपा असा उपाय शोधून काढण्यासाठीं युरोपातील प्रमुख राष्ट्रांनीं एक कमिशन नेमलें तें कमिशन हिंदुस्थानात आलें होतें; आणि त्या कमिशननें 'sipping water and deap breathing' म्हणजेच आचमन आणि दीर्घश्वसन (*हा प्राणायामाचाच सोपा प्रकार आहे.*) हा उपाय ठरवला! यावरून तरी आचमन व प्राणायाम याचें महत्त्व पटेल! या दोन्ही क्रिया त्या काळीं फक्त हिंदुधर्मातच प्रचलित होत्या! संध्येंत पाच सहा प्रसंगीं आचमन व प्राणायाम करावयाचे असतात.

*प्राण जलमय आहेत-* 'आपोमयाः प्राणाः' (*श्रुति*) वर सांगितलें आहे कीं प्राणशक्तीचा झालेला व्यय भरून काढणें व आरोग्यवृद्धि करणें हे

आचमनातील हेतु आहेव प्राणाचें अस्तित्व, पोषण इ. आपानें = जलानें होतें हें श्रुतींनीच सांगितलें आहे. सूर्यहि सर्व प्राणिमात्राचा प्राण, जीवन आहे, 'प्राणः प्रजानां उदयति एष सूर्यः' (प्रश्न उ ) त्या पाण्यात सूर्योदयापासून सूर्यकिरण भरपूर पडतात, तें सूर्याच्या प्राणशक्तीनें युक्त झालेलें असतें चंद्राला सुधाकर, अमृतांशु, सुधांशु म्हणतात, कारण त्याचे किरण अमृतमय असतात (अंशु = किरण), ज्या जलात ते भरपूर पडतात तें जल त्या अमृतरसानें युक्त झालेलें असतें; परंतु सूर्याची प्राणशक्ति व चंद्राची अमृतशक्ति सूक्ष्मस्वरूप असतात गटगटा पाणी पिण्यानें ते रस रसनेला व मुखातील त्वचेला ग्रहण करता येत नाहींत. रस ग्रहण करणारी व जाणणारी म्हणून जिभेला रसना म्हणतात तिच्यावरून जल चावकाय सरपटत गेलें तरच तिला त्या जलातील सूक्ष्म रस ग्रहण करता येतात (हेमगर्भाची मात्रा चाटवतात, पाजीत नाहींत त्याचें कारण हेंच आहे ) म्हणूनच आचमनाला प्रत्येक वेळीं पाणी किती प्यावें व तें कसें प्यावें याविषयी शास्त्रानें नियम सांगितले आहेत

**आचमन-मुद्रा**- उजव्या हातात जास्तीत जास्त पाणी किंवा धान्य घेण्यासाठीं हाताची जशी आकृति-मुद्रा-करतात, तिला गोकर्णमुद्रा म्हणतात गाईच्या कानासारखा उजवा तळहात करून त्यात पाणी घ्यावें, (प्रवाहातील किंवा पळीनें घालून ) आणि करंगळी समोर ताठ पसरावी व आंगठा तर्जनीपासून जेवढा दूर नेता येईल तेवढा पसरावा, ही जी आकृति होते तिला येथें आचमनमुद्रा हें नाव दिलें आहे

**जलाचें प्रमाण**- 'माषमज्जनमात्रास्तु संगृह्य त्रिः पिबेत् अपः' (भरद्वाज) माष बुडू शकेल इतकें पाणी हातावर घ्यावें व प्यावें, असें तीन वेळा करावें माष = उडीद, उडदाचा दाणा, असा अर्थ कोणी करतील म्हणून 'नागदेव' सांगतात कीं,

'माषमात्रसुवर्णस्य यत्र मज्जति वै मणिः।
एतदाचमनं प्रोक्तं पवित्रं कायशोधनम्'

एक (माष) = मासा वजनाचा मणि चांगला बुडेल इतकें पाणी पिणें म्हणजे आचमन, तें शरीरशुद्धिकारक व पवित्र होय

**ब्रह्मतीर्थानें आचमन**– मनगटाच्या वर तळहाताच्या मुळाशीं दोन बाजूस दोन उचवटे असतात, त्याच्यामधील ज्या खोलगट भागांतून एक ठळक हस्तरेषा निघून वरच्या बाजूस जाते, तो खोलगट भाग म्हणजेच ब्रह्मतीर्थ. मान ताठ ठेवून, आचमनमुद्रेचा हात तोंडाजवळ नेऊन ब्रह्मतीर्थ खालच्या ओठावर टेकून हातातील पाणी हळूच तोंडात सोडावें, म्हणजे अगदीं शास्त्रोक्त आचमन होईल व शास्त्रोक्त लाभ भरपूर मिळेल

**गरम पाण्यानें आचमन**– जे नेहमीं गरम पाणीच पीत असतील किंवा आजारीपणामुळें वैद्यानीं गार पाण्याचें आचमन सुद्धा मना केलें असेल त्यानीं गरम, कोमट पाण्यानें करावें, पण आचमन केलें पाहिजे

**आचमन-जलाचें आणखी प्रमाण**—

> हृद्गाभिः पूयते विप्रः कण्ठगाभिस्तु भूमिपः ।
> वैश्योऽद्भिः तालुगाभिश्च शूद्रः स्पृष्टाभिः अन्ततः ॥ (मनु)

हृदयापर्यंत पोंचेल इतक्या जलानें ब्राह्मण पवित्र होतो, कंठापर्यंत गेल्यानें क्षत्रिय, तालूपर्यंत गेल्यानें वैश्य आणि स्त्रीशूद्रादि मुखाच्या आतल्या भागास स्पर्श होईल इतक्या पाण्याच्या आचमनानें शुद्ध होतात (स्त्रियाचा उल्लेख याज्ञवल्क्य स्मृतींत आहे)

**सिद्धांत**–यावरून ठरतें की, पूर्वी सांगितलेलीं निमित्तें घडलीं असता व **यथाधिकार धर्मकृत्यें करतांना मनुष्यमात्रानें आचमन केलें पाहिजे** पूर्वी सांगितलेलें जलाचें प्रमाण ब्राह्मणासाठीं आहे बाकीच्यानीं यथाधिकार वर सांगितलेल्या प्रमाणांत जल वापरावें कोणास यांत शंका आल्यास त्यानीं प्रथम विचार करावा कीं उत्तम संध्येचा काळ ब्राह्मणास चार घटकांचा आवश्यक व क्षत्रिय वैश्याना दोन व एक घटका ऐच्छिक या[1] अधिक जपानें, तपानें शरीरांत अधिक उष्णता वाढते म्हणून त्या पूर्व वचनास धरूनच हा फरक आहे योगानें तर कांहींत इतकी उष्णता वाढते कीं त्यास अंगावर भुजंग बाळगावे लागतात स्वामी विशुद्धानंद यांचें चरित्र कल्याण मासिकाच्या विशेषांकांत छापलेलें पहावें फार काय योगादि तपानें, ज्याचें शरीर अत्यंत शुद्ध झालें आहे त्यांस औषधें, इंजेक्शनें वगैरे इतरांच्या प्रमाणाच्या १/४ नें दिलीं तरी सुद्धां

भलतेच दुष्परिणाम होतात, म्हणून सर्वज्ञ ऋषींच्या वचनाविषयीं संशय घेऊ नये

**आणखी नियम**–हातात पवित्रक असावें पूर्वेस किंवा ईशान्य दिशेस तोंड करावें पावलें आसनावर नसावीं आसनाबाहेर भूमीवर ठेवावीं, दोन्ही हात गुडघ्याच्या आत असावे पाय लांब पसरू नयेत शेंडीला गाठ मारलेली असावी डोक्यावर वस्त्र नसावें बिनकाठ्याचें, दुहेरी वस्त्र नेसू नये (नसावें) काविने रंगविलेलें वस्त्र मुळींच नसावें पाय धुऊन ते न पुसता आचमन करावें तें शक्य नसेल तर प्रथम दोन्ही पावलावर दर्भांनीं पाणी शिंपडून मग आचमन करावें

**वाम तर्जनीचा स्पर्श**–हातावर घेतलेल्या जलाला डाव्या हाताच्या तर्जनीनें स्पर्श करून ठेवून जल प्यावें असें **बृहत् पाराशर स्मृतीचें** वचन आहे इतर स्मृतिकारांनी जरी नुसता वामहस्ताचा उजव्याला स्पर्श सांगितला असला तरी कलियुगांत पाराशर स्मृतिच मुख्य असल्यानें तेंच वचन मानलें पाहिजे

**नखाचा किंवा नखाचा स्पर्श** आचमनाच्या जलाला होता कामा नये नखस्पर्श झालेलें जल मदिरेसमान! हा नियम सर्वच धर्मकार्यांत पाळला पाहिजे पाणी, गंध, इत्यादींना सुद्धा नख लावता नये शास्त्रानें हा नियम हेतुपूर्वकच सांगितला आहे, कारण नखें कितीहि स्वच्छ असलीं, तरी त्यात थोडासा मळ असतोच, व मळ असेल तेथें विविध अतिसूक्ष्म जंतु असावयाचेच पिण्याच्या पाण्यास किंवा कोणत्याहि पेय पदार्थास नखाचा स्पर्श निषिद्ध आहे तो याच हेतूनें

जमिनीवर आचमन करणें तें आसनावर बसून, कोरडें वस्त्र नेसून करावें ओलें वस्त्र नेसून कोणतेंहि धर्मकर्म भूमीवर करू नये हा सर्वसामान्य नियम आहे जेथें ओलें वस्त्र आवश्यक म्हणून सांगितलें असेल त्या कर्मांतच ओलें वापरावें ओल्या वस्त्रानें कर्म करीत राहणें सामान्यत आरोग्यविघातक आहे

**पाण्यात राहून आचमनादि कर्में ओल्या वस्त्रानें करावींत, कोरड्या वस्त्रानें करू नयेत** पाणी गुडघ्यापेक्षा कमी असल्यास आचमनादि

पाण्यात बसून करावें. गुढघ्याच्यावर असल्यास आचमनादि उभ्यानेंच केलें पाहिजे. **'पादादि जानुपर्यन्तं पृथ्वीमंडलं'** ( श्रुति )

**द्विराचमन**— वर सांगितल्याप्रमाणें तीन वेळा पाणी पिणें म्हणजे एकदा आचमन, तसें दोन वेळा करणें म्हणजे द्विराचमन (द्वि = दोनदा) पहिल्या आचमनानंतर दोन वेळा जलानें तोंड पुसलें व हात धुतले म्हणजे झालें, इतर ठिकाणीं जलानें स्पर्श करणें वगैरे दुसऱ्या आचमनानंतर करावें संध्या, भोजन, जप, होम, दान देणें, दान घेणें व बलि देणें या कर्मांच्या आरंभीं द्विराचमन करावें ( देवी, नन्दी पुराण, व इतर )

**शुद्धाचमन**— केशवादि नाममंत्र किंवा कोणताहि मंत्र मनात सुद्धा न म्हणता आचमन करणें तें शुद्धाचमन, मलमूत्रविसर्जनानंतर शुद्धाचमन करावें

**पाण्याच्या अभावीं**— ब्राह्मणानीं उजव्या कानाला उजव्या हाताच्या बोटानीं नुसता स्पर्श करावा इतरानीं विष्णु ( उपास्य देवता ) स्मरण, ध्यान करावें अग्नि, आप, सर्व वेद, चंद्र, सूर्य, वायु व इतर सर्व देव, ब्राह्मणाच्या उजव्या कानात वास करतात म्हणून, आपत्कालीं उजव्या कानास स्पर्श केल्यानें आचमन केल्याचें श्रेय मिळतें कोणी उजवा कान, नाक व डावा कान यास स्पर्श करतात, पण तें विहित नाहीं

**सूचना**- इतर स्मृतींत दिलेल्या नावात ' आप'च्या ऐवजीं ' वरुण ' आहे कुठें आणखी काहीं फरक आहे, पण वरील वचनात सर्व देवता असल्यानें तेंच आधारास घेतलें, त्यामुळें सर्वमताचा संग्रह सहज साधला.

**जपापूर्वीचें आचमन**—ज्या मंत्राचा जप करावयाचा असेल त्यानें आचमन कोणी करतात म्हणून त्यास मंत्राचमन म्हणतात त्याप्रमाणेंच गायत्री जपापूर्वीं गायत्रीमंत्रानें व शिरोमंत्रानें वगैरे आचमन काहीं स्मृतींत सांगितलें आहे, पण कोणत्याहि पोथींत तसें आढळलें नाहीं, व पुस्तकारूनहि नाहीं व प्रयोगहि कुठें आढळला नाहीं म्हणून तें येथें सविस्तर न देता नुसतें दिग्दर्शन करणेंच बरें

प्रणवपूर्वक गायत्रीच्या तीन पादानी पाणी पिणें, 'आपोहिष्ठा' वा तीन मंत्राचे नऊ चरण व शिरोमनातील पदें यानीं जलस्पर्श करावयाचा असा एक प्रकार आहे

**सूचना**—प्रणवपूर्वक केशवादि नामानीं आचमनाचा विधि उत्तरार्धात दिला आहे. द्विजेतरानीं प्रणव न लावता तसेंच करावें केशवादि चोवीस नावाचा अर्थ व त्याचा तोच क्रम का हें एका स्वतंत्र प्रकरणात दाखविलें आहे

(या प्रकरणात–मनु, याज्ञवल्क्य, गौतम, प्रचेता, बृहत् पाराशर, भरद्वाज, शंख, व्यास, नागदेव इत्यादि स्मृति, षट्त्रिंशन्मत, आन्हिककारिका, विश्वामित्र कल्प, इत्यादीचे आधार घेतले आहेत, काहींचा उल्लेख वर केला आहेच )

या प्रकरणात शिखाबंधनाचा (शेंडीला गाठ मारणेचा) उल्लेख आला आहे म्हणून आता पुढील प्रकरणात 'शिखाबंधन व मोचन' याविषयीं लिहिणें ओघानेंच प्राप्त झालें



प्रकरण ११ वें

# शिखाबंधन व मोचन

स्नाने दाने जपे होमे संध्यायां देवतार्चने ।
शिखाग्रंथिं विना कर्म न कुर्यात् वै कदाचन ॥
सदोपवीतिना भाव्यं सदा बद्धशिखेन च ।
विशिखः व्युपवीतिश्च यत् करोति न तत् कृतम् ॥ (कात्यायन)

स्नान, दान, जप, होम, सध्या, देवपूजा इत्यादि धर्मकर्मे शेंडीला गाठ मारल्याशिवाय करु नयेत जटा असल्या तरी शेंडीला गाठ मारली पाहिजे शेंडीला गाठ मारल्याशिवाय किंवा शेंडीशिवाय केलेलें कर्म न केल्यासारखेंच म्हणून नेहमीं शेंडी बाधलेली पाहिजे

अपवाद—

शौचेऽथ शयने संगे भोजने दंतधावने ।
शिखामुक्तिं सदा कुर्यात् इत्येतत् मनुः अब्रवीत् ॥

मलमूत्रत्यागाच्या वेळीं, झोपताना, स्त्रीसग करताना, जेवताना, व दात घासताना नेहमीं शेंडी मोकळी असावी असें मनुवचन आहे (इतर सर्व काळीं बाधलेली असावी हें सार )

संन्याशांशिवाय इतर सर्वांना शेंडी पाहिजेच. कुटीचक, बहूदक व हस या तीन प्रकारच्या सन्याशानी सुद्धा शिखात्याग करता नये, जानवेंहि पाहिजेच (नारदपरिव्राजक उप ५।१ ) एकदण्डी परमहस सन्याशाशिवाय सर्वांना शेंडी पाहिजेच इतर कोणी क्रोधानें वैराग्यानें किंवा इतर कारणानीं शेंडी काढून टाकली, उपटली, तर प्राजापत्य नांवाचें प्रायश्चित्त केलें पाहिजे व शेंडी ठेवली पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं. ( हारीत )

**आपद्धर्म**– चाई लागणें, वगैरे कारणानीं शेंडीच्या जागेवरील केस गेले असले किंवा टक्कल पडलें असलें तर, शेंडी बाधून करण्याच्या कर्मांच्या वेळीं सात दर्भांना गाठ मारून ते उजव्या कानावर ठेवले पाहिजेत.

**समंत्रक बांधावी**—द्विजानीं प्रणवयुक्त गायत्रीमत्रानें, 'मानस्तोके' मत्रानें किंवा 'ऊर्ध्वकेशि' मत्रानें (पूर्वंपरपरेप्रमाणें) बाधावी द्विजेतरानीं उपास्य देवतेच्या किंवा देवतेच्या नाममत्रानें बाधावी मत्राशिवाय शिखा बाधून धर्मकर्म केल्यास तें निष्फळ ठरतें **शिखा बांधल्यावर आचमन करून हृदय, बाहू व खांदे याना जलानें स्पर्श करावा.**

**शिखाग्रंथीचे प्रकार**–**ब्रह्मग्रंथि, शिवग्रंथि व विष्णुग्रंथि** हे आहेत सध्यादि कर्मांत ब्रह्मग्रथि, शैव कर्मांत शिवग्रथि व वैष्णवकर्मांत विष्णुग्रथि' असावी सध्या ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव इत्यादि ब्रह्मकर्में आहेत शिवपूजाभिषेकादि शैव कर्म, व विष्णुयागादि पूजा वगैरे वैष्णवकर्में होत

**लक्षांत ठेवावें कीं संध्यादिकर्मांत शैववैष्णवादि वादाला व अभिमानाला धर्मशास्त्रानें जागा ठेवलेली नाहीं.** पुढें अनेक ठिकाणीं हेंच दिसेल यामुळें साप्रदायिक दुरभिमान, द्वेष इत्यादि उत्पन्न होणार नाहींत

**त्रिविध ग्रंथि लक्षणें**– डावीकडून उजवीकडे एक वळसा देऊन, शेंडीचें अग्र वर बाहेर राहील अशी जी गाठ ती **ब्रह्मग्रंथि**–ब्रह्मगाठ, ही सुरगाठीसारखी असते, सोडणें अगदीं सोपें, नुसती एक गाठ मारणें ती **शिवग्रंथि**–रुद्रग्रथि, दोन वळसे देऊन मारलेली गाठ **विष्णुग्रंथि.** मत्र सध्याप्रयोगात आहेत दर्भशिखा बाधताना तेच म्हणावे

**शोचनीय सद्य स्थिति !** जेथें शेंडीच्या व जानव्याच्या सरक्षणासाठीं लाखों वीर पुरुषानीं धारातीर्थीं देह ठेवले त्या महाराष्ट्रात लोकाना शेंडीचा कटाळा आला आहे ब्राह्मणसुद्धा शिरोनग्न झाले आहेत, हें पाहून शिवाजी, तानाजी, बाजी वगैरे हजारो महाराष्ट्रवीराना काय वाटत असेल ! शेंडी काहीं अडचण करते असेंहि नाहीं, आणि कोणाला जरी अडचणीची वाटली तरी शास्त्राज्ञा म्हणून ठेवलीच पाहिजे का आणि काय म्हणून असें विचारणेंच अधर्म '*शास्त्रं प्रमाणं ते*' (भ गी १६।२४) शास्त्राज्ञा म्हणून पालन केलीच पाहिजे श्रीज्ञानेश्वर

महाराज त्या श्लोकाच्या टीकेंत म्हणतातः- 'जो जगीं समान सकृपु। हिताहितु दाविता दीपु। तो अमान्य केला बापु। वेद जेणें॥ (त्याला) एव परत्र ना स्वर्गु। इहिक ना विषयभोगु। तेथ केउता प्रसगु। मोक्षाचा तो॥ तैसा अशेष पुरुषार्थी। जो गोंसावी हो म्हणे पार्था। तेणें श्रुति-स्मृती माथां। घेसों धापे॥ शास्त्र म्हणेल सांडावें। तें राज्यही तृण मनावें। जें घेववी तें न मनावें। विषही विरु॥ ऐसी वैदिक निष्ठा। जालेया सुभटा। तरी कें आहे अनिष्टा। भेटवि गा॥ श्रीज्ञाने श्वराच्या म्हणण्याचें सार हेंच कीं श्रुति-स्मृतीरूपी शास्त्र जर सांगेल कीं विष प्यावें, तर का म्हणून न विचारता तें प्यावें व राज्यसुद्धा त्यागावें असें असेल तर शास्त्राज्ञा म्हणून त्यागावें, अशी शास्त्रनिष्ठा असल्यावर अनिष्ट करील असें काय आहे?

असे असता आवडीनें ज्ञानेश्वरी वाचणाऱ्या ब्राह्मणात सुद्धा सध्या न करणारे व शिखानष्ट केलेले पुष्कळ असतील। असें वागणें म्हणजे त्या ज्ञानदेवीचा व श्रीज्ञानेश्वराचा उघड उघड उपमर्द करणें नव्हे काय? तुकोबा, समर्थ इत्यादि सताचे अनुयायी म्हणविणारात सुद्धा असा अधार नाहीं असें नाहीं।

चूडाकरण (चौल) हा एक महत्त्वाचा सरकार योग्य वेळीं न झाला तर मुंजीच्या वेळीं आधीं करावा लागतो तेव्हा चूडा शिखा, शेंडी ठेवतात

पूर्वी कैद्याला तुरुगात टाकताना लाब असलेली शेंडी कापून आरूढ करीत असत, सफाई काढून टाकीत नसत, हेतु हा असे कीं, गळफास घेऊन त्यास मरता येऊ नये हल्लीं सरकारचा हा त्रास वाचला, इतका फायदा मात्र बऱ्याच अशीं झाला, हें खरें शेंडी थोडी कापून टाकली म्हणून तें कैदेतून सुटून आल्यावर प्रायश्चित्त घेत असत।

पूर्वी यवनाना, मुसल्मानाना 'शिखानष्ट'-(शेंडी नसलेले) म्हणत हें या कानानीं ऐकलेलें आहे, म्हणजे आज पुष्कळसे ब्राह्मणसुद्धा यवना-साररवेच झाले आहेत काहींनीं जानवेंसुद्धा काढून टाकलें आहे। सुभद्रा-हरणाच्या वेळीं अर्जुन त्रिदडी (हस) सन्यासी बनला होता सीताहरणा-साठीं रावण त्रिदडी सन्यासीच बनला होता त्रिदडी सन्याशाला शेंडी व जानवें असतें, त्यामुळें सोंग घेताना शेंडी, जानवें कादावीं लागत

नाहींत एकदंडी सन्याशाचें सोंग घेतलें असतें तर शेंडी जानवीं काढून टाकावीं लागलीं असती, व नतर दोन्हींच्या त्यागाबद्दल प्रायश्चित्तें करावीं लागलीं असतीं, म्हणून **हरिभक्त अर्जुन व हरिद्वेष्टा रावण यानीं शेंडी काढली नाहीं।** सन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी' ही म्हण हेंच सागते कीं शेंडी नसली तर लग्न करता येत नसे ही म्हण आज निरर्थक ठरली। कलियुगात त्रिदंडी सन्यास वर्ज्य आहे

**शास्त्राज्ञाभंग करण्याची एकदा सवय लागली कीं,** शिक्षा येथें किंवा मरणानतर भोगावी लागणारच, पण सवयीमुळें कायदेभग, शिस्त भग इत्यादींची साथ वाढत जाते आणि राष्ट्रात समाजात कोणालाच स्वास्थ्य व समाधान लाभत नाहीं वडिलाच्या आज्ञा भग करण्याची त्याचा अपमान करण्याची ज्याना 'गुरुजी' म्हणतात त्या शाळेंतील मास्तराची निंदा व टिंगल करण्याची वगैरे **अनेक मानवत्वविघातक सवयी निर्माण होतात**

**शेंडी ठेवणें व गाठ मारणें यापासून होणारे फायदे** सुद्धा सागता येतात, आणि ग्रथविस्तार करणें नको वाटत असलें तरी थोडें विवरण करणें भाग आहे मनुष्याच्या डोक्याची कवटी तीन हाडाची झालेली असते या तीन हाडाच्या पुढल्या टोकाचा साधा मध्य मेंदूच्या मधल्या भागाच्या बरोबर वर असतो परतु नवीन जन्मलेल्या बाळकाचा त्या जागेवर हिंपी एवढा खाडा असतो, (त्यास टाळू म्हणतात ) कारण त्या हाडाच्या टोकाचा साधा पूर्ण जुळलेला नसतो तो पुढें २।३ वर्षात पूर्ण जुळला जातो मेंदूची पूर्ण वाढ तो खाडा भरणें व मूल चागलें चालू लागणें या गोष्टी बहुधा समकालीन होतात जावळ करताना (पहिल्या वर्षातच ) त्या टाळूवर व आजूबाजूला शेंडी ठेवतात टाळू चागली भरली कीं शेंडी मार्गे सारण्याचा विधि, चूडाकर्म (चौल म्हणतात तो धार्मिक ) सस्कार तिसऱ्या वर्षी करावयाचा असतो

शेंडी ठेवण्याची जी जागा आहे तेथें गाईच्या खुरा एवढा थोडा भाग वाटोळा असतो त्याच्या मध्यभागीं दाबून पाहिलें तर असें कळतें कीं, तो भाग डोक्याच्या इतर भागापेक्षा बराच मऊ आहे-असतो, व आजू बाजूचा वाटोळा भाग कमी मऊ असतो, व ही स्थिति वयोमानानें

बदलत नाहीं त्या मऊ भागाच्या संरक्षणासाठीं त्या खोलगट भागाला व्यापील एवढी शेंडी ठेवणें, मनाचें आरोग्य संरक्षणासाठीं आवश्यक आहे. त्या शेंडीच्या खालींच मनाचें संचालन करणारा मेंदूचा भाग असतो शेंडीच्या भोंवतीं घेरा एवढ्याच साठीं ठेवावयाचा असतो कीं क्षौर करताना शेंडीचे केस काढले जाऊन ती बारीक होऊ नये

शंकाः–हल्लीं शेंडीच्या ठिकाणीं केस राखण्याची प्रथा अनायासें सुरु झाली आहे, तर मग शेंडीची आवश्यकता काय? त्या केसाना गाठ मारता येत नाहीं म्हणून आवश्यकता आहे डोक्यावरील सगळेच केस सहज गाठ मारण्याइतके लांब वाढविल्यास निराळ्या शेंडीची जरूरी नाहीं; तरी पण त्या जागेवरील केसाना गाठ मारणें व काहीं वेळा ते मोकळे ठेवणें जरूर आहे नुसत्या शेंडी ठेवण्यानें मनाचें संरक्षण होत नसून गाठ मारून ठेवणें व सोडलेली ठेवणें या क्रियानीं फायदा होतो

गांठ मारण्यात व सोडण्यांत हेतु काय? गाठ मारण्याच्या व सोडण्याच्या निमित्ताचा विचार करता असें म्हणता येतें कीं–

आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम् ॥
धर्मोहि तेषा अधिको विशेषः धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ॥

या सुभाषितात म्हटल्याप्रमाणें पशुस्वभावाचीं आहार निद्रा मलमूत्र विसर्जन इत्यादि कर्में करताना शेंडी मोकळी असावी व धर्मकर्में करताना शेंडीला गाठ मारलेली असावी

याचें कारण इतकेंच कीं, पशुस्वभाव कर्में केवळ रजोगुणी व तमोगुणी असतात मनावर व मेंदूवर होणारे त्या कर्मांचे अति सूक्ष्म अदृश्य कुसंस्कार, दुष्परिणाम शेंडी सुटी असली कीं त्या केंसातून जास्तींत जास्त निघून जाऊं शकतात मनुष्यत्वाची पूर्णता करण्यास उपयोगी पडणारे मेंदूवर व मनावर होणारे, धर्मकर्मांचे सुसंस्कार, सुपरिणाम, बाहेर जाऊं नयेत, व मार्गी कर्मी जावेत, म्हणून त्या वेळीं केंसाना गाठ मारण्याची जटा असल्या तरी शेंडीच्या केंसाला गाठ मारणें व व सोडणें त्या त्या वेळीं जरूर आहे, हें पूर्वीच सांगितलें आहे शेंडी

पेन्सिली इतकी बारीक असूनहि इष्ट हेतु पूर्णपणे साधणार नाहीं; कारण सर्वभाग तिनें झांकला जात नाहीं. लहान मूल दर तासाला किती उंच किंवा जाडें झालें हें नेत्रांस व इतर इंद्रियांस कळत नाहीं; पण ४।६ महिन्यानीं परिणाम दिसतो. मनावर होणारे परिणाम तर अतिशय सूक्ष्म असतात; त्यांचा परिणाम इंद्रियाना केव्हाच मापता येणार नाहीं. तो अतींद्रियशक्तिसंपन्नासच दिसूं शकतो.

लेडबीटर सारख्या अतींद्रिय द्रष्ट्यानीं प्रयोग केल्यास वरील सिद्धान्त त्यांच्या अनुभवास आल्याशिवाय राहणार नाहीं; व ते परधर्मी लोक सुद्धा शेंडी ठेवूं लागतील। असें सोदाहरण वाटतें.

कान टोंचण्याची पद्धति इंग्लंडांत सुरूं झाली आहे. हिंदु लोकांत बालकांचे कान टोंचतात व तो कर्णवेध नांवाचा संस्कार बारशाच्या दिवशीं करतात. तें पाहून इंग्लिशानीं त्या विषयीं प्रयोग सुरूं केले, तेव्हां त्यांना आढळलें कीं, त्या विशिष्ट ठिकाणीं कान टोंचल्यानें काहीं रोगांची उत्पत्ति होणेंच अशक्य होतें. यामुळें काहीं वर्षांपासून ती प्रथा त्याच्यांत थोडथोडी सुरू झाली आहे; पण बहुधा मोठ्या माणसाचेच टोंचतात. हें टोंचण्याचें काम बहुधा स्त्रिया करतात; जसें आपल्या इकडे सोनार टोंचतात; पण **कान टोंचण्याची फी ५।१० पौंड घेतात!**

पुढील प्रकरणात स्नान व तीर्थें याविषयीं विवरण केलें आहे.

❖ ❖ ❖

प्रकरण १२ वें

# स्नान ( अभ्यंग ) व तीर्थें

> स्नानमूलाः क्रियाः सर्वाः श्रुतिस्मृत्युदिता नृणाम् ।
> तस्मात् स्नानं निषेवेत श्रीपुष्ट्यारोग्यवर्धनम् ॥ (यो याज्ञ.)
> नित्यस्नानं च यः कुर्यात् स. नरः पुरुषोत्तमः ।
> सर्वपापविनिर्मुक्तः नाकलोके महीयते ॥ ( पद्म पु )

स्नान– आघोळ पाण्यानें करणें हें नित्यकर्म आहे, म्हणून सर्व स्त्री-पुरुषादिकांनीं निदान प्रात स्नान तरी केलेंच पाहिजे

अस्नातस्य क्रियाः सर्वाः भवन्ति निष्फलाः यतः ।
प्रातःसमाचरेत् स्नानं तत् च नित्यम् उपस्थितम् ॥ (नागदेव. याज्ञ)

स्नान केल्याशिवाय संध्या, जप, पूजा, होम इत्यादि कर्में करण्याचा अधिकार नाहीं, म्हणून प्रात स्नान हें नित्यकर्म आहे स्नान न करता केलेलें कर्म निष्फळ

प्रातःस्नानाची वेळ–उषःकालीं म्हणजे सूर्योदयापूर्वी पाच घटका (दोन तास ) स्नान करणें तें प्रात स्नान, याला उष स्नानहि म्हणतात. उष कालीं केलें जाणारें म्हणून उष स्नान, व प्रात काळचीं कर्में करण्या-साठीं केलें जाणारें म्हणून प्रात.स्नान

स्नानाचे प्रकारः–नित्य नैमित्तिक व काम्य असे तीन मुख्य प्रकार स्नानाचे आहेत; त्यांत उष कालीं नित्य स्नान करणें सर्वांत श्रेष्ठ आहे उष कालचें स्नान प्राजापत्यतुल्य आहे व महापातकाचा नाश कर-णारें आहे (वृ पारा.) उष स्नानाचे दृष्ट व अदृष्ट (प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष)

लाभ होतात; व तें पुण्यकारक आहे; म्हणून पितर, सज्जन व मुनि सुद्धां त्याची प्रशंसा करतात. (वृ. पारा.)

**स्नानास जल**–देवांनीं उत्पन्न केलेले तलाव, कुंडे व नद्या यांत स्नान करणें उत्तम. हें शक्य नसेल तर कूप, वापी इत्यादींचें स्वतः काढलेलें किंवा स्ववर्णाच्या व्यक्तीनें काढलेल्या पाण्यानें मध्यम; गरम पाण्यानें कनिष्ट.

**निषिद्ध जल**– गवत, पालापाचोळा सांचलेलें, मलिन, गढूळ, मातट; विषारी वनस्पति, फळें, पानें, किंवा अन्य विषारी पदार्थ पडलेलें वापरूं नये. त्यांत किंवा त्यानें स्नान केल्यामुळें अन्तर्बाह्य रोग फार थोड्या काळांत होतात. द्विजेतरांनीं काढलेल्या किंवा आणलेल्या जलानें द्विजांनीं स्नान करूं नये. यावरून इतरांनीहि काय करावें तें कळेल. पात्रांत सांठविलेल्या पावसाच्या पाण्यानें स्नान, आचमन, पान (पिणें) पूजा तर्पण इत्यादि करूं नये. (वाचस्पति). अंत्यजानीं खणलेले कूप, तलाव इत्यादींचें पाणी धर्मकर्मांत, स्नानपानादिकांत वापरावें लागलें तर पंचगव्य घेतल्यानें शुद्धि होते (यम). आपत्कालीं दोष नाहीं, असें वृद्धशातातप वचन आहे. आपत्कालीं पंचगव्य प्राशन नको.

**उष्णोदकस्नान**– गार पाण्याचें स्नान ज्यास सोसत नाहीं त्यानीं गरम पाण्यानें करावें, पण उषःकाल चुकवूं नये (गार्ग्य).

**उष्णोदकस्नाननिषेध**– बारा संक्रान्ति, रविवार, सप्तमी, दुसऱ्यासाठीं प्रतिनिधि म्हणून करावयाचें स्नान, श्राद्धदिवशीं, उपवासदिनीं, अशौचांत, व जन्मदिवस, या दिवशीं व या निमित्तानीं करावयाचें स्नान गरम-उष्ण पाण्यानें करूं नये, गार पाण्यानेंच केलें पाहिजे; तसेंच अस्पृश्य असलेल्या व्यक्तींचा किंवा मद्यमांसादि पदार्थांचा स्पर्श झाल्यामुळें करावयाचें स्नान ब्राह्मणानीं गरम पाण्यानें करूं नये. (वृद्ध मनु; शि. पु.). ग्रहण, अर्धोदयपर्व, गजच्छायापर्व इत्यादिनिमित्त करावयाचें स्नान सर्वांनींच शीतोदकानें केलें पाहिजे. काम्य स्नानेंहि शीतोदकानेंच करणें जरूर आहे.

**स्नान किती वेळां?** गृहस्थ ब्राह्मणानी उष:कालीं व सूर्यास्तापूर्वी सायंकाळीं, असें दोन वेळा करावें. पण सायंस्नान न केल्यास त्यास प्रायश्चित्त नाहीं. ब्रह्मचारी, वानप्रस्थ, संन्यासी आणि तपस्वी गृहस्थ यानीं त्रिकाल स्नान केलें पाहिजे–असें का हें पुढील अनुभवावरून कळेल.

**अनुभव**–वेदपठणानें, जास्त जप, जास्त प्राणायाम इत्यादि साधनानें, योगाभ्यासानें, उपवास, चांद्रायणें, पंचाग्निसाधन इत्यादि तपानें, साधनाबरोबर उष्णता शरीरात वाढत जाते, व गरम पाण्याचें स्नान सोसत नाहींसे होतें; पुढें पुढें तर एक वेळ गार पाण्यानें स्नान करूनहि भागत नाहीं, व ताप, डोकें दुखणें, लघ्वीस लाल होणें किंवा आग होणें इत्यादि विकार त्रास देऊं लागतात व सायकाळीं गार पाण्याचें स्नान सुरू केलें कीं औषधाशिवाय थांबतात असे अनुभव १९३०–३२ च्या काळातले आहेत.

**सायंकाळचा विशेष अनुभव**–नद्या, तलाव यांचें पाणी दिवसभर तापून सूर्यास्ताच्या पूर्वी चांगलें कोमट झालेलें असतें; त्यात बुड्या मारून स्नान करण्यानें, दिवसात आलेला थकवा तत्काळ जातो व उत्साह फार वाढतो. उन्हाळ्यांत तर असें स्नान म्हणजे उन्हाळ्यानें होणाऱ्या दुष्परिणामांवर अमृत! असा अनुभव १९४०–१९५२ च्या बारा वर्षांतला आहे

**आकंठ** (गळ्यापासाली) **स्नान**–कुमारी, सौभाग्यवती स्त्रिया, जटाधारी पुरुष, रोगी, यानीं सशिरस्क (डोक्यावरून) स्नान करण्याची आवश्यकता नाहीं. करूं नये असेंहि नाहीं. यास अपवाद–ग्रहण, संक्रांती इत्यादि निमित्तानें करावयाचें स्नान, गंगादि-महानदीजलात स्नान, तीर्थस्नान, इत्यादि डोक्यावरून केलें पाहिजे. **अनुभव**–दक्षिणेंतील म्हैसुरी, मद्रासी वगैरे स्त्रिया (मुंबईंत राहणाऱ्याहि) गोदावरीतीरीं आल्या कीं पहिलें स्नान डोक्यावरून करतात; असें पुष्कळ मंहिने दिसलें.

**लक्षांत ठेवावें**–जलाशयात स्नान करणें तें स्त्रिया असतील तेथें किंवा नीचाच्या समीप घाणेरड्या ठिकाणीं करूं नये.

**स्नानांत दिशा**–जलाच्या प्रवाहात स्नान करताना प्रवाह ज्या दिशेनें येत असेल त्या दिशेस तोंड करावें. तलावादिकात सूर्याकडे तोंड करावें सूर्योदयापूर्वी पूर्वेस करावें. सूर्यास्तानंतर नित्यस्नान करूं नये. घरीं, घराच्याबाहेर करीत असता घराकडे तोंड करावें, घरात सकाळीं पूर्वेस व सायंकाळीं पश्चिमेस तोंड करावें.

**घरीं स्नानांत विशेष**– मार्जन तर्पणादि व मध्यें आचमन करूं नये. प्रात स्नानाचे वेळीं, स्नान करताना दात घासू नयेत. काष्ठासनावर

किंवा पाषाणासनावर बसून हातपाय धुऊन, तीन चुळा भरून, नंतर देशकालादिकांचा उच्चार करून स्नानाचा संकल्प करावा. जलाशयांत स्नान करण्यापूर्वी मुद्दां संकल्प केला पाहिजे.

संकल्प–मम आत्मनः श्रुतिस्मृति पुराणोक्त-फल-प्राप्त्यर्थं,मम इह जन्मनि कायिक-वाचिक-मानसिक- सांसर्गिक-ज्ञाताऽज्ञात-स्पर्शाऽस्पर्शाऽऽसन-भोजन- शयनादि कर्मसु कृतानां दोषाणां निरसन-द्वारा त्रिविधतापोपशमनार्थं श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शीतोदकेन ( ऊष्णोदकेन ) ( अमुकतीर्थे तडागादि तटे वा ) गृहे प्रातःस्नानं ( मध्यान्हस्नानं, सायंस्नानं ) अहं करिष्ये.

तीर्थप्रार्थना—

आपो नारायणोद्‌भूतास्ता एवास्याऽयनं पुनः ।
तस्मान्नारायणं देवं स्नानकाले स्मराम्यहम् ॥
त्वं राजा सर्वतीर्थानां त्वमेव जगतः पिता ।
याचितं देहि मे तीर्थं तीर्थराज नमोऽस्तु ते ॥
नमामि गंगे तव पादपंकजं सुरासुरैर्वन्दित-दिव्यरूपम् ।
भुक्तिं च मुक्तिं च ददासि नित्यं भावानुसारेण सदा नराणाम् ॥
पुष्कराद्यानि तीर्थानि गंगाद्याः सरितस्तथा ।
आगच्छन्तु पवित्राणि स्नानकाले सदा मम ॥
गंगेच यमुने चैव गोदावरि सरस्वति ! ।
नर्मदे सिंधो कावेरि जलेऽस्मिन् संनिधिं कुरु ॥

( सिंधुकावेरी ' असें म्हणतात तें चूक आहे. )

नदीतलाव वगैरेंत स्नान केल्यावर अंगावरील पाणी हातानीं निपटूं नये किंवा वस्त्रानेंहि पुसूं नये; तसें केल्यास देवता अप्रसन्न होतात. स्नानकालीन ओलें वस्त्र पायांच्या बाजूनें न सोडता बेंबीच्या-वरच्या बाजूनें बाहेर काढून खालीं किंवा पात्रात टाकावें. पायाच्या बाजूनें सोडलें गेल्यास पुन्हा स्नान केलें पाहिजे. ( प्रयो. पा. )

आपत्कालीं स्नान– स्नान करणें अशक्य असेल तर ओल्या वस्त्रानें अंग पुसावें, तें गरम पाण्यात भिजविण्यासहि हरकत नाहीं. टाइफाईड सारख्या तापात डॉक्टर लोक सुद्धा अंग ओल्या वस्त्रानें पुसण्यास सांगतात.

(त्यास स्पन्जिंग म्हणतात), किंवा भस्मस्नान अथवा मानसस्नान करावें अंगाला भस्मधारणविधीनें भस्म लावणें तें भस्मस्नान व विष्णु, राम, शिव इत्यादि आपल्या उपास्य देवतेचें ध्यान करणें तें मानसस्नान इतर बरींच गौणस्नानें आहेत, पण येथें देण्याची जरूरी वाटत नाहीं

**स्नानाभावीं प्रायश्चित्त**–नित्यस्नान न करता भोजन केलें तर एक दिवस निर्जल उपास केला पाहिजे संक्रान्ति-ग्रहण इत्यादिकांच्या पर्वकाळीं करावयाचें स्नान न करता भोजन, जलपान इ केलें तर आठ हजार गायत्रीजप द्विजानीं केला पाहिजे कावळा, कुत्रा, चाण्डाळ, रजस्वला इत्यादींचा स्पर्श झाल्यावर स्नान न करता भोजनादि केलें गेलें तर त्रिरात्रव्रत केलें पाहिजे (घ सिं)

**धोक्याची सूचना**–फार कढत पाण्यानें स्नान करणें व तें कढत पाणी फार घेणें आरोग्यदृष्ट्या हितावह नाहीं त्यानें रक्तवाहिन्यातील रक्त फार तापतें अशुद्ध रक्तवाहिन्यातील रक्त उष्णतेनें फार जोरानें उसळून फार जोरानें रक्ताशयात घुसतें, त्यामुळें निरोगी माणसाचाहि रक्ताशय (हार्ट) अशक्त व दुर्बळ होतो मोठ्या रोगातून बरा झालेल्यास तें (रोगमुक्ति) स्नान घालतात तें तर कोमटच असावें, अन्यथा हृदयक्रिया बंद पडून स्नान घातलें जात असताच मृत्यु आल्याचीं उदाहरणें बरींच पाहिलीं आहेत बाळतिणीचें अंग चांगलें शेकलें पाहिजे या भ्रमानें त्यानाहि फार कढत पाण्यानें स्नान घालतात, त्याचाहि परिणाम वाईटच होतो, चक्कर येणें, डोकें दुखणें इत्यादि घडतें अति कढत पाण्यानें शुद्ध रक्तवाहिन्यातील रक्त फार तापतें व निष्कारण फार घाम येऊन थकवा येतो बर्फासारख्या गार पाण्यात स्नान करणेंहि आरोग्यविघातच 'अति सर्वत्र वर्जयेत' 'अति तिथें माती'.

**प्रात स्नानाचे फायदे**–उष काळीं नित्य नियमानें स्नान केल्यास उत्साह, प्रसन्नता, शक्ति, कीर्ति, कांति, शरीरपुष्टि, सौभाग्य व आयुष्य याची वृद्धि होते (पारा स्मृ), दु ख, शोक, थकवा, ग्लानि, क्रोध व दु स्वप्न याचा नाश होतो, आल्हाद व प्रसन्नता प्राप्त होतात, तप, मेधा, सुख, निरोगीपणा, ओजस्विता याची प्राप्ति होते व अति लोभीपणा नष्ट होतो (पारा स्मृ) क्षुद्रपातकें, प्रतिग्रहदोष, याचा नाश संकल्पादि

विधिपूर्वक नियमानें स्नान केल्यानें होतो. (स्नान = उष काळीं स्नान हें विसरू नये) तीर्थादिकात व नद्यादि जलाशयात स्नान करताना भस्म, गोमय-मृत्तिकास्नान, तिलतर्पण इत्यादि पुष्कळ विधि आहे; तो गु. च. अ ३६।१९८ पासून पुढें पहावा. त्यात ओवींत अग्निस्नान भस्मस्नान असा जो पाठ आहे तो चुकीचा आहे; कारण अग्निस्नान म्हणजेच भस्मस्नान. तेथें 'अग्निस्नान भौमस्नान' असा पाठ पाहिजे, हें टीपातील याज्ञवल्क्य वचनें पाहिल्यानें सहज कळेल (कामत प्रत) प्रकरणारंभीं जो पद्म-पुराण-श्लोक दिला आहे त्यात सांगितलेलें फळ भस्मगोमयमृत्तिकादिस्नानासह जो विस्तृत विधि आहे त्याप्रमाणें स्नान, नित्य नियमानें केल्यानें मिळतें.

अभ्यंगस्नान—

अंगाला, डोक्याला तेल वगैरे लावून स्नान करणें तें अभ्यंगस्नान. स्नान झाल्यावर डोक्याला किंवा अंगाला तेल किंवा तेलतुपासारखें स्निग्ध पदार्थ आजारीपणाशिवाय लावणें आरोग्यादिविनाशक व मलीनतोत्पादक आहे. अभ्यंगस्नान गरम पाण्यानें करावें, गार पाण्यानें करू नये व अभ्यंग स्नान केल्यावर गोपीचंदन व भस्म लावू नये बुक्का, केशर वगैरेचा तिलक लावावा. ब्रह्मचारी, तपस्वी, गृहस्थ व वानप्रस्थ यानीं डोक्यावरील केसाना-जटाना तेल वगैरे लावणें व फणी वगैरेनें विंचरणें अधर्म होय

अभ्यंगनिषेधादि—

रवौ तापं तथा कुर्यात् सोमे कान्तिं लभेत् नरः।
भौमे मृत्युर्लभेताऽथ बुधे लक्ष्मीं लभेत् नरः ॥ १ ॥
गुरौ दरिद्रतां चैव शुक्रे चाऽप्यसुखं भवेत्।
सुखं शनैश्चरे चैव वारादि फलमुत्तमम् ॥ २ ॥ (शि पु)

रवि, मंगळ, गुरु व शुक्र-वारीं अभ्यंगस्नान करू नये, केल्यास ताप, मृत्यु (मृत्युकारक रोग इ.), दारिद्र्य व दुःख प्राप्त होतात. सोमवारीं कान्ति-लाभ, बुधवारीं लक्ष्मीप्राप्ति व शनिवारीं अभ्यंग करण्यानें सुखप्राप्ति होते.

**निषिद्ध वारीं** अभ्यंग-स्नान करणें असल्यास रविवारीं तेलात रुईची फुलें घालून, गुरुवारीं दूर्वा, मंगळवारीं लाल माती, व शुक्रवारीं पाण्यानें थोडे थेंब तेलात मिसळून ठेवून नंतर, तें अंगास लावावें

, **प्रतिदिन अभ्यंग** करणें असेल तर सुवासिक तेल लावण्यास हरकत नाहीं.

अपवाद- श्राद्धदिनीं, ग्रहणस्नानाचे वेळीं, उपवासदिनीं व प्रतिपदेच्या दिवशीं सुवासिक तेलानेंहि अभ्यंग करूं नये; तथापि ग्रहणाशिवाय इतर कोणत्याहि दिवशीं शिरसाचें-मोहरीचें तेल लावून अभ्यंग करण्यास हरकत नाहीं. (शिव पु.) मोहरीचें तेल उष्ण व वातहारक आहे हें विसरूं नये. हें वर्णन ऐच्छिक अभ्यंगाविषयींचें आहे.

शास्त्रानें ज्या दिवशीं अभ्यंगस्नान मुद्दाम करण्यास सांगितलें असेल त्या दिवशीं वरील निषेध लागू नाहींत. उदा. दिवाळींत तीन दिवस अभ्यंगस्नानाचे असतात, त्यांत प्रतिपदाहि आहे, तरी या प्रतिपदेस अभ्यंग करावें. शास्त्रविहित अभ्यंग करण्याच्या वेळीं प्रतिकूल वार असले तर सुगंधी तेल लावावें म्हणजे झालें.

दिशा- अभ्यंग स्नान उत्तरेस किंवा पूर्वेस मुख करून करावें. नित्य, नैमित्तिक काम्य स्नानांत जलमय तीर्थांचें विशेष महत्त्व आहे; हें खरें असलें तरी या तीर्थांपेक्षा अधिक महत्त्वाचीं तीर्थें आहेत; पण तीर्थयात्रा करणारे त्या तीर्थांस फारसें महत्त्व देत असलेले दिसत नाहींत; म्हणून आता त्या तीर्थांचें वर्णन करणें भाग आहे.

## तीर्थानि

शारीरतीर्थें—

यस्य हस्तौ च पादौ च मनश्चैव सुसंयतम् ।
विद्या तपश्च कीर्तिश्च स तीर्थफलमश्नुते ॥ १ ॥
मनो विशुद्धं पुरुषस्य तीर्थं वाचां यमार्श्चेन्द्रियनिग्रहश्च ।
एतानि तीर्थानि शरीरजानि स्वर्गस्य मार्गं प्रतिबोधयन्ति ॥
चित्तं अंतर्गतं दुष्टं तीर्थस्नानात् न शुध्यति ।
शतशोऽथ जलैर्धौतं सुराभांडं इवाऽशुचि ॥ (वाचस्पती अगस्ति)

ज्याचे हात, पाय व मन हीं चांगलीं ताब्यात आहेत, व जो विद्यावान्, तपस्वी व कीर्तिमान् आहे त्याला तीर्थस्नानादिकाचें फल मिळतें. हीं शरीरासंबंधीं (शारीर) तीर्थें आहेत व हीं स्वर्गमार्ग दाखविणारीं-स्वर्गप्राप्तिकारक आहेत. विशुद्ध मन, वाणीचा निग्रह आणि इंद्रियनिग्रह हीं शारीरतीर्थें जलमय तीर्थांपेक्षा फार श्रेष्ठ आहेत; म्हणूनच ज्याचें चित्त, हृदय दुष्ट आहे, नाना दोषांनीं युक्त आहे, त्यानें जरी अनेक तीर्थांत स्नान

केलें तरी तो शुद्ध होत नाहीं. दारू–मदिरा ठेवलेलें भाडें जसें शेंकडों वेळां पाण्यानें धुतलें तरी पवित्र होत नाहीं, तसाच दुष्टचित्त मनुष्य !

**मानसतीर्थें—**

> सत्यं तीर्थं क्षमा तीर्थं तीर्थं इंद्रियनिग्रहः ।
> सर्वभूतदया तीर्थं सर्वत्रार्जवमेव च ॥ १ ॥
> दानं तीर्थं दमः तीर्थं संतोषः तीर्थमुच्यते ।
> ब्रह्मचर्यं परं तीर्थं तीर्थं च प्रियवादिता ॥ २ ॥
> ज्ञानं तीर्थं धृतिस्तीर्थं पुण्यं तीर्थं उदाहृतम् ।
> तीर्थानामपि तत् तीर्थं विशुद्धिः मनसः परा ॥ ३ ॥

सत्य, क्षमा, *अंतरिंद्रिय* (मनाचा) *निग्रह*, सर्वभूतांवर दया, सरलहृदय (ऋजुता), दान, शरीरेंद्रियनिग्रह, संतोष व प्रिय-गोड भाषण, हीं मानसिक तीर्थें आहेत. ब्रह्मचर्य महातीर्थ होय, तसेंच सात्त्विक ज्ञान, सात्त्विक धृति आणि पुण्यकर्में हींहि मानसतीर्थें आहेत; आणि सर्व तीर्थांचें तीर्थ म्हणजे अगदीं शुद्ध झालेलें मन. म्हणूनच एका स्मृतींत म्हटलें आहे कीं—

> न यमं यममित्याहुः आत्मा वै यम उच्यते ।
> आत्मा संयमितो येन तं यमः किं करिष्यति ॥

यमाला, यमराजाला यम नाहीं म्हटलें, मन म्हणजेच यम, यमराज ! ज्यानें आपलें मन उत्तम प्रकारें ताब्यांत ठेवलें आहे त्याला तो यमराज *यम काय करणार !*

> मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः
> बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम् ॥ (श्रुति)

*यावरून ठरतें कीं शौच, आचमन, स्नानादि शास्त्रोक्त कर्मं करणाऱ्या* प्रत्येक मनुष्यानें-मनुष्यमात्रानें या सर्व तीर्थांची प्राप्ति करून घेणें म्हणजेच मानवधर्माची पूर्तता करणें आहे **आरंभीं दिलेल्या मानवधर्माशीं तुलना करून पाहावी.**

स्नानानंतर वस्त्र नेसावयाचें असतें म्हणून आतां त्या विषयींचे विधि-निषेध सांगणें जरूर आहे

♡ ♡ ♡

प्रकरण १३ वें

# स्नानानंतर वस्त्रधारण

स्वच्छ, वाळलेलें, ओलें नसलेलें, शुभ्र वर्णाचें धूतवस्त्र ब्राह्मणानीं नेसावें. डाव्या कुशीला व बेंबीजवळ खोचलेलें असावें व पाठीजवळ कासोटा घातलेला असावा, याला त्रिकच्छ युक्त नेसणें म्हणतात.

अहत वस्त्र असावें—आठ हात तरी लांब, न फाटलेलें, मुरड न घातलेलें, गाठी न मारलेलें दोन्ही बाजूस दशा असलेलें असावें यास अहत वस्त्र म्हणतात. दुसऱ्यानीं वापरलेलें नसावें. आचमनादि धर्मकर्मांत वापरावयाचीं वस्त्रें स्वतः धुतलेलीं असावीं, स्त्रियानीं, धोब्यानीं वगैरे धुतलेलीं वापरू नयेत (मनु, याज्ञ, नागदेव इ) नेसतांना धूतवस्त्र तीन वेळा झटकून उत्तर किंवा पूर्व दिशेस त्याचा पदर पसरून उलगडून नेसावें. चुकून दक्षिणेस किंवा पश्चिमेस पसरलें-उलगडलें गेल्यास तें पुन्हा धुऊन वाळविल्याशिवाय नेसू नये (शातातप)

उपवस्त्र-(उपरणें) आचमनादि सर्व धर्मकर्मांत व भोजनाचे वेळींहि उपवस्त्र अंगावर घेतलें पाहिजे (वि पु) उजवा बाहू उपवस्त्राच्या बाहेर राहिला पाहिजे, व तें डोक्यावरून पांघरू नये उपवस्त्र नसेल तर नेसलेल्या वस्त्राचा सोगा, उत्तरभाग, डाव्या बाजूनें अंगावर घ्यावा. कापसाचीं धूतवस्त्रें नसलीं तर रेशमी, तागाचीं, लोकरीचीं अहत वस्त्रें धारण करावीं. सोनाचादि स्पर्श झाला तरी लोकरीनें वस्त्र अशुद्ध होत नाहीं. हीं वस्त्रें सुद्धां अगदीं स्वच्छ, निर्मळ पाहिजेत आचारसंपन्न समजल्या जाणाऱ्या मंडळींत पुष्कळ वेळा असें दिसतें कीं, लोकरीच्या पासोड्या, मुकटे इत्यादि वस्त्रें इतकीं मळीन, घाणेरडीं, कुरकुटलेलीं,

असतात कीं पाहणारास किळस येतो! असें नसावें तीं वस्त्रें सुद्धा कुबट घाण येणारीं, धुरकटलेलीं वगैरे प्रकारचीं नसावीं

एक उदा० (शके १८८३ मधील) एक ६९।७० वर्षांचे ब्रह्मचारी जपानुष्ठानाच्या तयारीस लागले त्याचीं बहुतेक सर्वच वस्त्रें घाणेरडीं, फाटकीं, ठिगळें दिलेलीं, गाठी मारलेली, शिवणी घातलेलीं व इतकीं मलीन कीं पाहताच किळस येई! धावळी तर अशी होती कीं लोकरीची आहे हें ओळखणें सुद्धा कठिण! त्या धावळीपेक्षा दुकानातील धान्याच्या गोणी, सिमेंटचीं एक वर्षभर वापरलेलीं वाटेल तिथें पडलेलीं जुनीं पोतीं अधिक स्वच्छ ठरलीं असतीं! त्याना सूचना दिल्यावर त्यानीं ती धावळी साबु वगैरे लावून धुतली तरी स्वच्छ झाली नाहीं, तेव्हा काहीं दिवसानीं **पुन्हा साबू सोडा लावून धुतली,** आणि त्यानीं कळविलें कीं ती **नेसल्यावर अपूर्व प्रसन्नता प्राप्त झाली** स्वच्छ वस्त्रें का पाहिजत हें निराळें सागण्याची आता आवश्यकता नाहीं

**स्पर्श दोष-** रेशमी तागाच्या वगैरे वस्त्रास कावळा, कुत्रा इत्यादींचा स्पर्श तीं नेसण्यापूर्वी झाला तर दर्भांनीं पाणी शिंपडल्यानें तीं शुद्ध होतात, पण कार्पास वस्त्रें पुन्हा धुतलीं तरच शुद्ध होतात

**कटिसूत्र कौपीन-** लगोटी नेसून गृहस्थानें केलेलें सर्व कर्म निष्फळ ठरतें (यो० याज्ञ) ब्रह्मचारी, वानप्रस्थ व सन्यासी यानीं कटिसूत्र कौपीन वापरावें

बाप व वडील भाऊ ह्यात असणारानीं उपवस्त्र वापरू नये कावेनें रगविलेलीं वस्त्रें गृहस्थानीं वापरू नयेत दुहेरी किंवा बिनकाष्टयाचें, नेसून केलेलें व उपवस्त्राशिवाय केलेलें कर्म न केल्यासारखेंच

क्षत्रियानीं तांबुस रगाचीं, वैश्यानीं पिवळीं, व द्विजेतर पुरुषानीं नीळसर वर्णाचीं वस्त्रें धर्मकर्मात वापरावीं

स्नान करुन वस्त्रें धारण केल्यावर पवित्रक घालावयाचें असतें म्हणून त्याविषयीं पुढील प्रकरणात वर्णन आहे

* * *

प्रकरण १४ वें

# पवित्र ( पवित्रक )-धारण

**सपवित्रेण हस्तेन कुर्यात् आचमनादिकम् ॥ ( स्मृति )**

पवित्र ( पवित्रक ) हातात घालून आचमनादि कर्में केली पाहिजेत शास्त्रकथित धर्मकर्मे करताना चारी वर्णांच्या पुरुषानीं पवित्रक हातात घातलें पाहिजे

**धारणस्थान**–उजव्या अनामिकेच्या मधल्या पेरावर सोन्याचें किंवा दर्भांचें पवित्रक घालावें चांदीचें पवित्रक उजव्या तर्जनींत घालावें, पण ज्याचा जनक (बाप) जिवत असेल किंवा वडील भाऊ जिवत असेल त्यानीं चांदीचें वापर नये तांब्याचें अनामिकेंत व त्रिशक्तिपवित्रक ( आगठी ) तर्जनींत दहा भाग सोनें, बारा भाग तांबें व सोळा भाग चांदी, यांचें मिश्रण करून केलेल्या आगठीला त्रिशक्तिमुद्रा म्हणतात, ती '**तीव्रदारिद्र्य-नाशिनी**' आहे सुवर्णादि धातूचें पवित्रक ८० गुंजापेक्षा कमी वजनाचें नसावें सव्वा तोळ्याचें करण्याचा रिवाज आहे सोन्याची आगठी चालणार नाहीं सोनें गुरुपुष्ययोगावर घेऊन, गुरुपुष्ययोगात बनविलेलें सोन्याचें पवित्रक फार उत्तम त्रिधातूची तार निघत नाहीं म्हणून मुद्रा आगठी

**भोजनकाळीं उजव्या हातांत पवित्रक पाहिजेच** दर्भांचें पवित्रक उच्छिष्ट होतें म्हणून जेवून हात धुतल्यावर तें काढून सोडून टाकावें सोन्याची वगैरे उच्छिष्ट (उष्टीं) होत नाहीत पद्धति मात्र उलटी दिसते। सोन्याचें पवित्रक जेवणापूर्वी डाव्या हाताात घालतात केवळ डाव्या

हातात पवित्रक घालणें अगदीं निषिद्ध आहे तसें घालून आचमन करणें म्हणजे रुधिर (रक्त) प्राशन करण्यासारखें आहे भोजनात प्राणाहुतीच्या आधी व भोजनसमाप्तीच्या वेळीं ११ वेळा आचमन-करावें लागतेंच

दोन्ही हातात पवित्रक घालून आचमन करणें सोमपानासारखें आहे, व भोजन सोमयाग-फलदायक आहे (हारीत इ )

**दर्भसंख्या**–डाव्या हातात तीन व उजव्यात चार, दर्भांचें ब्राह्मणानीं घालावें, किंवा सर्वांनीं २।२ दर्भांचें घालावें (मार्कण्डेय) ब्राह्मणानीं सात, क्षत्रियानीं पाच, वैश्यानीं चार व इतरानीं आणि आतुरानीं २ दर्भांचें घालावें (गरुड पु )

**गळून पडल्यास प्रायश्चित्त**–हातातून पवित्रक गळून पडल्याचें कळताच तीन प्राणायाम करावे व नतर स्नान करून अघमर्षणसूक्ताचा त्रिवार जप करावा (रत्नावलि)

**पवित्रक त्यागविधि**–सर्व कर्म सपल्यावर पवित्रक काढून त्याची गाठ सोडून मग विसर्जन करावें ते दर्भ पुन्हा वापरू नयेत घातलेलें पवित्रक काढल्यास पुन्हा तें घालू नये, विसर्जन करावें

**पवित्रकास दर्भ**–कुश जातीचे दर्भ उत्तम त्याना फुलें किंवा तुरे येत नाहींत ते महाराष्ट्रात फार दुर्मिळ आहेत सातार्‍यात व खेड (जि पुणें) येथें दोघा ब्राह्मणाकडे आहेत कुशाच्या ऐवजीं काश वापरावे याना मोठाले तुरे येतात, हे महाराष्ट्रात सर्वत्र आहेत काशादि न मिळाले तर गहू, साळी (भात), देवभात, मोळ (मुज गवत) यव (सातु) वाळा किंवा लव्हाळा यांच्या पात्या वापराव्या, मधले दांडे काड्या काढून टाकाव्या, काशाच्यादि पत्र पात्यान घ्याव्यात

लाब किती–पवित्रकास व मार्जनादिकास टीचभर (प्रादेशमात्र) लाब व साग्र असावेत मोऱ्यात वर्तुल ग्रंथि आणि इतरत्र ब्रह्मग्रंथि.

निषिद्ध दर्भ–द्विजेतरानीं आणलेले किंवा विकत घेतलेले ब्राह्मणानीं वापरू नयेत समत्र काढलेले असावेत अग्र नसलेले, चिरलेले, गाभा काढून न टाकलेले, नखानीं तोडलेले, रस्त्यात पडलेले, यज्ञभूमीत पडलेले, पिंडाच्या वगैरे खालीं वापरलेले, मलमूत्रादींचा स्पर्श झालेले,

महायज्ञात, तर्पणात वापरलेले, पाण्यात उकळलेले, अग्नीचा स्पर्श झालेले, किंवा थोडे जळलेले, काढून टाकलेल्या पवित्रकाचे, दर्भादि वापरू नयेत

**कुशादि आणणें**– ज्याचे त्यानें रोजच्या रोज आणणें उत्तम रोज शक्य नसेल तर प्रत्येक महिन्याच्या दर्श अमावास्येस आणून त्यातील महिनाभरच वापरावे हेंहि शक्य नसेल तर श्रावणातील दर्श-अमावास्येच्या दिवशीं आणावे अमावास्येच्या प्रारभींच्या १८ घटकाच्या काळात व २४ नतरच्या काळात काढावे रात्रीं काढू नयेत श्रावण-अमावास्येच्या दिवशीं आणलेले एक वर्ष वापरावे

**कुशादि आणण्याचा विधि**– शुद्ध भूमीवर, शुचिर्भूतपणें, पूर्वेस किंवा उत्तरेस तोंड करून, उभ्यानें किंवा बसून द्विजानीं ओंकाराचा व इतरानीं हरिनामाचा उच्चार करीत कुशादिकास स्पर्श करावा व

'विरचिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज ।
नुद सर्वाणि पापानि कुश स्वस्तिकरो भव'

या मत्रानें द्विजानीं प्रार्थना करावी व 'हुफट्' मत्र उच्चारीत चरकन कापावे, शस्त्र वारवार दर्भावर घालू नये दर्भ कापताना जानवें सव्य असावें मृताच्या उत्तरक्रियेसाठीं व पितृकार्यासाठीं दक्षिणेस मुख करून अपसव्यानें कापावे द्विजेतरानीं 'हर सर्वाणि पापानि दर्भ कल्याणकृत् भव' म्हणून प्रार्थना करावी व 'रुद्राय नमः' म्हणत कापावे

पवित्रकाला गाठ द्विजानीं प्रणवानें व इतरानीं हरिनामोच्चारानें मारावी

पुढील प्रकरणात मृत्तिका भस्मधारणाविषयी माहिती दिली आहे

* * *

प्रकरण १५ वें

# मृत्तिका भस्मादि पुण्ड्र-धारण

स्नात्वा पुण्ड्रं मृदा कुर्यात् (पादौ) प्रक्षाल्यैव तु भस्मना ।
देवानभ्यर्च्य गन्धेन जलमध्ये जलेन तु ॥ (प्रयोग पारि.)
सर्वे शाक्ताः द्विजाः प्रोक्ताः न शैवा न च वैष्णवाः ।
गायत्रीं वेदजननीं आदिशक्तिमुपासते ॥ (विश्व. सं.)

स्नान झाल्यावर मातीनें (ऊर्ध्व) पुण्ड्र लावावे व पाय धुऊन भस्मानें त्रिपुण्ड्र-धारण करावें. देवपूजा झाल्यावर, राहिलेल्या गंधानें व जलांत जलानेंच पुण्ड्रधारण करावें. सगळे द्विज शाक्त शक्ति-उपासक आहेत; कोणी शैव नाहींत वा कोणी वैष्णव नाहींत; कारण वेदजननी गायत्रीची उपासना सर्वच द्विजाना करावी लागत. कारण गायत्रीचा उपदेश झाल्याशिवाय द्विजत्व प्राप्त होत नाही. याच अर्थाचा श्लोक दे. भागवतांत आहे.

स्मृतिसुद्धां हेंच सांगतात कीं, द्विजांनीं व इतर सर्व स्त्रीपुरुष, कन्या इत्यादिकांनीं स्नानानंतर भस्म लावलेंच पाहिजे; पण स्वतःस वैष्णव म्हणविणारे भस्म लावणाराचा द्वेष करतात आणि शैव म्हणविणारे वैष्णवाचा व वैष्णवचिन्हें धारण करणाराचा द्वेष करतात हें भक्तीच्या अभावाचें लक्षण आहे. 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' (भ. गी.)

कोणाहि जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ।
नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।

असें स्मृति व संत म्हणतात. यासाठींच स्मृति, पुराण व इतर धर्मग्रंथ म्हणतात कीं, मृत्तिका व भस्म मुद्रा धारण केलें पाहिजे. धर्मसिंधूंत मुद्रा आधीं मृत्तिका व नंतर भस्म लावण्यास सांगितलें आहे.

आदौ मृद् धारणं कुर्यात् भस्मना च ततः परम् ।
उभयं चंदनेनैव अभ्यंगोत्सवरात्रिषु ॥ ( कात्यायन )

स्नान व वस्त्रधारण झाल्यानंतर गोपीचंदनादि मृत्तिका व नंतर भस्म धारण करावें अभ्यंगस्नानानंतर, (विवाहादि) उत्सवांत व रात्रीं चंदनानें दोन्ही प्रकारचे पुंड्र (तिलक) लावावे, पण देवपूजेपूर्वी चंदन लावू नये म्हणून पिंजर, केशर इत्यादींनीं लावावे

**पुंड्र प्रकार**–उर्ध्वपुंड्र = उभे तिलक व त्रिपुंड्र = आडवे तिलक तीन किंवा दोन उभ्या रेषा निघतील अशा रीतीनें भ्रूमध्यापासून केसापर्यंत मृत्तिकादि लावणें तो ऊर्ध्वपुंड्र, व तीन आडव्या रेषा निघतील असा लावणें तो त्रिपुंड्र ऊर्ध्वपुंड्र भस्मानें व त्रिपुंड्र मृत्तिकेनें लावल्यास नरकांत जावें लागतें (विश्वा स व इतर)

**पुंड्रांतील रहस्य व बोध**– पुंड्राच्या तीन रेषा म्हणजे प्रणवाच्या अकार, उकार व मकार या तीन मात्रा, त्रिदेव, त्रिगुण, त्रिलोक इत्यादि सर्व द्वैत होय व मध्यें जो टिळा लावावयाचा तो अर्धमात्रा होय याप्रमाणें पुंड्र (तीन रेषांचा) प्रणवात्मक, ब्रह्मस्वरूप आहे व त्याच्याकडे पाहिल्यास सर्वव्यापक अधिष्ठानचैतन्याची आठवण देणारा आहे कोणी ऊर्ध्वपुंड्र नाकाच्या शेंड्यापासून लावतात त्यास कोठें आधार सापडला नाहीं।

दोन्ही प्रकारचे पुंड्र आवश्यक म्हणून सांगण्यांत शास्त्राचा हा हेतु स्पष्ट दिसतो कीं, श्रुतिस्मृतिपुराणांनीं सांगितलेला शिव विष्णु अभेद विसरला जाऊ नये, आणि द्वेषमत्सर, सांप्रदायिक वृथाभिमान वाढू नयेत आणि 'जें जें दिसे भूत । तें तें मानिजे भगवंत' 'विष्णुमय जग' हें मर्म दृष्टि आड होऊं नये व मिथ्याचार, बाह्यावडंबर वाढू नयेत शिखाबंधनांत व प्राणायामांत, त्रिकालसंध्याच्या वर्णनांत व द्विदेवतावंदनांत सुद्धा हाच हेतु स्पष्ट दिसतो, मुख्य गायत्रीच्या ध्यानांतहि तोच आहे, पण लक्षांत कोण घेतो?

**मृत्तिका कोणती?** गोपीचन्दन, तुलसीच्या खालची माती, गंगादि महा नद्यांच्या तीरावरील माती, किंवा वारुळाची माती वापरावी (धर्मसिंधु)

**भस्म**–ब्रह्मचाऱ्यांनीं समिधांच्या अग्नीचें इतर द्विजांनीं अग्निहोत्राचें किंवा विरजाहोमाचें वापरणें उत्तम स्मार्ताग्नीचें मध्यम शूद्रांनीं विप्रांच्या स्वयपाकाग्नीचें व इतरांनीं दावाग्नीचें वापरावें हें भस्म सुद्धा

जमिनीचा-भूमीचा-स्पर्श न झालेल्या गोमयाचें असलें पाहिजे व ते गोळे सुद्धां भूमीचा स्पर्श न होतां वाळवलेले पाहिजेत.

भस्म धारण फल–

श्राद्धे होमे जपे यज्ञे वैश्वदेवे सुरार्चने ।
धृतत्रिपुण्ड्रः पूतात्मा मृत्युं जयति मानवः ॥
संध्या दानं जपो होमः स्वाध्यायः देवतार्चनम् ।
ऊर्ध्वपुंड्रं विना कर्म निष्फलं स्यात् इति स्मृतिः (कात्यायन)
सितेन भस्मना कुर्यात् त्रिसंध्यं च त्रिपुंड्रकम् ।
सर्वपापविनिर्मुक्तः शिवेन सह मोदते ॥ (भविष्य पु.)
सत्यं शौचं जपो होमः तीर्थ-देवादि पूजनम् ।
तस्य व्यर्थमिदं सर्वं यः त्रिपुण्ड्रं न धारयेत् ॥
इतकीं वचनें पुरेत.

ऊर्ध्वपुंड्र व त्रिपुंड्र न लावतां केलेलें कोणतेंहि श्रुति-स्मृतिपुराणोक्त कर्म निष्फल ठरतें. दोन्ही लावून स्वकर्म केल्यानें सर्वपापविनाश होतो. पापविनाशानें द्वंद्वमोहनाश होऊन ज्ञानप्राप्ति होते. ज्ञानानें मोक्ष मिळतो. म्हणजेच मृत्यूला जिंकतां येतें. 'मृत्युं जयति.' लक्षात ठेवावें कीं दोन्ही प्रकारच्या पुण्ड्रांची आवश्यकता अन्वय व व्यतिरेक अशा दोन्ही पद्धतींनीं धर्मशास्त्रानें स्पष्ट सांगितली आहे.

भस्मजाबालोपनिषदांत म्हटलें आहे कीं, जलस्नानाऐवजीं आपत्कालीं गौण स्नान चालतें. नैमित्तिक स्नान पुत्रादि प्रतिनिधिद्वारां चालतें; आचमन जलाभावीं दक्षिण कर्णस्पर्शानें होऊं शकतें; गायत्रीजप पुत्र-ब्राह्मणादि प्रतिनिधिद्वारां चालतो; पण भस्मधारणास पर्याय नाहीं किंवा प्रतिनिधिद्वारां चालत नाहीं! यावरून भस्मधारणाचें महत्त्व कळेल.

भस्मधारण विधि–

मध्यान्हापर्यंत जलमिश्रित करून, मध्यान्ह स्नानानंतर चंदनमिश्रित करून व मध्यान्हानंतर कोरडें लावावें (प्रयोग पारि०; पारस्कर सूत्र, स्मृति रत्नावलि ६०). संन्याशांनीं नेहमीच कोरडें लावावें.

कसें लावावें– आंगठा व करंगळी सोडून मधल्या तीन बोटांनीं डावी कडून उजवीकडे (मध्यापासून आरंभ करून) व नंतर त्याच तीन बोटांनीं

उजवीकडून डावीकडे सर्व कपाळावर लावावें, तीन रेषा स्पष्ट उठल्या पाहिजेत दुसरा प्रकार– अनामिका व मध्यमा यानीं कपाळाच्या डाव्या बाजूपासून उजवीकडे भिवयाच्या वरच्या बाजूस एक व केसाच्या खालच्या बाजूस एक अशा दूर दूर दोन रेषा काढाव्या व मग आगठ्याच्या पुढल्या पेरानें त्या दोन रेषाच्या मधें उजवीकडून डावीकडे रेषा काढावी

**स्थानें**– कपाळ, हृदय (दोन्ही बाजू), नाभि, गळा, खादे, बाहुसधि व मस्तक या क्रमानें मधल्या तीन बोटानीं लावावें (स्मृ रत्ना ) कोणी मनगटावर व पायावरहि लावतात

**प्रमाण**– फार थाखूड आयुष्य हानिकारक, व फार लाब तपाचा नाश करणारें ब्राह्मणानीं सहा अगुळें, क्षत्रियानीं चार अगुळें, वैश्यानीं दोन अगुळें, व इतरानीं एक अगुळ लाबीचे त्रिपुड्र लावावे या बाबतींत मतभेद आढळले स्यात ब्राह्मणानीं कपाळ जेवढें लाब असेल तेवढें लाब लावावे हें एक मत आहे

**मंत्र**– द्विजानीं 'अग्निरिति' मत्रानें अभिमत्रित केलेलें, (इतरानीं रुद्राय नम मत्रानें,) भस्म शिवपडक्षर किंवा शिवपचाक्षर (शिवाय नम ) मत्रानें किंवा अष्टाक्षर नारायण मत्रानें किंवा गायत्रीनें लावावें सन्याशानीं प्रणवानें लावावें द्विजेतरानीं 'शिवाय नम ' 'नारायणाय नम ' आदिशक्तये नम ' यानीं इच्छानुसार लावावें (पुलस्त्य )

**मंत्रानुसार फलभेद**– शिवमत्राने शिवलोकीं श्रेष्ठता मिळते, नारायण मत्रानें विष्णुलोकप्राप्ति गायत्रीनें व आदिशक्तिमत्रानें सूर्यलोक व देवीलोक प्राप्ति होते प्रणवानें ब्रह्मरूपता प्राप्त होते (धर्म सिं ) पण वानप्रस्थ, द्विज व सन्यासी याशिवाय इतरानीं प्रणवानें लावू नये असें का याचा उलगडा गायत्रीजपप्रकरणात केला आहे.

या विविधतेवरून ठरतें कीं, भस्म लावणें जरी आवश्यक ठरविलें आहे तरी तें केवळ शैवलक्षण नाहीं शैव, वैष्णव, शाक्त, सौर इत्यादिकाना उपासनाभेदाप्रमाणें रुचिस्वातत्र्य दिलें आहे यावरून सहज ठरतें कीं, गाणपत्यानीं गणेश मत्रानें, देवीभक्तानीं आपल्या देवीच्या मत्रानें लावावें, पण भस्म सर्वांनीं लावलेंच पाहिजे

**प्रायश्चित्त**-एकदाहि चुकून भस्मधारण केलें नाहीं तर ब्राह्मणानीं एक दिवस निर्जल उपोषण आणि पाण्यात उभ्यानें १०८ गायत्री जप, सन्याशाना तसाच एक दिवस उपास व १२ हजार प्रणवजप, असें प्राय श्चित्त केलें पाहिजे (भस्मजाबालोपनिषद्, देवी भाग)

**भस्मोध्दूलन**- पूर्वी सांगितल्या प्रमाणें भस्माचें अभिमंत्रण केल्यावर, (कपाळावर वगैरे लावण्यापूर्वी) भस्मोध्दूलन केलें पाहिजे ओलें किंवा कोरडें भस्म डोक्यापासून पायापर्यंत सर्वांगास लावणें हें मुख्य भस्मोध्दूलन ओलें किंवा कोरडें भस्म मस्तकापासून पायापर्यंत शिंपडणें हा त्याचा संक्षिप्त प्रकार होय भस्मोध्दूलन करून मग बोटानीं कपाळ वगैरे भागीं लावावें भस्मधारणप्रयोगात आवश्यक तेवढ्या मंत्राचा अर्थ दिला आहे

**आश्रमानुसार फल-**

*यतीना ज्ञानदं प्रोक्तं वनस्थानां विरक्तिदम् ।*
**गृहस्थानां मुने तद्वत धर्मवृद्धिकरं तथा ॥१॥**
**ब्रह्मचर्याश्रमस्थाना स्वाध्यायप्रदमेव च ।**
**शूद्राणां पुण्यदं नित्यं अन्येषां पापनाशनम् ॥ २॥**
(दे भा स्क ११।१३)

या पुढील पाच श्लोकात भस्मोध्दूलन व त्रिपुड्रधारण वैदिक श्रुतींनीं सर्वांस अत्यंत आवश्यक म्हणून सांगितलें आहे, व त्या प्रत्येकात 'विधत्ते वैदिकी श्रुति' असा उल्लेख आहे तेरावा व चौदावा हे दोन अध्याय मुद्दाम पाहावे स्नानानंतर ओल्या सर्वांगावर भस्मलेपन-भस्मोध्दूलन करण्यानें शेंकडो वातरोग, पित्तरोग व कफरोग बरे होतात असे अध्याय १४।२०।११ मध्यें सांगितलें आहे स्वत घेतलेल्या अल्पशा अनुभवानें खात्री वाटते कीं, यानें रोग बरे होतील

**भस्म म्हणजे काय?** भस्म, भसित, भूति व रक्षा अशीं नावें आहेत

(१) **भस्म**- भस् दीप्तौ भस्यते, दीप्यते अनेन इति भस्म 'दीप्यते, क्रीडते यस्मात् रोचते द्योतते, दिवि' म्हणून (दीप्ति =) जी सत्ता जड-वस्तूना चेतन करते, क्रीडा चेष्टा क्रिया करण्यास समर्थ बनविते, जिच्यामुळें उज्वलता प्रकाश तेज प्रगट होतात, तिला दीप्ति म्हणजे ब्रह्मज्योति

म्हणतात हीच ज्योति सर्व जडभावमय जगाला द्योतित, संवर्धित करते व शेवटीं त्याचा संहार करते ही सत्ता म्हणजेच ब्रह्म, म्हणून भस्म = ब्रह्म 'अग्निरिति ' या मन्त्राचा अर्थ हेंच सांगतो कीं भस्म म्हणजे सर्व जगाचें अधिष्ठान असणारें ब्रह्म बाकीचे अर्थ.–

> भासनात् भसितं प्रोक्तं, भस्म कल्मषभक्षणात् ।
> भूतिर्भूतिकरी पुंसां रक्षा रक्षाकरी तथा ॥
> त्रिपुण्ड्रधारणं दृष्ट्वा भूतप्रेतपुरःसराः ।
> भीताः प्रकंपिताः शीघ्रं नश्यन्त्येव न संशयः ॥
> (दे भा ११।१४, ३२-३४)

सत्त्वगुणाचा प्रकाश पाडणारें म्हणून भसित. दोष, पातकें भक्षण करतें म्हणून भस्म, विविध ऐश्वर्य देतें म्हणून भूति, आणि रक्षण करतें म्हणून त्याला रक्षा म्हणतात भस्मत्रिपुंड्र पाहून भूतप्रेतादिक भयभीत होऊन त्वरेनें पळून जातात यांत मुळींच संशय नाहीं, असें नारायणानें नारद मुनीस सांगितलें आहे

शास्त्रोक्त शुद्ध भस्म दुर्लभ झालें आहे अग्निहोत्राचें व स्मार्ताग्नीचें जें कष्टानीं मिळतें तेंहि अगदीं शास्त्रशुद्ध नसतें, आणि तें सुद्धा कांहीं वर्षांनीं मिळणार नाहीं विरजाहोमाचें मिळवतां येईल, पण त्यासाठीं याज्ञिक पुरोहिताची मदत लागेल, व तेहि दुर्लभ झाले आहेत, व पुढें कलिकाल-प्रभावानें फारच दुर्लभ होतील, हें जाणूनच जणू दे भा ११।११ मध्यें एक अगदीं साधा, विन खर्चाचा व प्रत्येक द्विजास सहज करतां येईल असा विधि दिला आहे भस्मजाबालोपनिषदांतहि आहे एक विधि, पण तो इतका सोपा नाहीं; म्हणून दे भा मधील विधि पुढें दिला आहे

भस्मोत्पादनाचा अगदीं सोपा विधि—

स्नान करून, पवित्रक घालून मृत्तिकाभस्म धारण करून गायींच्या समुदायाजवळ जावें व त्यास नमस्कार करावा जमिनीवर भूमीवर पडूं न देता गोमय धरून तें शुद्ध पात्रांत किंवा पळसाच्या पत्रावळी वगैरेंवर ठेवावे मग द्विजानें शिवपडक्षर 'ओं नमः शिवाय' मन्त्रानें त्याचे मोठ्या लाडवा एवढाले अगदीं घट्ट गोळ करावे व ते शुद्ध पात्र, काष्ठासन (पाट)

इत्यादींवर ठेवून उन्हांत पक्के वाळवावे व त्यांवर पुन्हां तशाच प्रकारें जमविलेल्या शुद्ध गोमयाचीं २।३ पुटें द्यावीं; हें करण्यात भूमीचा किंवा पाषाणाचा स्पर्श होऊं देऊं नये. गोळ्याच्या प्रमाणाच्या दुप्पट मोठें असें कुंड (खाडा) जमिनींत करून तें शुद्ध गोमयानें लिंपून-सारवून, त्यात ते गोळे घालावे व अग्निहोत्र्याकडील अग्नीनें, तो न मिळाल्यास चकमकीनें किंवा सूर्यभिंगानें अग्नि पाडून तो शिवषडक्षर मंत्रानें त्या गोळ्याच्या वर ठेवून प्रज्वलित करावा. अग्नि विझणार नाहीं अशी खात्री झाल्यावर, तें कुंड भाताचा (साळींचा) तुस शीग लागेल इतका ओतून भरावें, किंवा ज्वारीच्या वगैरे खळ्यातील भुसा तसाच भरून, चांगला दाबून ठेवावा. १।२ दिवसानीं कुंडातील अग्नि शांत झाला आहे अशी खात्री झाल्यावर भुशाची राख हळूच बाजूस सारून, अगदीं हलक्या हातानें पेटून शांत झालेले ते गोळे काढून कोऱ्या-नव्या शुद्ध पात्रात (मडकें उत्तम) शिवषडक्षर मंत्रानें भस्म भरावें. त्या मडक्यात केवड्याच्या पात्या, चंदन, वाळा, कापूर, केशर इत्यादि सुगंधी द्रव्यें घालून तें चांगलें झाकून, शुद्ध स्थळीं ठेवावें.

घरीं गायी नसतील तर शुद्धपात्र घेऊन गुराख्याबरोबर गायींच्या मागो माग जावें, व त्या हागतील तेव्हा त्यातच गोमय धरावें. गुराख्यास योग्य किंमत द्यावी. शहरात गोशाळेंत मिळूं शकेल.

इच्छा असल्यावर कोणाहि द्विजाला याप्रमाणें अगदीं शुद्ध, शास्त्रोक्त शुभ्र, सुवासिक भस्म सहज वापरता येईल. शहरातहि साधेल.

भस्मधारणानंतर आचमन, प्राणायाम याचा क्रम आहे. आचमना-विषयीं पूर्वीच लिहिलें आहे; म्हणून पुढील प्रकरणात प्राणायामाविषयीं माहिती दिली आहे.

* * *

प्रकरण १६ वें

# प्राणायाम

> जलबिन्दु कुशाग्रेन मासि मासि पिबेत् तु यः।
> संवत्सरशतं साग्रं प्राणायामश्च तत्समः॥ (मद पारि श्रुति )
> प्राणायामैर्विना यद यत् कृतं कर्म निरर्थकम् ॥
> अतो यत्नेन कर्तव्यः प्राणायामः शुभार्थिना ॥ ( अगस्त्य स )

प्राणायाम हें सर्व धार्मिक कर्मांतील एक फार महत्त्वाचें अग आहे हें नित्यकर्म आहे प्राणाचें कार्य अव्यवस्थित होण्यामुळें व प्राणशक्तीचा अपव्यय होत गेल्यानें पुष्कळाना रोगाची व अकालमृत्यूची शिकार बनावें लागतें तरीसुद्धा हें कर्म बहुधा कोणी व्यवस्थित करीत नाहींत नुसता कानाना व नाकाला हात लावतात।

**प्राणायाम –**

'*प्राण• स्वदेहजो वायु• तस्य आयाम• निरोधनम्*' (*अग्नि पु* )

प्राण म्हणजे आपल्या देहांतील देहात उत्पन्न होणारा वायु, त्याचा आयाम म्हणजे निरोध व विस्तार ज्या कार्यानें होतो किंवा केला जातो त्याला प्राणायाम म्हणतात प्राणाच्या क्रिया अनियन्त्रित, अव्यवस्थित होऊ लागल्या कीं शरीर, त्यातील विविध इन्द्रियें व अवयव दुर्बल होतात व आपापलीं कार्यें त्याना नीट करता येत नाहींत व त्यामुळें रोग होतात प्राणायामानें फुप्फुसें रक्ताशय, ज्ञानतंतु, मेंदु व कवल्द वगैरे आतील अवयव याची दुर्बलता जाऊन क्रियाशक्ति प्राण, अपान, व्यान इत्यादींची शक्ति–व्यवस्थित कार्य करू लागते दोन्ही प्रकारच्या रक्त-वाहिन्या, रसवाहिन्या, वसावाहिन्या इत्यादि सर्वांतील, फार काय पाठीच्या

कण्याच्या मणक्यातील दोष सुद्धा नाहींसे होतात, म्हणूनच 'श्रुति' म्हणते कीं, 'प्राणायामैः दहेत् दोषान्.' योगाच्या आठ अंगातील प्राणायाम हें फारच महत्त्वाचें अंग आहे

यथा पर्वतधातूनां दोषान् हरति पावकः ।
एवं अन्तर्गतं पापं प्राणायामेन दह्यते ' ॥

(जाबाल दर्शन उ.)

खाणींतून काढलेल्या अशुद्ध धातूतील दोष, मळ इत्यादि त्या धातू भट्टींत विधिपूर्वक तापविल्यानें, अग्नीच्या योगानें नाहींसे होतात, त्या प्रमाणेंच स्थूलसूक्ष्मदेहांतील दोष, पापें प्राणायामानें दग्ध होतात. हें कसें होतें याची अंतरंग प्रक्रिया अत्रिस्मृतींत १।६ दिली आहे.

निरोधात् जायते वायुः वायोरग्निः प्रजायते ।
अग्नेरापश्च जायन्ते ततोऽन्तः शुध्यते त्रिभिः॥

अग्निपुराणात अशाच अर्थाचा श्लोक आहे. प्राणाचा निरोध केल्यानें वायु उत्पन्न होतो. वायुपासून अग्नि (तेज) उत्पन्न होतो व अग्नीपासून जल-आप उत्पन्न होतें व त्यानें तीन प्राणायामानीं शुद्धि केली जाते.

प्राणायामेन चित्तं तु शुद्धं भवति सुव्रत ।
चित्तं (मन) प्राणेन संयुक्तं प्राणः चित्तेन संयुतः ॥

(जाबाल द. उ.)

प्राणायामाचा विशेष अभ्यास केल्यास दोन महिन्यातच सर्व नाड्या (शिरा, रक्तवाहिन्या इ.) शुद्ध होतात; नाडीशुद्धि झाली कीं अग्नि प्रदीप्त होतो, पचनशक्ति सुधारते, दशनादापैकीं नाद आपोआप ऐकू येऊ लागतात व चित्ताची एकाग्रता सहज साधते; आरोग्य चांगलें राहतें (योग शि उप) याप्रमाणें दोष पातकेंरूपी सर्पण (इंधन) जाळून टाकणारा व पावित्र्य उत्पन्न करणारा अग्नि-(पावक) म्हणजे प्राणायाम होय.

चित्त व प्राण एकत्र असल्यानें प्राणाचा जय साधला कीं चित्ताचा जय व लय सहज साधतो चित्त व प्राण याच्या नियन्त्रणानें वीर्यजय सहज होतो, व ब्रह्मचर्य पालन करणें सोपें होतें. म्हणूनच प्रथम दिलेल्या श्लोकात प्राणायामाची महती सांगतली आहे कीं, महिन्या महिन्यानें

दर्भाच्या अग्रावर राहणाऱ्या जलाच्या एका बिंदूचें पान करीत संपूर्ण शंभर वर्षे तपश्चर्या करणें आणि एकदां व्यवस्थित प्राणायाम करणें समान होत.

प्राणजयाचीं लक्षणें–

जिते प्राणे स्वल्प दोषविण्मूत्रादि प्रजायते ।
आरोग्यं शीघ्रगामित्वं उत्साहः स्वरसौष्ठवम् ॥ ( अग्नि. पु )

प्राणजय झाला कीं कफ-वात-पित्तादि दोष आणि मलमूत्र यांचें प्रमाण फारच कमी होतें, आरोग्य, शीघ्रगति, उत्साह, इ. वाढतात आणि स्वर-आवाज-मधुर आकर्षक होतो

अनुभव–३५।३६ वर्षांचें वय असता जो पन्नास वर्षे वयाचा दिसत होता व पाठीच्या कण्याला थोडें पोक आलें होतें, त्यानें वर्ष सहामहिने आसनें, प्राणायाम इ अभ्यास शास्त्रोक्त पद्धतीनें केला तेव्हा तो तरुण दिसू लागला व पन्नास वर्षांचा झाल्यावर अपरिचितास तो ३५ वर्षांचा दिसत असे पाठीला आलेलें कुबड जाऊन १२।१२ तास, माडी न मोडता ताठ बसत असे, अट्ठ प्रारब्धानें आजारीपणा आला, ताप आला, कॉलरा झाला तरी गार पाण्यानें दोनदा स्नान चालू ठेवून औषध न घेताहि, फार तर काळ्या तुळशीची मूठभर पानें खाऊन बरा झाला।

यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् । ( भ गी ) असें भगवतानीं सांगितलें आहे, आणि सध्येंत 'यज्ञाना जपयज्ञोऽस्मि' व तो जपयज्ञ सुद्धा 'गायत्री छंदसा अहम्' अशा मंत्राचा। 'न गायत्र्या परो मंत्र' अशा परमश्रेष्ठ भगवद्विभूतिरूपी मंत्राचा यज्ञ आहे, ज्या दानानें सूर्याचें रक्षण होतें तें 'अर्घ्यदान' आहे, आणि 'प्राणायाम पर तप' प्राणायामरूपी श्रेष्ठ तप आहे तें किती श्रेष्ठ तप आहे हें आरभीं दिलेला श्लोक सागतो

'यज्ञो दान तपः चैव पावनानि मनीषिणाम् ।'

मनीषी म्हणजे धैर्यवान दूरदर्शी विद्वान, त्याना सुद्धा यज्ञ, दान व तप पावन करतात सध्येंत तर परमश्रेष्ठ यज्ञ, परमश्रेष्ठ दान व परमश्रेष्ठ तप आहे, त्यामुळें सध्या द्विजाना पावन करील यात नवल काय? असें असता चागले सुशिक्षित सुद्धा म्हणतात कीं सध्येनें लाभ काहीं नाहीं!

**प्राणायामांत तीन क्रिया** कराव्या लागतात. त्यांस पूरक, कुंभक व रेचक म्हणतात. एक नाकपुडी बंद करून दुसरीनें अगदीं सावकाश बाहेरचा वायू आंत भरणें म्हणजे पूरक. फुप्फुसें व आंतील भाग वायूनें पूर्ण करणारा म्हणून पूरक. आंत भरलेल्या वायूला बाहेर न जाऊं देतां निश्चल कोंडून ठेवणें म्हणजे कुंभक व कोंडून ठेवलेल्या वायूला अगदीं सावकाश दुसऱ्या किंवा त्याच नाकपुडीनें सोडणें म्हणजे रेचक. अशीं सामान्य प्राणायामांतील तीन क्रियांचीं लक्षणें आहेत.

**ध्यानः**—पूरकाचे वेळीं नाभिस्थानीं नीलवर्ण, चतुर्भुज 'हरी'चें, विष्णु, नारायणादिकाचें; कुंभकाचे वेळीं चतुर्मुख, लालगौरवर्णाच्या, व कमलात बसलेल्या ब्रह्मदेवाचें हृदयांत, व रेचकाचे वेळीं स्फटिकासारख्या वर्णाच्या निर्मल महेश्वराचें ललाटात-भ्रूमध्यांत ध्यान करावें.

*विचार करावा कीं, शैव वैष्णव, वादाला व द्वेषादिकाना जागा कुठें ठेवली आहे?*

**यांचेंच ध्यान कां?** विष्णूचें कार्य विश्वाचें भरण पोषण करणें. पूरकात वायु खूप भरला जातो; वायूचें पोषण केलें जातें म्हणून विष्णूचेंच करणें सयुक्तिक. फुप्फुसातील कोंडो सूक्ष्म छिद्रातील व इतर ठिकाणचे दोष काढून वायुजनित अग्नीनें व अग्निजनित आपानें पवित्रता, निर्मलता यांची उत्पत्ति कुंभकांत केली जाते. उत्पत्तिकार्य ब्रह्मदेवाचें म्हणून त्याचेंच ध्यान करणें योग्य. कुंभकानें काढून वायूंत साठविलेले दोष, मल, पाप यांचा त्याग करण्याचें, व त्यागानें त्याचा संहार करण्याचें कार्य रेचकानें होतें. *त्यागी व संहारकार्य करणारे व त्यायोगें शं म्हणजे कल्याण करणारे शंकर* महेश्वर; म्हणून रेचकात तेंच ध्यान योग्य. दोष मळ काढून टाकले नाहींत तर शुद्ध स्फटिकासारखें चित्त होणार नाहीं. याप्रमाणें पाहता ठरतें कीं, ब्रह्म विष्णु व शिव यांचीं कार्यें परस्परावलंबी आहेत. कारण संहारच नाहीं तर उत्पत्ति कशाची व कशी करणार, उत्पत्ति नाहीं तर पालन कशाचें व संहार तरी कशाचा? म्हणून या त्रिदेवात कोणाहि एकाला किंवा दोघाना मोठा, छोटा, खोटा इत्यादि मानणें हा महादोष आहे असें श्रुति पुराणें, (श्रीमद्भागवतमुद्दा) सागतात; आणि 'हें विश्वचि माझें घर।... किंबहुना हें चराचर। मीच पैंगा॥' अशा परमदृढ स्वानुभवावर आरूढ

झालेले व आरूढपदीत न झालेले संत कंठरवानें टाहो फोडून सांगत आलेले आहेत.

**प्राणायामरीति–** सरळ ताठ बसावें, मान बाजूला किंवा पुढें मागें कललेली नसावी. *( प्रारंभीं समोर आरसा असणें हितावह ).* ज्या नाकपुडींतून श्वास चालू असेल तिनें प्रथम रेचक करावा, व लगेच तिनें पूरक करावा उजव्या नाकपुडीवर ( पिंगलेवर ) आंगठा व डाव्या ( इडेवर ) नाकपुडीवर अनामिका व मध्यमा ब्रह्मचारी व सन्यासी यानीं ठेवाव्या; गृहस्थ व वानप्रस्थ यानीं चार बोटें इडेवर ठेवावीं ज्या नाकपुडीनें पूरक करावयाचा असेल तिच्या दुसऱ्या बाजूची नाकपुडी तिजवरील बोटानीं दाबून ठेवावी, पण नाकाचा अग्रभाग ( किंवा नाक ) जरा सुद्धा वाकडा होता नये कुंभक करताना दोन्ही नाकपुड्या त्यावरील बोटानीं तशाच सावधगिरीनें दाबून ठेवाव्यात आंगठा व बोटें ठेवणें तीं नाकाच्या हाडाच्या खालील मऊ भागावर ठेवावीं.

**विशेष सावधगिरी–** श्वास आत घेताना व सोडताना त्या वायूचा जरा सुद्धा आवाज *ध्वनि होणार नाहीं, स्वत लाहि ऐकू येणार नाहीं* इतक्या सदगतीनें पूरक व रेचक या क्रिया झाल्या पाहिजेत फार काय रेचकात बाहेर पडणाऱ्या हवेची-वायूची जाणीव आपल्या तर्जनी व आंगठा यामधील भागास स्पर्शानें होता उपयोगी नाहीं. पूरक व रेचक यांचें कालप्रमाण १ २ हें वाटेल तें झालें तरी कायम राहिलें पाहिजे.

**कुंभकात सावधगिरी–** पूरकाच्या चौपट कुंभक असें जरी योगशास्त्र ग्रंथात सांगितलें असलें तरी नवीन अभ्यासकानें त्या प्रमाणात कुंभक केल्यास, कोंडलेला वायु खालींवर हिसके देऊं लागतो व रेचकाच्या वेळीं श्वास फुस् फुस् करीत बाहेर पडतो, व त्यामुळें फुफ्फुसें दुर्बल होतात. आत कोंडून ठेवलेला वायु खालीं-वर हिसके देऊं लागण्यापूर्वींच रेचक सुरू करावा; अगदीं हळु वायु सोडावा. रेचक करताना मलमोचन द्वार वर आकर्षून घ्यावें व बेंबीजवळील भाग अगदीं सावकाश आत ओढीत पोटाला सपाटी पडेपर्यंत रेचक करावा म्हणजे पूरक व रेचक यांचें प्रमाण १ : २ सहज राहतें; मात्र पूरक करताना हळुहळू पोट फुगवीत जास्तींत जास्त हवा आत घ्यावी.

**प्राणायामांत मंत्र** – द्विजानीं सध्येंत प्राणायाम करताना सप्रणव सात व्याहृति, गायत्रीमंत्र व शिरोमंत्र याचा तीन वेळा कुंभकात मनात उच्चार करणें याला प्राणायाम म्हटलें आहे, पण हे उत्तम प्राणायामाचें लक्षण आहे, एवढा वेळ कुंभक करणें नवशिक्यास साधत नाहीं, म्हणून पूरक, कुंभक व रेचक १ १ : २, १ १॥ २, १ २ २, १ : २॥ : २, १ ३ २, असें हळुहळु कुंभकाचें प्रमाण वाढवीत करावें यातील कुंभकास अन्तःकुंभक म्हणतात बहिःकुंभकानें यापेक्षाहि अधिक लाभ होतो, पण त्याची आवश्यकता सध्येंत नाहीं म्हणून विस्तार नको द्विजेतरानीं नाममंत्रानें प्राणायाम करावा इतकाच फरक बाकी प्रक्रिया सारखीच

**प्राणायामत्रय कार्यं** सध्यासु च तिसृषु अपि । (मनु ) सध्येंत वेळोवेळीं प्राणायाम करावा लागतो तिन्ही सध्यात प्रत्येक वेळीं तीन प्राणायाम करावे कमी केल्यास प्रायश्चित्त नाहीं एका कर्मापूर्वी प्राणायाम करताना शेवटीं रेचक जिनें केला तिनें पुढल्या वेळीं प्रथम पूरक करावा प्रारंभीं मात्र तीन प्राणायाम केलेंच पाहिजेत, तसेंच गायत्री जपापूर्वी

**लक्षात ठेवावें**– छातीवरुन माणसानीं भरलेल्या गाडीचें एक चाक नेतात तें अंत कुंभकाच्या बळावरच !

**सर्वोपयोगी अनुभूत प्रयोग** – (१) भोजनाच्या वेळीं पिंगलेनें ( उजव्या नाकपुडीनें) श्वास चालू असावा, पाणी पिताना इडेनें ( डावीनें ) म्हणूनच जेवताना पाणी पिणें आरोग्यविघातक ठरतें पिंगलेनें श्वास चालू असता शरीरात व विशेषत उदरात उष्णता वाढते, इडेनें चालू असता शीतलता वाढते अन्नचर्वण, पचन यानीं उष्णता वाढते व पचनास उष्णता पाहिजे असते इडेला चंद्रनाडी व पिंगलेला सूर्यनाडी म्हणतात, त्याचें कारणहि हेंच कीं, चंद्र शीतलता देणारा, सूर्य उष्णता देणारा (२) डाव्या कुशीवर पडून राहण्यानें उजवा श्वास सुरू होतो व शरीरातील उष्णता रात्रीच्या गारव्यानें कमी होत नाही भोजनानंतर थोडा वेळ डाव्या कुशीवर पडून राहण्यास--वामकुक्षी करण्यास सागण्यात तोच हेतु आहे, उजवा श्वास सुरू होऊन शरीरास व पचनास पुरेसा उष्णतेचा पुरवठा सहज होतो उजव्या कुशीवर पडून राहिल्यास याच्या उलट परिणाम होतात

**श्वास बदलणें**–श्वास बदलण्यास समर्थसंप्रदायातील कुबडीचा चांगला उपयोग होतो. डावा श्वास बंद करून उजवा सुरू करणें असेल तर मांडी घालून बसून डाव्या काखेखालीं कुबडी लाठ उभी ठेवून तिच्यावर काखेनें भार द्यावा व डावीनें इडेनें श्वास जोरानें घेऊन पिंगलेनें जोरानें सोडावा, असें न थांबता १०।१२ वेळा करावें कीं उजवा श्वास सुरू होतो. उलट बाजूनें असें केल्यानें डावा सुरू होतो. दोन्ही नाकपुड्यांतून श्वास चालतो त्यास सुषुम्ना म्हणतात. सुषुम्ना सुरू असतां जप, ध्यान इत्यादि कार्यें करावीं. विशेष लाभ होतो, एकाग्रता लवकर साधते.

**इडा, पिंगला व सुषुम्ना** या नाड्या पाठीच्या कण्यांतून मेंदूत जातात. शरीराचें व मनाचें आरोग्य, अनारोग्य टिकणें याचा संबंध मुख्यत: पाठीच्या कण्यातील मणक्याच्या आरोग्यावर अवलंबून असतो. *प्राणायामानें या तीन नाड्यांचीं कार्यें व्यवस्थितपणें अकुंठित चालू राहतात,* व ऐहिक व पारमार्थिक सुखसमाधानाची वृद्धि होते, हें कोणासहि प्रयत्नानें अनुभवतां येईल. मात्र आहार अन्नपाणी, व्यायाम, निद्रा, भाषण इ. सर्व गोष्टी शास्त्रोक्त पद्धतीनें योग्य प्रमाणांत नियमित ठेवल्या पाहिजेत. अधिक माहितीसाठीं ' **शिवस्वरोदय** ' ग्रंथ पहावा.

**दीर्घश्वसन**–यांत दोन प्रकार आहेत, कुंभक न करतां, फक्त पूरक रेचक अगदीं सावकाश, नाकाला हात न लावतां करणें हा एक प्रकार आणि *कुंभकासह करणें हा दुसरा प्रकार. (नाकाला बोटें न लावताच)* पहिल्या प्रकारचा व्यायाम, जास्त करण्यास नाडीशोधन व्यायाम म्हणतात, मात्र त्यांत बोटांचा उपयोग केला जातो. कुंभकासह दीर्घश्वसन, हा प्राणायामाचाच एक प्रकार आहे, त्यास उज्जायी प्राणायाम म्हणतात. हा चालतांना उभ्यानें सुद्धां करतां येतो. **दीर्घश्वसनाविषयीं पाश्चात्यांचें मत आचमन प्रकरणांत दिलें आहे.**

**प्राणायाम व दमा (रोग)**– दमा बरा करण्यास उपयोगीं पडणारा प्राणायाम करण्यानें एक यंत्र अलीकडे निघालें आहे. नाकानें श्वास घेऊन *मुखानें रेचक करण्याच्या प्राणायामाच्या एका प्रकारावरूनच तें बनविलेलें*

असलें पाहिजे एका नळींत अगदीं सावकाश फुंकर मारावयाची असते व श्वास नाकानें घ्यावयाचा असतो.

**वैदिक सनातन धर्मशास्त्र हें** आरोग्यशास्त्र, समाजशास्त्र, राजनीतिशास्त्र इत्यादि सर्व *शास्त्रांतील मानवाच्या सर्वांगीण उन्नतीस* उपयुक्त अशा साधनाचें सारसर्वस्व आहे, त्याच्या पालनानें व्यक्तीचें व समाजाचेंहि कल्याण होईल प्राणायामानंतर संकल्प करावयाचा असतो

० ० ०

प्रकरण १७ वें

# संध्येचा संकल्प

कोणतेंहि कर्म करण्यापूर्वी त्या कर्माचा व तें कशासाठीं करावयाचें याविषयीं वाचेनें उच्चारलेला जो निश्चित विचार त्याला संकल्प म्हणतात देशकालादींचा उच्चार करून, संकल्पाचा उच्चार करून, हातातील पाणी सोडणें यास संकल्प सोडणें म्हणतात, ही पद्धति आसेतुहिमाचल चालू आहे

या पद्धतीला शास्त्राधार नाहीं असें गीताप्रेस नित्यकर्म पुस्तकात काशीतील प्रसिद्ध पंडितत्रयीनें म्हटलें आहे या लेखकालाहि कुठें आधार सापडला नाहीं, सापडला नाहीं म्हणून नाहींच, असें मानणेंहि योग्य नाहीं कोणताहि संकल्प प्रथम मानसिकच असतो, उच्चारानें त्यास वाचिकता व पाणी सोडण्यानें कायिकता येते, म्हणून रूढ पद्धति योग्य आहे संकल्पाचे मुख्य तीन प्रकार मतभेदानें आढळतात

(१) कुमारिलभट्टमतानुसार–'ममोपात्त दुरितक्षयार्थम्' (२) श्रीमत्शंकराचार्यमतें –'श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थम्' (३) गुरुमतें 'विधिसिध्यर्थम्' विधि सिद्धीस जाण्यासाठीं

महाराष्ट्रात व इतरत्र बहुधा सर्व धर्म स्मार्त जी पद्धति आहे, तिच्यात कुमारिलभट्टमत व भाष्यकारमत यांचा समावेश आहे 'ममोपात्त दुरितक्षय द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातः (मध्यान्ह सायं) संध्याम् उपासिष्ये किंवा अमुक कर्म करिष्ये' अशी पद्धति आहे, तीच चांगली आहे पापाचा नाश झाल्याशिवाय परमेश्वरकृपा होत नाहीं व पापक्षयाच्या हेतूनें पुण्यकर्में केल्याशिवाय, पापाचा नाश होत नाहीं

येषां तु अन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ताः भजन्ते मां दृढव्रताः ॥ ( भ गी )

पुण्यकर्मे करून ज्यानीं आपल्या पापाचा नाश करून घेतला आहे, ते सुखदु ख, यश अपयश, इत्यादि द्वंद्वापासून व मोहापासून ( मोह अज्ञान), मुटतात व दृढनिष्ठेनें मला भजतात

पापनाश-चित्तशुद्धि-ज्ञान-मोक्ष असा क्रम आहे. 'चित्तस्य शुद्धये कर्म.' सर्व नित्यकर्में पापक्षय करून चित्तशुद्धि होण्यासाठीं आहेत संध्येंतील आचमनादि प्रत्येक कर्म पापसंहारक आहे, त्यातहि गायत्री जपध्यानासारखें पापसंहारक साधन द्विजाना दुसरें नाहीं

संकल्पानतर मार्जन करावयाचें असतें, त्याचेंच वर्णन पुढें आहे

❀ ❀ ❀

प्रकरण १८ वें

# –मार्जन व मंत्राचमन

रक्षस्तमोमोहजातान् जाग्रत्-स्वप्न-सुषुप्तिजान् ।
वाङ्मन-कायजान् दोषान् नवैतान् मार्जनं हरेत् ॥ (स्मृतिसंग्रहे)

संध्येच्या विविध अंगांत मार्जन, मंत्राचमन व अघमर्षण हीं कर्में फार महत्त्वाचीं आहेत मार्जन म्हणजे झाडून, पुसून साफसूफ करणें, पवित्र, निर्मल करणें स्नानानें थकवा, आळस वगैरे जाऊन उत्साह वाढलेला असतो शरीरांतील शुद्ध व अशुद्ध रक्त वेगानें वाहू लागलेलें असतें व उष्णता वाढलेली असते, व नाड्यांतील दोष काढून टाकण्यास काहीं वेळ तरी त्या गतीची आवश्यकता असते

मार्जनांत विधीला महत्त्व आहेच, पण मंत्रदेवतांची व इंद्रियदेवतांची प्रसन्नता व हृदयांतील भावना यांना अधिक महत्त्व आहे रक्तप्रवाहाची वाढलेली गति मार्जनानें योग्य प्रमाणांत येते व शीतलता येते, हें शास्त्रीय प्रयोगांनींहि सिद्ध करतां येईल भावनांचा उद्रेक नियंत्रित होऊन स्थपणें विचार व चिंतन करण्यास मन व चित्त समर्थ होतात जलदेवता, आकाशस्थ देवता, हृदयस्थित देवता, शरीरस्थ देवता प्रसन्न होऊन, साधकाला त्याच्या कार्यांत साह्य करतात मार्जनाच्या मंत्रांत मुख्यत जलदेवतांचेच मंत्र आहेत, त्यांत अभ्युदय व निःश्रेयस यांच्या प्राप्तीसाठीं व पापविनाशासाठीं प्रार्थना आहेत पापाचें फळ दुःख व पुण्याचें फळ सुख हा सिद्धान्त असल्यानें, पापनाश झाला कीं भविष्यकाळांतील दुःखाचा नाश होणारच मनुष्याच्या देहामध्यें २/३ पेक्षां अधिक अंश जलाचा आहे जलाला जीवन म्हणतात, कारण जलानेंच प्राणाचें पोषण होतें,

प्राण जगतात रक्त, वीर्य पित्त, कफ, मूत्र, इत्यादि सर्व रसमय, जलमयच आहेत रक्ताशयादि सर्व अवयव जलादींच निगडित आहेत जपध्यानात तन्मयता एकाग्रता प्राप्त होण्यास जल्देवताची प्रसन्नता पाहिजेच आपलें शक्तिसर्वस्व लावून, प्रसन्नतेनें, एकाग्र चित्तानें कर्म केल्याशिवाय इष्टफल पूर्णांशानें मिळत नाहीं चित्त व प्राण यांत प्रसन्नता राहण्यासाठीं मार्जनाची व त्यांतील मंत्राची आवश्यकता आहे, पण त्या मंत्राचा अर्थ मंत्र म्हणता म्हणता सहज लक्षात यावा पाहिजे

अशी भावना ठेवावी कीं, जलदेवताच्या प्रसादानें मी पूर्ण निष्पाप होऊन एकाग्र चित्तानें परमात्म्याची उपासना करण्यास लायक झालों आहे, पापदु खादि आता माझ्याजवळ येणार नाहींत, अशा भावनेनें मंत्रार्थचिंतनपूर्वक मंत्रोच्चार करीत, त्या देवतास प्रार्थना करीत ठराविक ठिकाणीं दर्भांनीं पाणी शिंपडणें म्हणजे मार्जन करणें होय

मार्जनविधि– पहिल्या मार्जनात 'आपो हि ष्ठा' आदि तीन मंत्र आहेत प्रत्येकात तीन पाद आहेत प्रत्येक चरणापूर्वी ओंकार लावून सात चरणानीं मस्तकावर, आठव्यानें पायावर व भूमीवर, आणि नवव्या चरणानें पुन्हा डोक्यावर दर्भांनीं पाणी शिंपडावें दुसरा प्रकार ओंकारपूर्वक प्रत्येक चरणानें क्रमानें १ मस्तके, २ भूमौ पादयो ३ आकाशे हृदये ४ आकाशे हृदये ५ भूमौ पादयो ६ मस्तके ७ मस्तके ८ आकाशे हृदये ९ भूमौ, पादयो, या ठिकाणीं मार्जन करावें

दुसरा प्रकार अधिक श्रेयस्कर असें या लेखकास वाटतें, कारण यात हृदयावरसुद्धा मार्जन आहे शिवाय याज्ञवल्क्य म्हणतात कीं,

अधोभागे विसृष्टाभि· असुरा यान्ति संक्षयम् ।
सर्वतीर्थाभिषेकं च उर्ध्वसमार्जनात् भवेत् ॥

अधोभागीं भूमीवर प्रोक्षण केल्यानें असुरांचा नाश होतो व वर आकाशात उडविल्यानें सर्व तीर्थांत स्नान केल्याचें फल मिळतें

प्रोक्षण कसें करावें—मधलीं दोन बोटें व आंगठा यानीं दर्भ धरून डाव्या हातातील पळींतील पाण्यात, त्याचीं अग्रें प्रत्येक वेळीं बुडवून त्या दर्भांनीं प्रोक्षण करावें. जलाशयाच्या तीरीं संध्या करताना, दर्भ प्रत्येक वेळीं जलाशयात बुडवून मार्जन करावें

नळातून पडत असलेल्या धाराजलानें, किंवा पावसाच्या धाराजलानें मार्जन करू नये (प्रयो पारि इ) कोणत्याहि वरून खालीं पडणाऱ्या पाण्याच्या धारेंतील जलानें सध्यादि कोणतेंच कर्म करू नये नळाखालीं बसून स्नान करू नये पावसात मुद्दा निषिद्धच पण ऊन आणि पाऊस दोन्ही असता स्नान निषिद्ध नाहीं त्या गौण स्नानास दिव्य स्नान म्हणतात

डाव्या हातात (तळहातावर) पाणी घेऊन जी सध्या केली जाते ती वृषली होय, तिनें देवादि तृप्त न होता असुर तृप्त होतात, म्हणून डाव्या हातातील पाण्यानें मार्जन करू नये ज्या वेळीं पात्र मिळणें अशक्य असेल त्या वेळीं आपद्धर्म म्हणून चालेल मार्जनास पाणी कसें असावें तें आचमन प्रकरणात पाहावें

**मार्जनानें फायदा**- राक्षस, तम, व मोह याच्या योगानें वाणी, मन व देह याकडून घडणारे, जागृति, स्वप्न व निद्रा या अवस्थातील दोष मार्जनानें दग्ध होतात (श्लोक प्रारंभींच दिला आहे)

**क्रोध हा विकार** पित्तानें, पित्तप्रकोप झाल्यानें, उत्पन्न होतो फार क्रोध आला कीं 'पित्त खवळलें,' 'पित्त उसळलें' असें म्हणतात! क्रोधानें उष्णता वाढते, डोकें भडकतें क्रोध आला कीं डोक्यावर पाणी थापावें व डोळे ओठ व हृदय यावर शिंपडावें हा प्रयोग एकदा नुसता करावा व पुन्हा मार्जनाच्या मत्रानी अर्थचिंतनपूर्वक करावा, म्हणजे फरक कळेल

**अनुभव**- मुबईचे एक लक्षाधीश वृद्ध ब्राह्मण म्हणाले कीं, 'मी फार क्रोधी होतो, व तो येऊन गेला कीं माझें मलाच वाईट वाटे, शेवटीं नियम केला कीं क्रोध आल्याबरोबर अगावर असलेल्या वस्त्रासह गार पाण्यानें स्नान करावयाचें (ते नेहमीं गरम पाण्यानें स्नान करीत असत) प्रथम एके दिवशीं १७ वेळा स्नान करावें लागलें, पण आता काहीं वर्षे गेल्यावर १२।१३ आणे कमी झाला आहे, गार पाण्यानें स्नान केलें कीं क्रोध तत्काळ शात होतो, व अकार्यें घडत नाहींत ' म्हणूनच पहिल्या मार्जनानतर क्रोधाच्या देवताना प्रार्थना करून अभिमत्रित जल प्राशन करण्याचा एक विधि आहे, त्यास मत्राचमन म्हणतात कोणी अघप्राशन, जलप्राशन म्हणतात

## मंत्राचमन

उजव्या तळहातावर आचमनाएवढें घेतलेलें जल विशिष्ट मंत्रानें अभिमंत्रित करून, आचमनाप्रमाणेंच पण एकदाच प्यावयाचें असतें. क्रोधादि विकाराना वश होऊन जाणून, न जाणून, रात्रीं दिवसा केलेल्या पापाच्या विनाशासाठीं त्या त्या देवताना त्या मंत्रात प्रार्थना केलेली आहे. त्या देवताच्या प्रसादानें क्रोधाची उत्पत्ति होणेंच बंद झालें कीं क्रोधप्रेरित पापाचरण, हिंसा इत्यादि आपोआपच बंद होईल.

तिन्ही सध्यातील मंत्र सर्थासह प्रयोगात दिले आहेत. मंत्राचमनानंतर पुन्हा मार्जन आहे, तें झाल्यावर अघमर्षण आहे. त्याचें वर्णन पुढील प्रकरणात आहे.



प्रकरण १९ वें

# अघमर्षण ( पाप-पुरुष-निरसन )

यथाऽश्वमेधः क्रतुराट् सर्वपापापनोदन ।
तथाऽघमर्षणं सूक्तं सर्वपापापनोदनम् ॥ ( लघ्व्यास-स्मृ. )

अघमर्षण-सूक्त यज्ञश्रेष्ठ अश्वमेधयज्ञासारखें सर्व पापाचा संहार करणारें आहे. रजतमाच्या प्राबल्यानें मनुष्य अपार पापपर्वत कळत न कळत रचीत असतो, त्यामुळें सच्चिदानन्दस्वरूप असून सुद्धा परमात्म्यापासून दूर विभक्त झाल्यासारखा राहतो, आणि इथें व मेल्यावर अपार यातना भोगतो. सर्वभूतहितरत वेदांनीं व त्रिकालदर्शी ऋषींनीं सर्व पापाचा संहार करणारें जें अगदीं सोपें साधन सुलभ करून ठेवलें आहे तें ' अघमर्षण सूक्त ! पापाचा संहार करणारें म्हणून अघ-मर्षण. 'सर्वेनसामपध्वंसि' असा त्याचा अर्थ कोषातहि दिला आहे, व कोषातहि ' जप्य त्रिषु ( कालेषु ) अघमर्षणम् ' त्याचा त्रिकाळ जप करावा असें म्हटलें आहे.

विधि- आचमनाच्या मुद्रेसारखा हात करून त्यावर पाणी घ्यावें व तो हात नाकाजवळ न्यावा व श्वासनिरोध करून किंवा निरोध न करता अघमर्षण मनाचा जप, अर्थचिंतनासह, एकदा किंवा तीनदा करावा, व अशी भावना करावी कीं, हें जल डाव्या नाकपुडीनें आत शिरून, शरीरात असलेल्या पापसंचयरूपी पुरुषाला उजव्या नाकपुडींतून बाहेर काढून टाकीत आहे व त्या जलाकडे न पाहता, उजव्या नाकपुडीनें त्यावर हळूच श्वास सोडावा, आणि तें जल आपल्या डाव्या बाजूला जोरानें जमिनीवर मारल्यासारखें फेंकावें

परमात्मसाक्षात्कार होण्यात मल, विक्षेप व आवरण हे तीन महादोष आड येतात संध्या करीत राहिल्यानें या तिन्हींचाहि नाश होतो अधमर्पणानें मलविक्षेप दूर होतात, एकाग्रता साधते व प्रसन्नता प्राप्त होते चित्तप्रसादानें दु खाचा नाश होतो सदा प्रसन्नता हें पापनाश झाल्याचें लक्षण आहे. तिन्ही संध्येंत अघमर्षण केलें पाहिजे

पाप पुरुष ध्यान-चिंतन (हें ऐच्छिक आहे)– पापपुरुषाच्या आकार रूपाचें वर्णन स्मृतींनींहि केलें आहे त्याला दोन पाय असून सर्व अवयव पापाचेच बनलेले आहेत उपपातकें हे रोम आहेत दाढी, मिशा व डोळे लालभडक आहेत, तो काळाकुट्ट आहे, हातात ढाल तरवार आहेत व तो डाव्या कुशींत राहतो

पुढील प्रकरणात अर्घ्यदानाविषयीं वर्णन आहे



प्रकरण २० वें

# अर्घ्यप्रदान व प्रदक्षिणा

अर्घ्य का द्यावयाचें– मन्देह नावाचे तीस कोटी राक्षस सूर्याला उगवू न देण्याचा व त्याला भक्षण करण्याचा प्रयत्न उदयापूर्वीपासून अस्तकाळापर्यंत करीत असतात.

> ओंकारोऽथ व्याहृतयः गायत्री सशिरास्तथा ।
> आदित्यरक्षणार्थं तु सायंप्रातर्दिने दिने ।
> सृष्टा स्वयंभुवा पूर्वं ब्रह्मणः तन्मुखं स्मृतम् ॥

रोज सायंकाळीं व प्रातःकाळीं आदित्याचें रक्षण करण्यासाठीं स्वयंभू ब्रह्मदेवानें ओंकार, व्याहृती, गायत्री व गायत्रीशिर या मंत्रांची उत्पत्ति केली ( योगी, याज्ञ ) गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित केलेलें पाणी त्यांच्याकडे फेकलें कीं त्या गायत्रीमंत्रानें त्यांचा वध केला जातो त्या जलाचा प्रत्येक बिंदु वज्र बनून त्या मन्देहांना मारून मन्देहारुण नावाच्या बेटांत पाडतो. इ श्रुति आहे ( स १ भा पृ २१६ पाहा )

तीन अर्घ्य कां? एकं तु शस्त्रनाशाय द्वितीयं ह्यनाशने । राक्षसानां वधार्थाय दद्यात् अर्घ्यत्रयं बुधः ॥ ( व्यास ) त्या राक्षसांच्या शस्त्रांच्या नाशासाठीं एक अर्घ्य, घोडे वगैरे त्यांच्या वाहनांच्या नाशासाठीं दुसरा व राक्षसांच्या नाशासाठीं तिसरा, याप्रमाणें तीन अर्घ्य सकाळीं सूर्योदयापूर्वी अरुणोदयानंतर, व सायंकाळीं सूर्य अस्तास जाण्याच्या वेळीं तीन अर्घ्य द्यावे

सायंकाळीं पुन्हा कां? प्रातःसंध्येंत दिलेल्या अर्घ्यांनीं जरी ते मारून पाडले गेले, तरी त्यांनीं मिळविलेल्या वराप्रमाणें ते सूर्यास्तापूर्वी उठून,

वाहनें यान्यासह जिवंत होतात व सूर्याला गिळण्याचा प्रयत्न करतात, म्हणून सायकाळींहि तीन अर्घ्य दिले पाहिजेत

सूर्याच्या वेळच्या वेळीं उगवण्यावर व मावळण्यावर सर्व जगाचें जीवन कसें अवलबून आहे हें ' सध्योपासना ' प्रकरणात दाखविलें आहे कोणी मोठा अधिकारी गावात यावयाचा असला म्हणजे त्या गावातील प्रतिष्ठित लोक, पुढारी व सरकारी अधिकारी त्याचें स्वागत करण्यासाठीं हार वगैरे घेऊन पुष्कळ वेळ आधीं स्टेशनवर हजर राहतात मग ज्याच्यावर जगाचें जीवन अवलबून आहे त्याच्या उदयाच्या वेळीं त्याच्या शत्रूचा नाश करुन जगाच्या व स्वत च्या कल्याणासाठीं पाण्याचे अर्घ्य देणें हें द्विजाचें व वर्णाना ब्राह्मणो गुरु ' अशा ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य न करुन कसें भागेल ?

अर्घ्य का द्यावयाचे हें पाहिलें म्हणजे सहजच सिद्ध होतें कीं, ते प्रात सध्येंत अरुणोदयकाळींच देणें जरुर आहे गुरुचरितातील ओवीचें रहस्य न समजल्यानें गैरसमज पसरला आहे कीं, सूर्योदय झाल्याशिवाय अर्घ्य देऊ नयेत, पण ' अरुणो भास्करेऽपि स्यात् ' ( अमरे ) अरुण सूर्यरथाचा सारथी आहे तो दिसू लागणें हें सूर्योदयाचें पूर्व चिन्ह आहे, म्हणून त्या ओवींतील सूर्य शब्दाचा अर्थ ' अरुण ' करणें भाग आहे, अन्यथा अनेक शास्त्रवचनाशीं विरोध येतो अरुणोदयकाळ सूर्योदयापूर्वी तीन घटिका पासून ४ घटिकापर्यंत अरुणोदयारभीं सध्येला प्रारभ केला कीं अरुणोदय समाप्तीच्या आत अर्घ्ये देता येतात अरुणोदय एक घटका राहतो मागील सूर्योदयापासून ५५ घटिका ( पचपच ) उष काल, षट्पच (५६) घटिका होताच अरुणोदय, व सप्त पच (५७) प्रात काळ होतो सायकाळीं सूर्य अस्तास जाऊ लागण्याची वेळ हा अर्घ्यदानास उत्तम काळ, तो न साधल्यास प्रायश्चित्तार्घ्य !

शका– आदित्यरक्षणार्थ उत्पन्न केलेल्या ओंकार व्याहृती व गायत्री मत्र याचा उपयोग केला जातो, पण गायत्रीशिरमत्राचा का केला जात नाहीं करावयाचा विधि शास्त्रानीं सांगितला आहे, पण लक्षात कोण घेतो ? अश्वलायनादि सूत्रकार सुद्धा त्याची आवश्यकता सागतात

**अर्घ्य कसे द्यावेत–** (प्रात काळीं)

तत तिष्ठन् जल गृह्य प्राङ्मुख अजलिना स्मरन् ।
मण्डले सुस्थित तेज स्फाटिकज्योतिषा सम ।
उत्तीर्य तच्च सप्राप्त दक्षिणेन पयाऽञ्जलिम् ॥
व्याहृत्यादि जपेत् मत्र स्मृत्वैव, परितो रवे ।
मन्देहान्युध्यत क्रूरान् निक्षिपेत् तेस्वञ्जलीन (तिषु अप् अजलीन्) ।
**षोडशाक्षरमंत्रेण पुनराकृष्य सत्वरः ।**
पुनर्जल गृहीत्वैव तेजोमत्र च सस्मरन् ॥
एव त्रिवार आवर्त्य दग्ध्वा तान् असुरान् द्विज ।
मत्रेणऽकृष्य तत्तेज स्थानादौ स्थापयेत् स्मरन् ।
पूर्ववत् श्वासमार्गेण स्मृत्वा सस्थाप्य चात्मनि ।
प्रदक्षिण समावर्त्य जल गृह्याऽऽचमेत्तत ॥

(इति आश्वलायन स र मालायाम्)

**अर्थ–**(प्रात सध्येतील अर्घ्य देताना) दोन्ही हाताच्या तर्जनी व आगठे सुटे ठेवलेल्या ओंजळींत पाणी घेऊन पूर्वेस तोंड करून उभें राहावें, नतर आपल्या हृदयातील सूर्यमडळातलें देदीप्यमान स्फटिकासारखें गायत्रीचें तेज उजव्या नाकपुडीनें ओंजळींतील उदकात येत आहे अशी भावना करून प्रणवव्याहृतीयुक्त गायत्रीमत्रानें तें पाणी अभिमत्रित करून, सर्व बाजूनीं सूर्यास घेरून रुढत असलेल्या क्रूर मदेह राक्षसावर फेंकावें-उडवावें नतर त्या गायत्रीअस्त्ररूपी फेंकलेल्या तेजाला 'ओं आपो ज्योती सुवरोम् या सोळा अक्षरी मत्रानें त्वरेनें आकर्षित करून, तें तेज डाव्या नाकपुडीं द्वन हृदयात पूर्व ठिकाणीं गेलें आहे अशी भावना करावी, व पुन ओंज-ळींत पाणी घेऊन तेजोमत्रानें गायत्रीचें स्मरण करीत पूर्वीप्रमाणेंच त्या पाण्यात आणावें पुन्हा फेकावें व सोळाक्षरी मत्रानें आकर्षावें हृदयात स्थापावें याप्रमाणें तीन वेळा करावें तिसरा अर्घ्य दिल्यानतर तें तेज आकर्षित करून हृदयात स्थापन करून ठेवावें दैत्याना, असुराना जाळ ल्याचें प्राय श्चित्त म्हणून स्वत च्या भोंवतीं प्रदक्षिणा करून आचमन करावें, अशी आश्वलायन, बौधायन, वगैरे अनेकाची आज्ञा आहे यालाच इतरानीं **अस्त्रोपसंहरण, अस्त्रोपसंहार** असें म्हटलें आहे

अस्त्रविद्येतसुद्धा फेंकलेल्या, सोडलेल्या अस्त्राला आकर्षित करून परत आपल्याजवळ आणण्याचे विविध मंत्र आहेत, ते मंत्र सिद्ध नसतील तर सोडलेले अस्त्र परत येत नाहीं, हें महाभारतात युद्धवर्णनात दिसतेंच कोणी ब्रह्मदण्डास्त्र मंत्र, कोणी ब्रह्मास्त्रमंत्र, असे विविध मंत्र या गायत्री अस्त्राच्या आकर्षणासाठीं दिले आहेत, पण ते मोठमोठे व कठीण आहेत, म्हणून हा गुटगुटीत सर्व्यातलाच मंत्र घेतला आहे

हृदयांतून गायत्री तेज बाहेर आणताना 'उत्तिष्ठ देवि गन्तव्य पुनरागमनाय च' अशी प्रार्थना करावी व शेवटीं हृदयात स्थापन करताना '*उत्तिष्ठ देवि स्थातव्य प्रविश्य हृदय मम*' अशी प्रार्थना करावी, असें कोणी सध्याभाष्यकारादि म्हणतात आश्वलायनानीं सांगि तल्याप्रमाणें भावना करण्यास या प्रार्थना उपयुक्त आहेत, म्हणून याचा उपयोग करणें जरूर आहे

अर्घ्य देताना कसें उभे राहावें 'ईषन्नम्र· प्रभाते स्यात् मध्यान्हे ऋजुसंस्थित । उपविश्य तु सायान्हे. (१) सकाळीं किंचित वाकून उभ्यानें, मध्यान्हसर्व्येत ताठ उभ्यानें व सायंकाळीं बसून अर्घ्य द्यावें हा सामान्य प्रकार होय (२) एका पायावर उभे राहून दुसऱ्या पायाची खोट जमिनीस-आसनास न लावता, नुसता चवडा टेकून (३) केवळ एकाच पायावर उभें राहून आणि (४) केवळ एका चौड्यावर उभें राहून अर्घ्य द्यावें यातील प्रकार उत्तरोत्तर अधिक श्रेष्ठ आहेत, कारण कीं जितके कष्ट परिश्रम जास्त तितकें अधिक फळ असं मनीषी म्हणतात ( गोभिल स्मृ )

ल. ठेवा– सूर्योपस्थान व गायत्रीजप सुद्धा या पद्धतींनीं करणें अधिकाधिक लाभदायक ठरेल, म्हणून अशा रीतीनें शक्य त्यानीं करावें

एका पायावर स्थिर उभे राहण्यास तोल सभाळावा लागतो, व चित्ताची एकाग्रता झाल्याशिवाय तोल समाळता येत नाही दृष्टि स्थिर झाली कीं चित्त स्थिर होतें, कारण 'नेत्रे जागरित विद्यात् (श्रुति) जागृतींत मन चित्त दृष्टीं नेत्रात असतें, म्हणून समोर क्षितिजाजवळील लालजाल झालेल्या भागात दृष्टि स्थिर केली टक लावून पाहिलें कीं तोल सभाळता येतो अशा वेळीं पाहण्यानें दृष्टिदोष कमी होतात मात्र नेत्रात

नीर (जल) घेताच टक लावून पाहणें बंद केलें पाहिजे, अन्यथा डोळे बिघडतात अशा टक लावून पाहण्यास त्राटक म्हणतात त्राटकानें वाघ, सिंह इत्यादि पशुसुद्धा वश करता येतात, अनेक रोग बरे करता येतात, इत्यादि अनेक फायदे होतात, याचा अनुभव अनेकांनीं घेतलेला आहे

**ल. ठे.** सकाळीं व मध्यान्हीं अर्घ्योदक जलात पडलें पाहिजे ताहानात पाणी घालून ठेवावें व वर उडवलेलें अर्घ्यजल त्या पाण्यात पडेल असें उडवावें, किंवा भूमीवर पाणी शिंपून ठेवावें व तेथें पडेल असें उडवावें मध्यान्ह सध्येंत एक अर्घ्य द्यावा, मत्र प्रयोगात दिला आहे मध्यान्हसध्या रात्रीं करण्याचा प्रसग आला तर अर्घ्य 'आ कृष्णेन' मत्रानें द्यावा व जमिनीवर (गोभिल) अर्घ्य देताना तर्जनी व अगुष्ठ याचा स्पर्श त्या जलाला होऊ नये आणि अगुष्ठ व तर्जनी एकमेकास लागू नयेत (दे भा ११।१६।४९) अगुष्ठ तर्जनीयोगानें तें अर्घ्यजल रुधिरसमान होतें व त्या राक्षसाचा नाश न होता ते पुष्ट होतात

**पाणी नसेल तर–** पाणी मिळणें अगदीं अशक्य असेल तर, ओंजळींत धूळ घेऊन अर्घ्य द्यावे (प्रवासात बदिवासात युद्धात वगैरे.) (अग्नि-स्मृ)

**सकाळीं जलांत अर्घ्य का? संध्याकाळीं कां नाहीं?** त्या सर्वांचा म्होरक्या नेत्रप नावाचा राक्षस शुक्राचार्याच्या आज्ञेनें जलात राहतो गायत्री अस्त्रानें जल पाण्यात पडले कीं नेत्रापासुर मरून त्या बेटात पडतो सकाळीं मारून पाडलेले राक्षस सायकाळीं मदेहारुण बेटात जिवत होतात म्हणून सायकाळीं अर्घ्य भूमीवर

**मध्यान्हीं एक अर्घ्य कां?** मध्यान्यकाळीं राक्षसाचा वध करावयाचा नसतो, ते पडलेलेच असतात एक अर्घ्य सूर्याची पूजा म्हणून द्यावयाचा गायत्रीने अर्घ्य दिला तर तें अस्त्र होते, पण त्याची मध्यान्ह सध्येंत जरूर नसते

## प्रदक्षिणा

हे सर्व राक्षस ब्राह्मण असल्यानें, अर्घ्य देणारास ब्रह्महत्येचें पातक लागतें त्याचें प्रायश्चित समुद्रवलयान्वित पृथ्वीची प्रदक्षिणा व सूर्यप्रदक्षिणा

हें आहे. पृथ्वीची प्रत्यक्ष प्रदक्षिणा किंवा सूर्याची प्रदक्षिणा घालणें अशक्य आहे, म्हणून हातात पाणी घेऊन त्याची अखंड धार भूमीवर पाडीत आपल्या भोंवतीं प्रदक्षिणा करावयाची; पण त्या वेळीं अशी भावना पाहिजे की, मी ही पृथ्वीप्रदक्षिणा करीत आहे व सभोंवतालीं ओली झालेली भूमि तें जणूं सागरानें वेढन आहे.

'सूर्य आत्मा जगतः तस्थुष· च' सूर्य सर्व विश्वाचा आत्मा असल्यानें तोच जीवात्मा-रूपानें माझ्यात आहे. त्याच्याहि मी प्रदक्षिणा करीत आहें, अशा भावनेनें 'असावादित्यो ब्रह्म' (हा व माझ्या हृदयात असलेला सूर्य ब्रह्म आहे.) हा मंत्र म्हणत एक प्रदक्षिणा करावी. यात ब्रह्मात्मैक्य-चिंतन सहज घडतें. अद्वैत प्रतिपादक—

आणखी आधारः—

आदित्यान्तर्गतं यच्च ज्योतिषां ज्योतिरुत्तमम् ।
हृदये सर्वभूतानां जीवरूपेण तिष्ठति (याज्ञ सं)

'ममैवांशोः जीवलोके जीवभूतः सनातनः ॥ (भ. गी)

कालातिक्रम प्रायश्चित्ताविषयीं गायत्री जपप्रकरणात साधार विवेचन केलें आहे. आता संध्येतील सर्वांत श्रेष्ठ कर्म जो गायत्री जप त्याच्या हळूहळू तयारीस लागलें पाहिजे, त्यात प्रथम आसन व आसनविधि

* * *

प्रकरण २१ वें

# बसण्यासाठीं आसन व आसनविधि

संध्या, पूजा, जप, ध्यान इत्यादि धर्मांत बसण्यास किंवा उभें राहण्यास खालीलपैकीं आवडेल तें आसन वापरावें (व्यास, नारद, दे भा, प्रचेता, गु च, रा च, ब्रह्मयामल, इत्यादि ग्रंथांतील वचनें आधारास घेतलीं.)

कुशासन (दर्भासन), घोंगडी वगैरे लोकरीचें वस्त्र, कृष्णाजिन, व्याघ्राजिन, रेशमी वस्त्र, ताडाच्या पात्याचें, काष्ठाचें (पाट), तागाचें, वेताचें किंवा भस्माचें आसन चालतें, काळें वस्त्र नसावें, निळें ब्राह्मणाना त्याज्य

**निषिद्ध आसनें**– फळक-बाबू याचें, कापसाच्या वस्त्राचें, केवळ भूमि, दगड, पाषाण, गवताचें, पालापाचोळ्याचें, शेणाचें, फुटलेलें, फाटकें, मलिन, पिंपळ पळस किंवा रुई याच्या काष्ठाचें, लोखंडाचें वगैरे खिळे मारलेलें, छिद्रें, फटी वगैरे असलेले पाट वापरू नयेत

**आसनगुण**–कृष्णाजिनानें ज्ञानसिद्धि (कृष्णाजिन–काळी पाठ असलेलें मृगचर्म, पुत्रवान गृहस्थानें नुसत्या मृगाजिनावर बसू नये) व्याघ्राजिनानें सर्व प्रकारची सिद्धि, वस्त्रासनानें रोगनाश वेताच्या आसनानें ऐश्वर्यवृद्धि, कुशासनानें व्याधिनाश व पुष्टि, कंबल–घोंगडी–दु खनाश, भस्मासनानें व्याधिनाश. सर्वांत उत्तम चित्रकंबल

**निषिद्धासनाचे दुष्परिणाम**– वंशासनानें दारिद्र्यप्राप्ति, पाषाणाच्या आसनानें रोगोत्पत्ति, केवळ जमिनीवर बसल्यानें दु ख, गवतानें धनहानि, यशोहानि, पानें पाला चित्त भ्रम, कार्पासवस्त्रासन–जपादि निष्फळ इतर निषिद्ध आसनानें दुर्भाग्य, दारिद्र्य व चिंता याची उत्पत्ति होते

पाट (काष्टासन) अखड, एकाच फळीचा, बिन साध्याचा, भोकें छिद्रें न पाडलेला, योग्य काष्ठाचा असावा एकच रुद व जाड फळी घेऊन, तिचा खालचा भाग पोखरून दूर काढावेत, म्हणजे अखड पाट होतो, उबराचा सर्वांत चागला असा पाट निषिद्ध नसला तरी पाटावर जास्त वेळ बसल्यानें पायाना कळा लागतात,म्हणून जाड आसन असावें फार वेळ रोज वापरणारानें पाट न वापरणेंच हितावह

भगवद् गीतेंत सागितल्याप्रमाणें खालीं दर्भासन, त्यावर मृगचर्म किंवा व्याघ्रचर्म व त्यावर घोंगडीची घडी असें आसन वापरणें सर्वांत उत्तम कोणतेंहि आसन असलें तरी तें मृदु व स्वच्छ पाहिजे नुसतें रेशमी आसन नुसत्या जमिनीवर घालू नये रेशीम उत्तम विद्युद्वाहक असल्यानें साधनानें शरीरात उत्पन्न होणारी शक्ति भूमींत जाते

**आसनाचें प्रमाण–**

कुशाऽजिनाऽम्बरैर्युक्त चतुरगुलमूर्ध्वत । चतुरस्र द्विहस्त च सुदृढ मृदु निर्मलम् ॥ (नारद) दोन हात लाब चार अगुळें उच (जाड) व चौरस असावें दोन हात रुद तीन ते पाच अगुळें उच (जाड) असावें (काली पु ) मृदु आणि निर्मल पाहिजे

**पश्चासनाला दशा** असाव्यात व त्या पूर्वेस किंवा उत्तरेस होतील असें आसन घालावें आसनावर बसण्यापूर्वी त्यावर द्विजानीं गायत्रीमत्रानें व इतरानीं नाममत्रानें, जल प्रोक्षण करून, वदन करून बसावें

**आसनविधि –**

सध्येच्या प्रारभीच जरी आसनावर बसावें लागत असलें तरी आसन विधि अर्घ्यदानानतर करावयाचा असतो व नतर गायत्रीजप, यावरूनहि हें सिद्ध होतें कीं गायत्री जप हेंच सध्येंतील सर्वांत मुख्य कर्म आहे

**आसनविधि मत्रात** प्रथम पृथ्वीची प्रार्थना **'पृथ्वि त्वया'** मत्रानें करावयाची असते, ती दोन्ही हात उताणे सरळ पसरून, आगठ्याचीं अग्रें करगळीच्या मूळावर ठवून बोटानीं भूमीला स्पर्श केलेला असता करावी **'अपसर्पन्तु'** मत्रानें भूमीवर असलेले त्रासदायक, विघ्नकारक जीवजतू, याना त्या मत्रशक्तीनें हाकलून लावावयाचे असतात, म्हणून हा मत्र

म्हणत डाव्या पायाची खोट जमिनीवर, आसनाच्या बाहेर, तीन वेळां आपटावी 'ऊर्ध्वकेशि' मंत्रानें उग्र अशा चामुंडा देवीला प्रार्थना करून तिला शेंडीच्या गाठीवर बसवावयाची आहे. भावना अशी असावी कीं ती रक्तमांस खाणारी देवी सभोंवतालच्या, हवेंत असलेल्या डासासारख्या जीवांना व भूतप्रेतपिशाचांना खाऊन टाकील; तिला भिऊन सर्व पळून जातील. 'अपक्रामन्तु' या मंत्रानें आकाशस्थ, विघ्नकारक भूतादिकांना दूर निघून जाण्याविषयीं सूचना द्यावयाची असते हा मंत्र म्हणतांना आकाशाकडे जरा उग्र तिरप्या दृष्टीनें पाहावें, व नंतर 'अस्त्राय फट्' हा अस्त्रमंत्र म्हणून डाव्या तळहातावर उजव्याचीं आगठ्याजवळचीं दोन बोटें जोरानें आपटावीं (टाळी मारल्यासारखी); व नंतर उजवा हात, टिचकी वाजवीत मस्तकाच्या भोंवतीं फिरवावा.

**या आसनविधीचा प्रभाव फार मोठा आहे, आश्चर्यकारक आहे!** असत्य न बोलणारा, नीतिसंपन्न व सदाचारसंपन्न राहून उत्तम काळीं १०८ च गायत्री जप करून संध्या करणारा असेल, त्या ब्राह्मणानें संध्या किंवा कोणतेंहि जप, ध्यान, ग्रंथपठन इत्यादि कर्म करतांना केव्हांहि हा विधि करावा म्हणजे अनुभव येईल कीं **डोक्याच्या वरच्या बाजूला डांस, माशा, चिलटें इ० कारंज्यासारखीं उडत असलीं तरी अंगाला स्पर्शसुद्धां करीत नाहींत कीं आवाजहि करीत नाहींत** संध्यादि कार्यांत तर हे होतेंच; पण **झोपतांना** फक्त **'अपक्रामन्तु...** निद्राकर्मसमारंभे' असें हातरुणावर उताणें पडल्यावर म्हणून दिग्बंध केला म्हणजे कितीहि डास, माशा असल्या तरी उघड्या अंगाला स्पर्शसुद्धा करीत नाहींत; मात्र विनियोगाचा उच्चार करण्यात कुठें सवड-फट राहिली कीं तेवढ्याचा फायदा ते अज्ञ जीवसुद्धा घेतात कीं ज्यांना माया, अर्थ कळत नाहीं! म्हणून 'ब्रह्मकर्मसमारंभे' च्या जागीं पाहिजे तो बदल केला पाहिजे

**आणखी एक प्रकार**–अशी प्रार्थना करावी कीं, (रामा! कृष्णा! पांडुरंगा!) डास, माशा इत्यादींच्या रूपानें येऊन या अमुक अमुक सत्कर्मांत चावतोस, विघ्न करतोस, त्रास देतोस, त्यापेक्षा तुझ्या दिव्य रूपानें अधिक त्रास दिलास तर अधिक चांगलें! या प्राण्याच्या रूपानें त्रास

दिलास तर माझें चंचल चित्त या सत्कार्यांत कसें रमेल? अशा प्रकारें प्रार्थना केल्याचे अनुभव वृद्ध व अगदीं ५।६ वर्षांचें बालक यानींसुद्धा घेतलेले या डोळ्यांनीं पाहिले आहेत. अशी प्रार्थना आवश्यक तो बदल करून झोंपतांना केली तरीसुद्धां डांस भराभर पळून जातात हेंहि चक्षुर्वै सत्यम् आहे.

**बालकांस फल अधिक**—मोठ्या माणसापेक्षा अशा प्रार्थनाचें फल बालकांना जास्त प्रमाणात मिळतें हेंहि आढळलें आहे. बालकाचे देह व हृदयें मोठ्याच्या एवढीं मलीन झालेलीं नसतात. 'कुठें याचे कुठें वाढे' अहंकार, राग, द्वेषादि मानसिक रोग व पापें यानीं बालकाच्या हृदयात घर केलेलें नसतें. देह बरेच शुद्ध असतात.

सर्वेश-भगवद्भावनेचा अभ्यास या प्रार्थनानीं सहज होतो ही भावना बालपणातच ठसविणें पालकाचें मोठें कर्तव्य आहे, सहजच ओघानें आलें व फार उपयुक्त म्हणून जास्त विस्तार करावा लागला.

श्रीयुत लेडबीटर यानीं या मंत्राचे दिसलेले दिव्य परिणाम 'A Temple thought form' या लेखात सचित्र दिलेले, मुद्दाम अवलोकन करावे.

**कांहीं अनुभव**–'अपक्रामन्तु' या दोन मत्रानीं आसनाच्या सभोंवती शुद्ध भस्माची अखंड रेषा काढली तर सरपटणारे प्राणी आत येत नाहींत

पिशाचबाधा झालेल्या व्यक्तीस गुरुचरित्रसप्ताह वगैरे ऐकविणें असेल व ती व्यक्ति आसनावरून उठून जाऊं लागली, तर सर्व आसनविधि त्याच्या भोवतीं करावा व भस्मरेषा काढावी म्हणजे तो माणूस उठून जाऊं शकणार नाहीं, **पादासुद्धां वर उसळ्या मारील, पण आसन सोडून त्यास बाहेर जातां येणार नाहीं–येत नाहीं–आलें नाहीं.** ही रेषा काढणारा कसा पाहिजे तें या प्रकरणताच दिलें आहे.

**आसन कोणतें असावें–**

प्राणायाम, जपादि बसून करताना, **सहजासन, स्वस्तिकासन** किंवा **पद्मासन** घालावें स्वस्तिकासन सर्व प्रकारें हितकारक, कारण तें योगासन असून पुष्कळ वेळ सहज बसता येतें, चुकलें थोडेसें, तरी बिनधोक.

म्हणूनच असें वाटतें कीं सिद्धासनाचा उल्लेख फारच थोड्या स्मृति-पुराणात आढळला पद्मासनसुद्धा चागलेंच. सहजासन म्हणजे मनुष्य सहज जशी माडी घालून बसतो तें. प्रौढासन मलयशाशिवाय इतर वेळीं नसावें. एका पायाच्या माडीवर किंवा गुडघ्यावर दुसऱ्याचें पाऊल ठेवून बसणें तें प्रौढासन वद्य, पूज्य, आदरणीय व्यक्तींच्या समोर, जवळ(सुद्धा) प्रौढासन घालून बसू नये, तसें त्याच्यादेखत घालणे म्हणजे त्याचा अनादर, अपमान करणें ठरतें.

आसनावर जलप्रोक्षण करून बसल्यावर न्यास करावयाचे असतात म्हणून त्याविषयीं पुढील प्रकरणांत लिहिलें आहे.

* * *

प्रकरण २२ वें

# न्यास व मुद्रा

नाऽदेवोऽभ्यर्चयेत् देवं इति वेदविदो विदु ॥ (दे भा )
देवो भूत्वा देवं यजेत् ॥

न्यास म्हणजे स्थापन करणें ठेवणें ज्या मंत्राचा जप करावयाचा असेल त्याच्या विविध भागाची-अंगाची स्थापना शरीराच्या विविध अवयवावर करणें म्हणजे न्यास करणें हृदय व शरीर मंत्रमय, देवतामय करून, देवकार्य करावें देव बनून देवाची पूजा, उपासना करावी देव न झाल्यानें, अदेवानें देवाचें अर्चनादि करू नये असें वेदवेत्त्यांनीं जाणलें कोणी म्हणतील कीं, मंत्रमय बनल्यानें देवमय कसें होता येईल[?] मंत्र आणि देव, देवता भिन्न नसतात म्हणून तन्मय होतें

न स्वर्गेषु न तीर्थेषु नौषधीषु नगेषु च ॥
ऋषयो देवता सन्ति मन्त्रा एव तु देवताः ॥
साधकाना फलं दातुं तत् तत् रूपं धृतं सुरैः ॥
मुख्यं स्वरूपं तेषा तु मन्त्रा एव न चेतरत् ॥ [ मेरुतन्त्र प्रकाश ]

बोधायन स्मृतीनें हा सिद्धांत प्रकरण ४ मध्यें सिद्ध केला आहे

अर्थ–ऋषि आणि देवता स्वर्गांत, तीर्थांत, औषधींत, वृक्षात, पर्वतात वगैरे नसून मन्त्रच देवता होत (मंत्रातच ऋषि आहेत) साधकाना त्याच्या अनुष्ठानाचें फळ देण्यासाठीं त्या त्या मंत्राच्या देवतानीं तीं तीं रूपें नमुना म्हणून धारण केलीं आहेत., तथापि त्याचें मुख्य रूप म्हणजे मन्त्रच., इतर नव्हे

**एकच उदाहरण या सिद्धान्ताची सत्यता पटविण्यास पुरेलः-** देवराज जो इंद्र त्याच्याशिवाय अग्नि, वायु, यम, वरुण इत्यादि सर्व देव, रावणाच्या बंदिवासात होते. त्याच्या स्वभावगुणाप्रमाणें त्यास लंकेंत सक्तमजुरीचीं कामें करावीं लागत होतीं; त्याचें ऐश्वर्य, निवासस्थानें, त्याच्या स्त्रिया इ. सर्व रावणानें बलात्कारानें लुबाडलें होतें. रावण, त्याचा पुत्र इंद्रजित वगैरे राक्षस देवाचे अगदीं हाडवैरी होते. असें असता अमर होण्यासाठीं इन्द्रजित निकुंभिलेंत यज्ञ करीत होता, व त्या अग्निकुंडांत दिव्य रथ त्या अग्नींतून अर्धा-अधिक बाहेर आला होता। हें कसें घडलें? अग्निदेव बंदिवासात असता, त्याच्या व देवाच्या हाडवैऱ्याला तो देव दिव्यरथ देण्यास मनानें तयार होणें सुद्धा अशक्य। मंत्रच देवता असल्यानें व ते मंत्र तपश्चर्येनें व शुक्राचार्य गुरूच्या कृपेनें त्यांनीं सिद्ध केले असल्यानें त्याना फल देत होते. जो अग्निदेव लंकेंत सक्तमजूरीची शिक्षा भोगीत तुरुंगात होता, तो त्या मंत्रदेवतेचा एक चेतन नमुना होता इतकेंच. स्वर्गस्थ सर्व देव विविध मंत्रदेवताचे असेच नमुने आहेत.

**मंत्र म्हणजेच देवता –** मंत्रातच देवता असते व मंत्रांतून, मंत्रानेंच प्रगट होते, याचा अनुभव १९३२।३३ पासून अनेक मंत्राच्या बाबतींत अनेक वेळा घेतला होता. १९३७ सालीं भिवंडी येथें श्री. नायषष्ठीच्या उत्सवात जाणें झालें असता ह. भ. प केशवदत्त महाराज सोनगीरकर यानीं विचारलें कीं "बुवा तुम्हास तीन लाख रुपये दिल्यास तुम्हीं काय कराल?" उत्तर "घेणार नाहीं." 'समजा, त्याचा विनियोग सत्कार्यांत-करण्यासाठीं तुमच्या ताब्यात दिले (तीन लाख रुपये) तर काय कराल?" उत्तर "त्याच्या व्याजातून खर्च करून, योग्य साधकास मंत्रानुष्ठानास लावून मंत्रशास्त्राचें पुनरुज्जीवन करून दाखवूं" असें जें छाती-ठोकपणें सांगितलें गेलें तें पूर्वानुभवावरून खात्री झाल्यानेंच।

गेल्या २८।२९ वर्षांत या लेखकानें शेकडों वेळा अनुभव घेतले, इतकेंच नव्हे तर गेल्या १६ वर्षांत याच्याशीं संबंध आलेल्या, संगति प्राप्त झालेल्या अनेक स्त्रीपुरुष बालवृद्धानींहि अनेक वेळा अनुभव घेतला आहे कीं मंत्र म्हणजेच देवता, इत्यादि. **गायत्री मंत्र सिद्ध झाला कीं कोणताहि मंत्र सहज सिद्ध होतो.**

ऋषि मन्त्रातच असतात याचा अनुभव ऋष्यादि न्यासात घेण्याचा प्रयत्नच केला गेला नाहीं पण जेव्हा प्रणवाचा ऋषि कोण, याविषयीं श्रुतिस्मृतिपुराणादि ग्रथात आणि पोथ्यात मतभेद दिसले, तेव्हा सशय निवृत्तीसाठीं प्रयोगानीं प्रयत्न करणें भाग पडलें व अनुभव आला कीं, मन्त्रर्षि त्या मन्त्रातच असतो व त्याचें स्थान मस्तकात असतें, हेंहि सहज सिद्ध झालें 'अमुक ऋषये नम शिरसि' असा न्यास करण्याची आज्ञा शास्त्रानीं का दिली याचा पूर्ण उलगडा झाला, व त्या वेळीं वर दिलेले भेस्तग्रातलें समग्र वचन आठवलें। काया पुलकित झाली व आनदमग्न वस्थेंत काहीं काळ निघून गेला! शास्त्रकाराच्या उपकारातून कोण कसे मुक्त होतील।

इ स १९०० मध्यें 'गर्भाष्टमेऽब्दे' सध्या शिकविली गेली होती ज्याच्या घरीं वेदपाठशाला परपरेनें चालू होती अशा शुद्ध, सदाचार सपन्न शूद्रप्रतिग्रहपराङ्मुख वृद्ध पुरोहितानीं शिकविली होती तींत 'अगु ष्ठाभ्रे तु गोविन्द' इत्यादि न्यास, सप्तव्याहृति न्यास ऋषिछद देवतादि न्यास, गायत्रीमन्त्रागानीं करन्यास व हृदयन्यास शिकविले गेले होते व त्याचा कधीं विसर पडला नव्हता मुद्रा शिकविल्या होत्या, पण त्याचा काही काळ विसर पडला होता हलींच्या पोथ्या पुस्तकात पाहता फारच छाटाछाट केलेली दिसली, तेव्हा सशोधन सुरू करावें लागलें त्यात आढळलें तें —

गृह्यसूत्रात फक्त गायत्रीमन्त्रानें षडगन्यासच आढळले काहीं निबध कारानीं न्यास कृताकृत असा शेरा मारलेला दिसला, काहींनीं तर न्यास-मुद्रा अनावश्यक 'अवैदिकत्वात्' वेदात सागितलेलें नाहीं म्हणून असा तारीरा झाडलला आढळला, पण अशानींसुद्धा आचमन सागितलें तें पुराणाचमन! श्रौताचमन का नाहीं म्हणून विचारलें तर स्मृतिवचनाचा किंवा गृह्यसूत्राचा आधार पुढें!

केवळ वेद म्हणजेच धर्मशास्त्र नव्हे वेद (श्रुति)-स्मृति पुराण म्हणजे धर्मशास्त्र 'श्रुतिस्मृती उभे नेत्रे पुराण हृदय स्मृतम्' इत्यादि श्लोक व धर्मशास्त्रनिर्णय कसा करावा याची माहिती देवी भागवतात मिळाली वेदाविरोधी नसलेलीं पुराणवचनें, आणि श्रुतिस्मृतिविरोधी नसलेलीं

पुराणवचनें मान्य केलींच पाहिजेत, फार काय पुढेंच म्हटलें आहे, कीं श्रुतिस्मृतिविरोधी नसलेलीं तन्त्रोक्त कर्मे मुद्रा केलीं पाहिजेत.

कोणी म्हणतात न्यास कृताकृत, कोणी म्हणतात गृह्यसूत्रोक्तच पुरेत, कोणी म्हणतात न्यास मुद्रा वेदोक्त नाहींत म्हणून त्याज्य, पण असें म्हणणारे जानवें घालताना "श्रौतस्मार्त-कर्मानुष्ठान-सिध्यर्थं" असेंच सङ्कल्पात म्हणतात पूजादिविविधकर्मांत 'श्रुति-स्मृति-पुराणोक्त-फलप्राप्त्यर्थं' असें म्हणून सङ्कल्प करतात पूजेंत पुरुषसूक्तानें न्यास, घंटामुद्रा, शङ्खमुद्रा, धेनुमुद्रा दाखवितात, षोध्यातहि उल्लेख आहेत श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानाचा अधिकार संध्या न करणाराला नाहीं, इतकें सध्येचें महत्त्व आहे, मग श्रौतस्मार्त कर्मानुष्ठान सिद्धीसाठीं श्रुति व स्मृति यांचीं वचनें मानावयास नकोत काय? श्रुति-स्मृति पुराणोक्त फलप्राप्तीसाठीं, श्रुति-स्मृति-पुराण वचनें मानावयास पाहिजेत कीं नकोत? 'अवैदिकत्वात्' शेरा मारणारा-पुढें कोणी पुराणाविरुद्ध बोलू लागला कीं, **'इतिहास पुराणाभ्यां वेदार्थम् उपबृंहयेत्'** हें वचन चटकन पुढें करतील व सांगतील कीं, वेदाचा अर्थ इतिहास पुराण वचनानीं स्पष्ट करावयाचा असतो कदाचित् **'इतिहासपुराणः पंचमः वेदः'** (छांदो० अ ७) हें वचनहि सांगतील व आणखी हेंहि दाखवितील व सांगतील कीं अहो! इतिहासपुराण सुद्धा अपौरुषेय आहे बृह उपनिषद् २।४।१० पहा वाचकहो! असे 'कृताकृत' 'अवैदिकत्वात्' इत्यादि शेरे मारणाराविषयीं तुमचें काय मत होईल? कोणी म्हणतील कीं, सद्य स्थितींत एवढे न्यास कशाला?

सद्य परिस्थितींत तर गायत्रीजपाङ्गभूत स्मृतिपुराणोक्त न्यास व मुद्रा यांची विशेष आवश्यकता आहे, कारण – उपनयन संस्कारसुद्धा सांगोपांग यथाविधि होत नाहीं, ब्रह्मचर्याश्रम नाममात्र राहिला आहे, नातेवाईकापासून दूर १०।१२ वर्षें गुरुगृहीं निवास नाहीं, गुरुसेवा नाहीं, वेदपठनहि नाहीं, (सार्थपठन = अध्ययन), सुसंगति, सुसंस्कृत अन्नाहार, नाहींत. रोज दोन वेळा अग्निकार्य अग्नीची उपासना नाहीं, देहशुद्धि, वाचाशुद्धि, चित्तशुद्धि सहज होत असे ती नाहीं, सदाचार, देवताप्रसाद, ओजस्विता, तेजस्विता, यांची सहज प्राप्ति होत असे, त्यातील कांहीं नाहींच, पण उलट अनिष्ट संगति, कुसंगति, अनिष्ट वाङ्मय, विपरीत संस्कार, असंस्कृत

अन्न इत्यादि सर्वच विपरीत परिणामकारक! ब्रह्मचर्याश्रमधर्मांचा लोप होऊ नये म्हणून जेथें उपनयनानंतर ७८ दिवसांतच समावर्तन-सोडमुंज करतात, तेथें त्यास 'अनाश्रमी' राहावें लागतें, व जेथें विवाहापर्यंत सोडमुंज करीत नाहींत त्यांच्या आश्रमधर्मांचा लोप होतो! अशा परिस्थितींत देहशुद्धि, इंद्रियशुद्धि व देवताप्रसाद यांची प्राप्ति होण्यासाठीं स्मृति-पुराणोक्त न्यासादि तरी केलेंच पाहिजे ज्या मंत्राचा जप करावयाचा त्याचे विधिन्यास केल्याशिवाय 'देवो भूत्वा देव यजेत्' हें घडणार नाहीं आणि 'अदेवेन च यत् जप्तं सर्वं तत् निष्फलं भवेत्' असें घडेल म्हणून हीं स्मृतिपुराणवचनें लक्षांत घेतलींच पाहिजेत'

श्रुतिः स्मृतिश्च विप्राणां नयने द्वे प्रकीर्तिते ।
काणः स्यात् एकहीनस्तु द्वाभ्यां अन्धः प्रकीर्तितः ॥ (अत्रिस्मृ)

गुरुचरित्रातील वर्णनास याज्ञवल्क्यस्मृति व व्यासस्मृति यांचे आधार टीपांत (क्षामत पोथींत) दिले आहेत कलियुगांत मुख्यत पराशरानें सांगितलेल्या धर्मांचें पालन करावें

कृते तु मानवा धर्माः त्रेतायां गौतमस्य च ।
द्वापरे शंखलिखिताः कलौ पाराशराः स्मृताः ॥
(बृ पारा स्मृ १।२३-२४)

कृतयुगांत मनुस्मृतीनें, त्रेतायुगांत गौतमस्मृतीनें, द्वापरांत शंखलिखित स्मृतीनें आणि कलियुगांत मुख्यत पाराशरस्मृतीनें सांगितलेल्या धर्मांचें पालन करावें

बृ पारा स्मृ अ ३।१ मध्यें 'अक्षराणां तु विन्यासं तेषां चैव तु देवता' सांगतो असा उपक्रम करून पुढें अक्षरन्यास आणि अक्षरदेवता व तत्त्वें यांचें वर्णन केलें आहे

यदक्षरेषु दैवत्यं चतुर्विंशतिपूच्यते ।
सन्न्यासं, यत्विबोधेन कुर्वन् ब्रह्मत्वमाप्नुयात् ॥

असें अक्षरदेवताज्ञानासह अक्षर न्यासाचें फळ सांगून चोवीस अक्षरांच्या देवतांचें वर्णन केलें आहे

पादांगुष्ठादिमूर्धान्तं आत्मनो वपुषि न्यसेत् ।
अक्षराणि च सर्वाणि याञ्छन् ब्रह्मत्वं आत्मन. ॥ (अ ३।२६)
गायत्रीन्यस्त-सर्वांगो गायत्री ब्रह्म उच्यते ॥ (३।३०)

श्लो ७४ पासून अक्षरन्यासाची स्थानें त्या अक्षराचे वर्ण व अक्षराच्या न्यासानें होणारे फायदे यांचें वर्णन आहे

पद्म पु व अग्नि पु यात मुद्रा तत्त्वाचें ज्ञान व स्मरण अक्षरन्यास आणि मुद्रादर्शन आवश्यक म्हणून सांगितलें आहे दे भागवतातहि हें सर्व आवश्यक म्हणून सांगून वर्णन केलें आहे

चतुर्विंशति तत्त्वानां प्रत्येकं स्वाक्षरेषु च. ।
गायत्र्या. संस्मरेत् योगी स याति ब्रह्मण. पदम्॥ (१।७२)-
'एता अक्षर देवता ।
जपकाले तु संचिन्त्य तासां सायुज्यता व्रजेत् ॥'
सर्व पापविनिर्मुक्तो ब्रह्मण पदवीं व्रजेत् ॥'

अक्षरन्यासाचें फळ—

'एतान् विन्यस्य धर्मात्मा ब्रह्माविष्णुशिवात्मक ।
महायोगी महाज्ञानी परं निर्वाणकं व्रजेत्।'
विष्णुसायुज्यता व्रजेत्'

पण न केल्यास–

य एना नैव जानाति स शूद्रात्परत स्मृत ।
विद्या वित्त द्विजत्वादि सर्वं च निष्फलं भवेत् '

' पद्म पु सृ ख ४३।१७५–१९२ पहा

गोविन्दादि नामांनीं करन्यास, प्रणवन्यास, समस्त्याहृतिन्यास, कल्यादिन्यास वगैरे न्यास आणि मुद्राप्रदर्शन आवश्यक म्हणून वर्णिलें आहे पाराशरस्मृति, बृहत्पाराशरस्मृति वृध्दपारा लघुपाराशर इत्यादि १८ स्मृति हस्तलिखित पोथ्याच मिळाल्या व त्याहि अत्यंत अशुद्ध म्हणून छापील पद्म पुराण व अग्नि पु यांतील वर्णनच अक्षरन्यासादिकांसाठीं घेतलें आहे पद्म पु व अग्नि पु यांतील वर्णन अगदीं तंतोतंत सारखें आहे

पुस्तकात छापलेल्या पाठातील दोष पादटीपातील पाठभेदावरून दूर करता आले योगी याज्ञवल्क्य ( स्मृति ) तर २४ अक्षरानाच २४ तत्त्वें मानतात व हें न्यासमुद्रादि सर्व आवश्यक म्हणतात

माध्यादिन आन्हिक सूत्रावलींत पादटीपेंत वचन आहे कीं:—

**' तस्माद् आचार्येण अध्येतॄणां एताश्चतुर्विंशति मुद्रा· इतिकर्तव्यतया अवश्यमेव शिक्षणीया·'** माव हा कीं, सध्या शिकविणाऱ्या आचार्यांनें आपलें एक आवश्यक कर्तव्य जाणून या २४ मुद्रा सध्या शिकणाराना जरूर जरूर शिकवाव्या

वर उल्लेखिलेले व इतर अनेक आधार स्मृतिपुराण ग्रथात असता, व त्यातील एकहि ग्रथ तत्रमार्गाचा नसता सध्येविषयीं ग्रथ लिहिताना याचा आवश्यक म्हणून उल्लेख न करणें म्हणजे शास्त्रमत व नियम लोकरजनार्थ लपवून ठेवून बुद्धिभेद करण्यासारखें आहे हल्लींच्या काळात कोणी करणार नाहींत म्हणून गाळणें हा लेखकाचा-सपादकाचा मोठा दोषच ठरेल असा दोष न कळत मुद्रा पदरात पडू नये—आणि कर्मीत कर्मी किती केलें पाहिजे याविषयी निर्णय करण्यासाठीं अनेक ग्रथ जमवून, अवलोकन करून टाचणें लिहावीं लागलीं हस्तलिखित स्मृतींत तर अनुक्रमणिकाचाहि पूर्ण अभाव ² कोणी करोत न करोत, पण साधकास अधारात ठेवल्याचा दोष ग्रथकर्त्याकडे येणार नाहीं व जे कोणी भाग्यवान् करतील त्याचें कल्याण होईल, व असे थोडे तरी निघणारच. ' बहुरत्ना हि वसुधरा '

गायत्री ' तत्त्वार्थवर्णात्मिका ' आहे तिच्यातील चोवीस अक्षरानीं चोवीस तत्त्वाचा बोध केला जातो चोवीस अक्षराच्या रूपानें जणू-चोवीस तत्त्वें मत्रात आहेत, म्हणूनहि कोणतें अक्षर कोणत्या तत्त्वाचें निदर्शक आहे हें कळणें जरूर आहेच

वर्णाक्षरें, देवता, न्यासस्थानें, तत्त्वें व मुद्रा याचें ज्ञान सहज व्हावें म्हणून कोष्टकरूपानें तो तक्ता पुढें दिला आहे

न्यासादिक कृताकृत आहेत असा भ्रम घालविण्यास फक्त एकच आधार सापडला, तो सगळाच देणें इष्ट वाटतें ( दे भा स्क १२।१ )

सन्ध्यासु चार्घ्यदानं च गायत्री जपमेव च ।
सहस्रत्रितयं कुर्वन् सुरै पूज्यो भवेत् मुने ॥ ९ ॥
न्यासान् करोतु वा मा वा गायत्रीमेव चाऽभ्यसेत् ।
ध्यात्वा निर्व्याजया वृत्त्या सच्चिदानन्दरूपिणीम् ॥ १० ॥

'तिन्ही सध्येंत अर्घ्यदान व गायत्रीचा तीन हजार जप, सच्चिदानद-रुपिणी गायत्रीचें ध्यान, पूर्ण एकाग्र चित्तानें करीत गेला तर हे नारदा, तो जापक सर्व देवास पूज्य होतो, मग तो न्यास करो वा न करो' असें श्रीनारायणानीं नारदमुनींस सांगितलें आहे पूर्ण एकाग्रता नसता जे रोज तीन हजार जप करतील त्यानींसुद्धा वर दिलेल्या, अपवादाचा आधार घेणें आत्मघातकीपणाचें ठरेल। मग इतरानीं तो आधार घेणें किती योग्य व हितकारक होईल याचा वाचकानींच विचार करावा हे न्यास व मुद्रा करण्यास ५।७ मिनिटेंसुद्धा लागत नाहींत, म्हणून वेळ नाहीं ही सबब अगदी लगडी, 'न करत्याचा वार शनवार' अशासारखीच

अकराव्या स्कधात एकदा ऋषि, छद, देवता, न्यास वगैरे सर्व माहिती त्या चोवीस अक्षराविषयीं दिलेली असता वरील अपवाद सागितल्यावर पुन्हा नारायण नारदास सागतात कीं,

अथातः श्रूयतां ब्रह्मन् वर्णऋष्यादिकांस्तथा ।
छंदांसि देवतास्तद्वत् क्रमात्तत्त्वानि चैव हि ॥

असा उपक्रम करुन पुन्हा सर्व सागण्यात हेतु हाच आहे कीं, पूर्ण एकाग्र चित्तानें गायत्रीचे ध्यान करीत तीन हजार जप करणें ज्याना जमत नसेल, शक्य नसेल त्यानी हें सर्व न्यासादि केलेंच पाहिजे कारण त्यामुळें मनाची व चित्ताची शुद्धि होत जाईल व त्या अक्षर देवताच्या प्रसादानें एकाग्र-चित्तानें ध्यान करीत जप करणें हळुहळू साधेल जशा प्रकारें तीन हजार जप करता येऊ लागल्यावर त्यानीं न्यास न केले तरी चालेल, दोषार्ह होणार नाहीं, पण त्यानीं करुच नयेत असें नाहीं •

## मुद्रा–

आवाहन पूजनानतर शापविमोचन करुन मुद्रा दाखवावयाच्या असतात मुद्रा म्हणजे हातानीं मुख्यत दोन्ही हाताच्या बोटानीं मिळून करा-वयाच्या–दाखवायच्या आकृति– देवपूजेंत मुद्रा घटामुद्रा, शखमुद्रा,

कुंभमुद्रा, धेनुमुद्रा वगैरे विशिष्ट वेळीं विशिष्ट ठिकाणीं दाखवाव्या लागतात व पोथ्यांतहि त्यांचे उल्लेख आहेत लहान मुलें जो वाघाचा डोळा करून त्यांतून पाहतात ती आकृति पाशमुद्रा होय या विविध मुद्रा करताना मनगटाच्या जवळचा, त्याच्यापुढील भाग, बोटें, बाहू वगैरे निरनिराळ्या ठिकाणीं दाब-ताण पडतो व तसा तो न पडला तर मुद्रा व्यवस्थित होतच नाहींत तो दाब पडण्यानें त्या त्या ठिकाणच्या शिरा, उभयविध रक्तवाहिन्या, स्नायू व ज्ञानतंतु इत्यादिकांवर दाब पडतो व त्याचा परिणाम, पाठीच्या कण्यातून मेंदूत जाणाऱ्या मुख्य नाड्यावर व त्याच्या योगें मनाचें कार्य करणाऱ्या मेंदूवर होतो उदा फार लेखन करणाऱ्याच्या करंगळीच्या मधल्या पेरावर सतत दाब पडत असतो व घर्षण होत असतें, आणि लेखणी धरावयाच्या बोटाच्या अग्रावर सतत दाब पडतो व अनामिकेसह तीं सर्व बोटें सारखीं थकलेलीं राहतात या अतिरेकाचा परिणाम मेंदूवर होतो, पण वाईट परिणाम मेंदूपर्यंत वर जाणाऱ्या ज्ञानतंतूवर (ॲफरेंट नर्व्हज्‌वर) होतो व प्रतिक्रिया सुरू होते, मेंदूतून-ज्ञानतंतूतून पाठीच्या कण्यातून, हाताकडे उलट गति सुरू होते, ती कंपरूपानें अनुभवास येते, हाताला कंप सुटतो, त्याला लेखक-कंप (राइटर्स क्रॅम्पस्) म्हणतात टाईपरायटरवर फार काम करणारास व (टेलिग्राफ्) तारेनें सदेश पाठविणाऱ्यांना सुद्धा साधारण तशाच प्रकारचा कंप सुरू होतो, त्यासहि विशिष्ट नावें आहेत

सोमल, बचनाग, कुचलाबी, गंधक वगैरे जिनस प्रमाणाबाहेर खाल्ले तर दुष्परिणाम होतात, पण योग्य व अल्प प्रमाणात दिले घेतले गेले तर अनेक रोग बरे होतात स्ट्रेप्टोमायसिन, क्लोरोमायसिन, कोमायसिन वगैरे अलीकडील औषधात गंधक मुख्य असतो म्हणून त्यास सल्फा ड्रग्ज् (गंधकी औषधें) म्हणतात त्यानीं क्षयरोग, टाइफाईड, टायफस वगैरे असाध्य समजले जाणारे रोग बरे होतात. त्याप्रमाणेंच या मुद्रा दिवसातून तीनच वेळा केल्या कीं यांचा औषधाप्रमाणेंच मेंदूवर व मनावर सुपरिणाम होतो मनाचें संचालकत्व मध्य मेंदूच्या मागच्या मानेवरील डोक्याच्या भागात आहे मेंदूतील व मनातील दोष या मुद्रानीं दिलेल्या प्रमाण मंद गतीनें कमी कमी होत जातात

पावित्र्य हेंच देवत्व व दोष, अपवित्रता म्हणजे राक्षसत्व

मुदं ददाति देवानां द्रावयत्यसुरानपि (मुद्रा)

मुद् आनद, आल्हाद, देवाना आनद देणारी व असुराना पळवून लावणारी, म्हणून 'मुद्रा' म्हणतात चागली सवय झाली म्हणजे २४ मुद्रा व्यवस्थित करण्यास दोन मिनिटेंहि लागत नाहींत दैवीसपत्तीची उत्पत्ति व वृद्धि आणि आसुरी, राक्षसी सपत्तीची हकालपट्टी हें द्विविध कार्य मुद्रा करतात मन पवित्र होत गेलें की, चित्ताची एकाग्रता आधिकाधिक होत जाते खरें सुख चित्ताच्या एकाग्रतेतच मिळतें कारण त्या अवस्थेंत मन चित्त आनदस्वरूप-सुखस्वरूप परमात्म्याच्या अगदीं समीप असतें विषयाचा पडदा मध्ये नसतो विषयसेवनात जो आनद होतो, जें सुख मिळतें तें सुद्धा अगदीं क्षणभर, त्या विषयाच्या प्रेमामुळें, त्याच्या सेवनात होणाऱ्या एकाग्रतेमुळेंच मिळतें! सिगारेटवर फार प्रेम करणाऱ्या माणसास एक वीतभर लाब सिगारेट अगदीं उत्तमोत्तम तबाखूची करून दिली, आणि 'तुला सिगारेट फार आवडते ना? ही ओढ पाहू सपेपर्यंत, असें सागितलें तर तो ओढील काय? मुळींच नाहीं! का बरें? फार आवडते, आनद देते ना? सगळी ओढ म्हणजे पुष्कळ सुख मिळेल! पण तिचा स्वाद घेण्यात मन जितका वेळ एकाग्र राहतें, तितका वेळच ती गोड सुखद वाटते, व नतर ती नकोशी वाटते विषयानदाचा स्वाद फार वेळ घेता येत नाहीं निर्विषय सुखाचा स्वाद कितीहि घेतला तरी कटाळा येत नाहीं, वीट येत नाहीं देह अमर करणारें स्वर्गीय अमृत सुद्धा त्यास्त पिववणार नाहीं वीट, कटाळा, येईल, पण इद्रियातीत सुखाचा आनदाचा कधीं कटाळा येत नाहीं, परतु ता मिळविणें मनावर अवलबून आहे, कारण–

'मन एव मनुष्याणा कारणं सुखदु:खयो '(श्रुति)

धर्मकार्यातील विविध कलाकृतींचा जो परिणाम होतो तो अतिसूक्ष्म होत असल्यानें काहीं काळ इद्रियाना अज्ञात राहतो, तसा फार सेवनानें होत राहिलेला दुष्परिणाम दीर्घकाळ अदृश्य असतो पण काहीं काळानें कळतो, दृश्य होतो, तसेंच धर्मकर्मांनीं होणाऱ्या सूक्ष्म परिणामाचें आहे

हें वाचणारानीं एकच मुद्रा प्रथम करून पाहावी, ती अशी – दोन्ही हाताचे तळवे एकमेकास चागले चिकटवून, प्रत्येकाचीं पाची बोटें एकमेकास चिकटवलेली ठेवून, दोन्ही हाताची बोटें, चिकटवून हात आपल्या समोर धरावे नतर प्रत्येकाचीं मधलीं तीन बोटें, त्यात अतर पडू न देता फक्त तिन्ही पेरेंच दुसऱ्याच्या तीन्ही पेरास स्पर्श करणार नाहींत अशी टोंकाकडून फाकवावीं दोन्ही करगळ्या पूर्ण चिकटवलेल्या ठेवून त्या अनामिकापासून दूर न्याव्यात तसेंच दोन्ही आगठे जोडलेले ठेवून तर्जनीपासून मागें दूर न्यावे, म्हणजे कुठें कसा दाब पडतो हें कळेल प्रथम हें उत्तम प्रकारें साधणार नाहीं. जोडलेल्या करगळ्या अनामिका-पासून दूर नेऊ लागताच, अनामिका मध्यमापासून दूर जाऊ लागतील! 'शितावरून भाताची परीक्षा' 'थोडक्यात उमजे सुजाना' या प्रयोगानें खात्री होईल की मुद्रा करण्यात काहीं वैशिष्ट्य आहे प्रत्येक मुद्रेंत निरानिराळ्या ठिकाणीं दाब पडतो

जे अनेक पुरुष, अनेक ठिकाणीं, मुद्रा करणारे भेटले ते करतात त्या मुद्रा व प्रथोक्त लक्षणें याचा १।२ मुद्राशिवाय जराहि ताळमेळ नाहीं! य प्रत्येकाच्यात वैचित्र्य? यमपाश व धेनु-(सुरभि) मुद्रा मात्र सर्वत्र साधारण सारख्याच आढळल्या तरी, अगदीं बिनचूक नाहीतच!

वर जें सागितले तें द्विमुख मुद्रेचें लक्षण होय जोडलेल्या दोन करगळ्या हें एक मुख व जाडलेले दोन आगठे मिळून होणारें दुसरें मुख!

मुद्राचीं लक्षणें मूळ श्लोकानुसार, वर दिल्याप्रमाणें अगदीं स्पष्ट सोप्या शब्दात मूळ श्लोकासह पुढें एका प्रकरणात दिलीं आहेत

न्यासामध्यें प्रथम गोविन्द, महीधर इत्यादींचा न्यास क्रमानें अगुष्ठ तर्जनी इत्यादिकावर करावयाचा असतो, तेव्हा असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, हीं नावें व अगुष्ठादिस्थानें याचा काहीं सबध आहे कीं, उगाच काहीं तरी बादरायणसबध जोडला गेला आहे सबध आहे व फार सयुक्तिक आहे हें पुढील प्रकरण वाचल्यानें कळेलच पण ज्या ऋषींनी तो रूढ केला त्याच्या बुद्धिमत्तेची गाश्चर्य वाटवा करावीशी वाटेल!

पुढील पृष्ठावर गायत्रीच्या २४ वर्णादिकाचें तेरीज दिलें आहे

## गायत्रीचीं अक्षरें, देवता तत्त्व, न्यासस्थान व मुद्रा याचा तक्ता

| अक्षर | देवता | तत्त्व | न्यासस्थान | मुद्रा |
|---|---|---|---|---|
| तत् | अग्नि | पृथ्वी | पायाचे आगठे | सम्मुख |
| स | वायु | आप | गुल्फ-घोटे | सम्पुट |
| वि | रवि | तेज | पोटऱ्या | विततं |
| तु | विद्युत् | वायु | गुडघे | विस्तृत |
| व | यम | आकाश | मांड्या | द्विमुख |
| रे | वरुण | गन्ध | गुह्य (गुद) | त्रिमुख |
| णि | बृहस्पति | रस | लिंग | चतुर्मुख |
| य | पर्जन्य | रूप | कटिदेश | पंचमुख |
| भ | इन्द्र | स्पर्श | नाभि | षण्मुखम् |
| र्गो | गंधर्व | शब्द | उदर पोट | अधोमुखम् |
| दे | पूषा | उपस्थ | दोन्ही स्तन | व्यापकांजलिक |
| व | मित्रावरुणौ | पायु | हृदय | शकट |
| स्य | त्वष्टा | पाद | कण्ठ | यमपाश |
| धी | वसव | पाणि (हात) | मुख | ग्रथित |
| म | मरुत | वाचा | तालु | सन्मुखोन्मुखम् |
| हि | शशी | घ्राण | नासिकाग्र | प्रलम्ब |
| धि | अंगिरा | जिव्हा | दोन्ही नेत्र | मुष्टिक |
| यो | विश्वेदेवा | चक्षु | भ्रूमध्य | मत्स्य |
| यो | अश्विनीकुमार | त्वक् | ललाट | कूर्म |
| न | महादेव | श्रोत्र | पूर्वमुख | वराहक |
| प्र | सर्वदेवता | मन | दक्षिणमुख | सिंहाक्रान्त |
| चो | रुद्र | बुद्धि | पश्चिममुख | महाक्रान्त |
| द | ब्रह्मा | महत्तत्त्व | उत्तरमुख | मुद्गर |
| यात् | विष्णु | अव्यक्त | मस्तक | पल्लवम् |

प्रकरण २२ वें

# गोविन्दादि नामांचा अंगुष्ठादिकांशीं संबंध

अंगुष्ठाग्रे तु गोविन्दं तर्जन्यां तु महीधरम् ।
मध्यमायां हृषीकेशं अनामिक्यां त्रिविक्रमम् ॥ १ ॥
कनिष्ठिक्यां न्यसेत् विष्णुं करमध्ये तु माधवम् ।
एवं तु करविन्यासं सर्व-पाप-प्रणाशनम् ॥२॥

गोविंदाचा अंगुष्ठाशीं, महीधराचा तर्जनीशीं, हृषीकेशाचा मध्यमेशीं, त्रिविक्रमाचा अनामिकेशीं, कनिष्ठिकेचा विष्णूशीं व माधवाचा करतलाशीं कांहीं संबंध आहे कीं, कांहीं संबंध नसतांच नुसता बादरायण संबंध जोडला गेला. अशी शंका हे न्यास लिहीत असतां या लेखकालाच आली. शंका आपलें समाधान आपल्या पाठीवरच घेऊन येते हा अनुभव जसा अनेक वर्षे येत राहिला; तसेंच या शंकेचें समाधान तत्काळ स्फुरण पावूं लागलें; जें स्फुरलें तेंच खालीं दिलें आहे.

१. गोविन्द व अंगुष्ठ–गो = पृथ्वी, कोणताहि घन पदार्थ, मिळविणारा तो गोविन्द. आगठा नसेल, वापरला नाहीं तर, कोणताहि लहान मोठा घन पदार्थ हातानें घेतां उचलतां-येत नाहीं. ६।७ महिन्यांच्या बालकापुढें एक लहानसा खडीमाखरेचा खडा टाकला कीं, त्यास कोणी शिकविलेलें नसताहि तें बालक आगठा व तर्जनी, किंवा आगठा व अनामिका यांनींच तो खडा उचलून घेतें व तोंडांत घालतें. यावरून सिद्ध होतें कीं, गो-विन्दत्व आगठ्याच्या ठिकाणीं निसर्गतःच आहे. मनुष्याच्या आगठ्याच्या ठिकाणीं गो-विन्दत्व जसें आहे तसेंच माकडाऱ्यादि

ठिकाणीं असलेलें आढळतें कोणी काहीं मागू लागला, व तें त्याला मिळू द्यावयाचें नसलें म्हणजे आगठाच दाखवितात।

**२ महीधर व तर्जनी**– महीधर = सहस्र फणाचा शेषनाग एकच फणा असलेला नाग डोकें चांगलें वीतभर वर उचलून फणा पसरून बसलेला कोणास अचानक दिसला कीं कोणीहि भीतीनें प्रथम चार पावलें मागें सरेल-सरता उजवा हात वर उचलून, फक्त तर्जनी ताठ उघडलेली ठेवून ती नाकासमोर धरली कीं काहींहि न बोलता, धाक दाखविला जातो तर्जनी = धाक दाखविणारी, भेडसावणारी जगातील कोणत्याहि देशात धाक दाखविण्यास तर्जनीचाच उपयोग केलेला आढळेल एकाच बोटानें फटका मारण्याचें सामर्थ्य तर्जनीसारखें इतर कोणत्याहि बोटात नाहीं नागसुद्धा फणा वर उचलून जारानें खालीं करून फटका मारतो

**३ हृषीकेश व मध्यमा**– हृषीकाचा इंद्रियाचा-जो ईश तो हृषीकेश, इंद्रियावर सत्ता चालविणारा, त्याना आपल्या तंत्रानें चालना देणारा मध्यमा व इतर चार बोटें याचा अगदीं तसाच संबंध आहे हात पसरून उताणा सरळ धरावा, आणि मध्यमा (मधले बोट) हालवावी, म्हणजे दिसेल कीं बाकीचीं सर्व बोटें मधल्या बोटाच्या तंत्रानें हालतात, आगठा 'गोविन्द' दूर असला तरी थोडा हालतोच, महीधर धाक दाखविणारा खरा पण हृषीकेशाच्या तंत्रानेंच वागतो। इतकें संचालकत्व मध्यमेशिवाय इतर बोटात नाहीं असाच हृषीकेश सर्वांच्या इंद्रियाचा चालक आहे

**४ त्रिविक्रम व अनामिका** ज्यानें त्रिपाद विक्रम केला त्या बटू वामनाचें यात नाव नाहीं, नाव न घेण्यासारखा अगदीं खुजा बटू! वामनमूर्ति! पण त्यानेंच आपल्या एका पावलानें सगळी पृथ्वी व्यापली, दुसऱ्या पावलानें ब्रह्मलोकापर्यंतचे सर्व लोक व्यापले' व पावलाचीं बोटें ब्रह्मलोकात पसरलीं! ब्रह्मलोक विराट्पुरुषाचें मस्तक आहे 'पद पाताल शीर्ष अजधाम' विराट पुरुषाच्या मस्तकावर, बटूच्या पायाचा आगठा जाऊन बसला! ब्रह्मदेवानें पाचवें मस्तक ज्या अगुलीनें कापलें गेलें तिचें नाव उच्चारणें अधर्म म्हणून तिला अनामिका म्हणतात, पण तिचा प्रताप विक्रम एवढा कीं सर्व देवाच्या मस्तकावर तिचें अग्र बसतें! इतकी ती पवित्र आहे देवाची सद्गुरूची पूजा करताना चदन लावण्यास,

कपाळावर गंध लावण्यास फक्त तिचाच उपयोग केला जातो. सोन्याचें पवित्रक तिच्याच मधल्या पेरावर; जपाची माळ तिच्याच मधल्या पेरावर! करमालेनें जपसंख्या मोजण्याचा प्रारंभ तिच्याच मधल्या पेरापासून! तर्जनी वर महीधर! त्याचें मुख विषारी! तिचें अग्र देवपूजेंत कशालाही लागता उपयोगी नाहीं; माळेच्या मण्याला तिचा स्पर्श होता उपयोगी नाही! तिच्या नशिबीं रुप्याचें पवित्रक! अ-नामिका असून त्रिविक्रमा-सारखा तिचा विक्रम-प्रताप!

५. विष्णु व कनिष्ठिका– व्यापणारा म्हणून विष्णु. लांबी, उंची, रुंदी, वितीनें-वितस्तीनें मोजतात अंगठ्याच्या अग्रापासून प्रारंभ करुन कनिष्ठिकेचें-करंगळीचें अग्र जेथपर्यंतच्या भागास व्यापू शकतें, तो भाग वीतभर-वितस्तिमात्र! ब्रह्मदेवाचा देह म्हणजे ब्रह्मांड! पण गोपाल-कृष्णाची स्तुति करताना ब्रह्मदेव आपल्या देहाबद्दल काय म्हणाले पहा :– 'क्वाऽहं तमो महदहं-खचराग्निवार्भू-संवेष्टिताण्डघटसप्तवितस्तिकायः' (भाग १०।१४ ब्रह्मस्तुति) फक्त सातच वितीचा ब्रह्मांडरूपी देह असा मी क्षुद्र कुठें? ब्रह्मांडरूपी देहाचें माप सुद्धा करंगळीच्या-कनिष्ठिकेच्याच-साह्यानें करता आलें!

६ माधव आणि करमध्य (करतल) मा-लक्ष्मी, धन संपत्ति, द्रव्य इ. तिचा जो स्वामी, पति, मालक, तो माधव तीर्थ प्रसाद, पैसे, पेढे, दक्षिणा वगैरे कोणीं तुम्हास देऊं लागला की चटकन करतलच पुढें पसरला जातो; व त्यावर जें काहीं दिलें, ठेवलें जाईल त्याचा तो स्वामी, मालक, पति होतोच. करमध्य असा माधव आहे.

लक्षांत ठेवाचें कीं पायाच्या बोटाच्या ठिकाणीं असा प्रभाव नाहीं, म्हणून या नावानीं पदन्यास नाहींत. आश्वलायन व तैत्तिरीय ग्रंथ्यात या सहाच नावाचा व स्थानाचा उल्लेख आहे. शुक्लयजुर्वेदीय मा०श्वा०सूत्रा-वलींत 'करपृष्ठे हरिं' व 'मणिबंधे जनार्दनम्' इतकें अधिक आहे. एक वृद्ध माध्यंदिन शाखेचे मटजी भेटले, त्यास विचारता ते म्हणाले कीं, आमच्या परंपरागत पाठात हें आधिक्य नाहीं. हरि व जनार्दन या नावाच्या अनेक अर्थांपैकीं एकाहि अर्थाचें साम्य करपृष्ठ व मणिबंध-मनगट याच्याशीं नाहीं।

सेवकांचीं पापें, शत्रूचीं शिरें, भक्तांचे भवरोग हरण करणारा तो हरि, जन म्हणजे विशिष्ट दैत्य, जन म्हणजे जन्म [व मरण] जन = उत्पन्न होणारें झालेलें यांचा संहार करणारा तो जनार्दन, असे अर्थ आहेत

गोविन्दादि सत्रा नामाच्या न्यासाचे श्लोक व न्यास ज्या कोणी महापुरुषानें रूढ केले तो कोणीतरी महर्षि असला पाहिजे हे न्यास व श्लोक कुठल्यातरी पुराणात वाचल्याचें स्मरतें, ती स्मृति जर बरोबर असेल तर महर्षि व्यासच याचे ऋषि मानावे लागतील

हे न्यास करताना गोविन्दादि नामाच्या अर्थानुसार भावना कशा असाव्यात, या वाटानीं व्यवहारात कोणतीं कृत्यें करावीं, कोणतीं करू नयेत, हें सांगण्याचें हें स्थान नाहीं तथापि थोडा सुविचार केल्यास कोणालाहि या गोष्टी सहज ठरविता येतील

या न्यासानंतर प्राणन्यास व सप्तव्याहृतिन्यास करावयाचे असतात म्हणून त्यांचे विविध अर्थ पुढील प्रकरणात स्पष्ट केले आहेत

* * *

प्रकरण २४ वें

# प्रणव व्याहृतींचे अर्थ

## प्रणवाचे विविध अर्थ

ओंकार, प्रणव, तार, प्रलय, सूक्ष्म इत्यादि अनेक शब्द प्रणवाचेच पर्याय आहेत ओंकारानें जे परिणाम होतात, तदनुसार हीं नावें आहेत.

ओंकार=(१) ओम्. अवति इति ओम् (आचार्य, अमरव्याख्या सुधा.) जन्म, दुःख, पातकें इत्यादिकापासून रक्षण करणारा (२) ऊर्ध्वं उन्नमयति, ऊर्ध्वगति देणारा म्हणून ओम्. 'ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था' (भ गी.) जे सत्त्वगुणसपन्न होतात त्याना उच्च गति, उत्तम गति मिळते. म्हणून ठरलें कीं ओंकाराच्या शुद्ध उच्चारानें व चिंतनानें सत्त्वगुणाची वृद्धि पूर्णता होते (३) उच्चारण्यानेंच प्राणाना ऊर्ध्वगति देणारा (अथ०)

प्रणव-(१) प्र-णूयते-प्रकर्षेण स्तूयते अनेन. ज्यानें उत्कृष्ट प्रकारें (परमात्म्याची) स्तुति केली जाते तो. (२) उच्चार्यमाण. एव प्राणान् सर्वान् परमात्मनि प्रणामयति इति. केवळ उच्चारानेंच सर्व प्राणाना परमात्म्यात पूर्णपणें नमविणारा (३) उच्चार केल्यानेंच ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद याचें सार जें ब्रह्म तें ब्राह्मणाना अनायासें प्राप्त करून देणारा (अथ०)

तार- उच्चार करण्यानेंच गर्भवास, जन्म, व्याधि, आधि, जन्म-मरण यानीं युक्त असलेल्या ससार-ससृति-रूपी महाभयातून तारतो म्हणून तार म्हणतात व त्रायते, रक्षण करतो म्हणूनहि तार म्हणतात.

*प्रलय- सर्व प्राणाचा परमात्मस्वरूपात-परब्रह्मामध्यें लय करतो म्हणून* त्याला प्रलय म्हणतात. 'प्राण- चित्तेन सयुक्त चित्त प्राणेन संयुतम्'

(श्रुति) चित्त आणि प्राण एकत्र असतात प्राणाचा लय झाला कीं चित्ताचा, बुद्धीचा व जीवाचाहि परब्रह्मात समग्र लय होतो

सूक्ष्म– उच्चार करताच सूक्ष्म बनून सर्व शरीरात भरतो व सर्व अवयवाचा परामर्श घेतो म्हणून सूक्ष्म म्हणतात (अथर्वशिर-उ०)

ओम् इति ब्रह्म (तै० श्रुति) 'ओम् इति एकाक्षर ब्रह्म' (तारा०उ०) 'ओम् इति एकाक्षर ब्रह्म (भ गी) 'प्रणव हि अपर ब्रह्म, प्रणव च 'पर.स्मृत' (श्रुति) प्रणव=ओंकार म्हणजेच परब्रह्म, जे निर्गुण, निराकार निरजन इत्यादि प्रकारें निषेधमुखानें वर्णिलें जातें तें, आणि अपरब्रह्म = परमेश्वर, सगुण निराकार, सगुण साकार ब्रह्म (नारायण, विष्णु राम, कृष्ण शिव, इत्यादि) 'तस्य (ईश्वरस्य च एक) वाचक प्रणव (पा यो सू) प्रणव ओ हें परब्रह्माचें, परमात्म्याचें, परमेश्वराचें, जो एकच आहे त्याचें नाव आहे नाम आणि नामी (ज्याचें नाव तो) यात अभेद असतो, मात्र हा नियम मनुष्यादिकाच्या बाबतीत लागू नाहीं ओं आणि ब्रह्म एकच, पण नामाच्या साह्यानें जशी त्या विशिष्ट मनुष्याची ओळख भेट होऊ शकते, त्याप्रमाणेंच भगवताच्या, परमात्म्याच्या नामानें परमात्म्याची ओळख प्राप्ति होऊ शकते

ओंकारहि सर्वव्यापक आहे 'ओम् इति एतद् अक्षर इद सर्वम्' (मा उ) 'हें या शब्दानें सुचविलें जाणारें सर्व म्हणजे विश्व ओं म्हणजे ब्रह्मच आहे भूत, भविष्य, वर्तमान व त्रिकालातीत असलेलें सर्व ओम् आहे

ओंकार पुरुष व गायत्री प्रकृति (पति पत्नी) याच्यापासून सर्व वेदादि वाङ्मय व सर्व जग याची उत्पत्ति व शेवटीं त्या प्रणवातच सर्वाचा लय होतो वगैरे सविस्तर वर्णन बृह पारा अ ३ मध्यें आहे

ओंकार सर्वव्यापी अनत, सूक्ष्म आहे इत्यादि वर्णन अथर्वशिर उपनिषदात आहे सर्व याच्य वस्तु प्रणवात्मक आहे (अथ० शिखा०)

न्यासात प्रणवाच्या अकार, उकार व मकार या तीन मात्राचा न्यास तीन ठिकाणीं करावयाचा असतो या तीन मात्रा वेदत्रय देवत्रय गुणत्रय, लोकत्रय अवस्थात्रय अग्नित्रय कालत्रय लिंगत्रय इत्यादि सर्व त्रैतनिदर्शक आहेत

## व्याहृति

भू भुव स्व (सुव) यास समस्त (एकत्र केलेल्या) व्याहृती म्हण तात ओं भू ओं भुवः ओं स्व (सुव) यास व्यस्त (सुम्या सुम्या) महाव्याहृती म्हणतात भू, भुव, स्व, मह, जन, तप व सत्यम् या सातांना सप्तव्याहृति म्हणतात सामान्य अर्थानें ही सात लोकांची नांवें आहेत

**भू**--भूमि हा मर्त्य लोक भवन्ति भूतानि अस्याम् जिथें विविध स्थावर जंगम भूतें जन्मास येतात, उद्भवतात ती भूमि-मृत्युलोक-ही पृथ्वी भू-सत्

**भुव**--अवकाश, स्थिति देऊन सर्व विश्वाला प्रकाशात आणतो तो लोक, अंतरिक्ष लोक चित्

**स्व**.-(सुव)--तैत्तिरीय सुव उच्चार करतात स्वर्ग लोक देवांचें वसतिस्थान उत्तम प्रकारचें (विषयभोगादि) सुख जेथें प्राप्त होतें तो आनंद.

**मह**.-महर्लोक सर्वांना सर्व प्रकारें पूज्य असलेलें स्थान

**जनः**--जनलोक सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं आकाशादि सर्वांस स्वत पासून जन्म देणारा

**तप**- सर्वज्ञ, सर्व प्रकारचें ज्ञान-बोध देणारा, सर्वांचें शासन करणारा तापक, तपोलोक,

**सत्यम्**- *ज्याच्या स्वभावादिकांत कधींहि विपर्यास, उलटापालट,* बदल होत नाहीं देश काल व इतर प्रमाणें यानीं ज्याचा कधीं बाध, निरास होत नाहीं तें ब्रह्मलोक

**ओं भू. भुव स्वः महः जन. तप सत्यम्** याचा परस्पर संबध (पुढील विचार २।११।६१ रोजीं २ वाजून १० मिनिटांनीं स्फुरला भू भुव स्व = सत्, चित् व आनंद हे अनेकांनीं सिद्ध केलें आहे पण पुढील कोठें वाचण्यात ऐकण्यात नाहीं)

ओम् = ब्रह्म, परब्रह्म, **भू**. = सत् **भुव**. = चित् व **स्व**. = आनद स्वरुप आहे सत् चित् आनद हें ब्रह्माचें स्वरूपलक्षण आहे तें असें आहे

म्हणून महः = परमपूज्य आहे (महे रणाय चक्षसे, यात मह = परमपूज्य हाच अर्थ भाष्यकारानीं दिला आहे मह पूजायाम्) आणि तेंच जनः आहे सर्व जगाच्या उत्पत्तिस्थिति प्रलयाचें अधिष्ठान आहे 'जन्माद्यस्य यत' (ब्रह्मसूत्र) 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते, येन जातानि जीवन्ति य प्रयन्ति, अभिसंविशन्ति तत् ब्रह्म' (श्रुति)

सच्चिदानदस्वरूप ब्रह्माला हें जगदुत्पत्त्यादि कसें करता येतें म्हणाल, तर ऐका 'तप' तपाच्या योगानें 'एक अह बहुस्याम् प्रजायेय' अशा स्फूर्ति-आलोचना-रूपी तपाच्या योगें सर्व कांहीं करता येतें

मग 'न तस्य कार्यं करण च विद्यते' (श्रुति) ही श्रुति मिथ्या की काय? नाहीं, नाहीं, नाहीं तें 'सत्यम्' आहे देश, काल-वस्तु परिच्छेदातीत, त्रिकालाबाधित आहे, अखड एकरसच असतें

प्रत्येक व्याहृतीच्या पूर्वी प्रणव लावल्यानें हें सुचविलें जातें कीं, भूर्लोकादि ब्रह्मलोकापर्यंतचे सत स्वर्ग आणि सत पाताळ हें सर्व ओं = ब्रह्म आहे अशा रीतीनें सर्वात्म-सर्वब्रह्म-भावना या व्याहृतींच्या उच्चारानें सहजच साधते, पण अर्थ लक्षात घेतला तर!

यानतर गायत्रीचे न्यास आहेत गायत्रीचा अर्थ प्रयोगात प्राणायामविधींत दिला आहे न्यासानतर ध्यान व आवाहन करावयाचें असतें, म्हणून पुढील प्रकरणात त्याविषयीं लिहिलें आहे

* * *

प्रकरण २५ वें

# गायत्रीचें ध्यान व आवाहन

**या सन्ध्या सैव गायत्री सावित्री च सरस्वती ॥**

जिला संध्या म्हणतात तीच गायत्री, तीच सावित्री व तीच सरस्वती; *म्हणूनच 'मुक्ताविद्रुम०' या श्लोकात वर्णिलेलें ध्यानच संध्येचें मानणें* सयुक्तिक आहे. तिच्या हातात असलेल्या आयुधात ब्रह्माणी-गायत्री, रुद्राणी-सावित्री व वैष्णवी-सरस्वती या (प्रात, मध्यान्ह व सायं) तिन्ही संध्यातील शक्तींच्या आयुधापैकीं थोडीं आहेतच. वाहनाचा उल्लेख नाहीं. कारण कीं तीन संध्येंत तीन भिन्न वाहनें आहेत. पाच मुखाच्या वर्णांमध्यें रक्त (लाल) पोंवळ्याचा (विद्रुमचा) आहे ब्रह्माणी रक्तवर्णा आहे. रुद्राणी सावित्री श्वेतवर्णा आहे तर वरील ध्यानात धवल (श्वेत) वर्णाचें मुख आहे. वैष्णवी-सरस्वती कृष्णवर्णा आहे तर वरील ध्यानात 'नील' मण्याच्या वर्णाचें एक मुख आहे. 'नील' व 'कृष्ण' हे शब्द राम, नारायण, विष्णु, कृष्ण याच्या वर्णनात समानार्थक वापरलेले आहेत. रुद्राणी-सावित्रीच्या ध्यानात जटा-मुकुटावर चंद्रकोर आहे. तशी चंद्रकोर पचमुखीच्या मुकुटावर आहे. नारायण उपनिषदात गायत्रीवर्णनात चोवीस अक्षराचीं पाच मस्तकें असलेलीं असेंच म्हटलें आहे.

जिथें कुठें गायत्रीचें मंदिर आहे तेथें 'मुक्ताविद्रुम०' श्लोकात वर्णिल्या सारखी पचमुखी मूर्तिच आहे. ज्याना ज्याना गायत्रीच्या उपदेशाच्या वेळीं किंवा प्रसन्न होऊन साक्षात् दर्शन दिलें त्याना पचमुखीचेंच दर्शन झालें. प्रात.सध्येचें, मध्यान्ह सध्येचें किंवा सायसंध्येचें दर्शन झालें नाहीं.

नारायणानीं नारदास सांगितलेल्या ' गायत्री कवच ' स्तोत्रांत गायत्रीचें म्हणून जें ध्यान वर्णिलें आहे तें ' मुक्ताविद्रुम० ' हेंच आहे तें कवच पुढें दिलें आहे.

वरील सर्व पुराव्यांनीं हेंच सिद्ध होतें कीं गायत्रीचें ध्यान म्हणजे ' मुक्ताविद्रुम० ' यांत वर्णिलेलें पचमुखीचें ध्यान जप ज्या देवतेच्या ज्या मंत्राचा करावयाचा असतो त्या देवतेचें त्या मंत्राचें ध्यान करावयाचें असतें मंत्रदेवता एकच असली तरी त्या मंत्रासाठीं जें ध्यान वर्णिलें असेल तेंच त्या देवतेचें केलें पाहिजे मंत्रभेदानुसार देवतारूपभेद आहेत हें श्रीरामरहस्य उपनिषद्, दत्तात्रेयोपनिषद्, मंत्रमहार्णव, मंत्रमहोदधि वगैरेंत दिलेल

त्रिकाळीं गायत्री जपापूर्वीं पंचमुखी गायत्रीचें ध्यान केलेंच पाहिजे ध्यान करणें म्हणजे ध्यानाचा नुसता श्लोक म्हणणें नव्हे त्या श्लोकांत वर्णिलेल्या रूपाची मूर्ति हृदयांत मनानें निर्माण करून मनाच्या नेत्रांनीं प्रेमानें त्या रूपाकडे बघत राहणें म्हणजे ध्यान करणें, असें केल्यानें चित्ताची एकाग्रता वाढत जाते व शुद्ध सुखाची प्राप्ति अधिकाधिक होते असें ध्यान करून ' ध्यातस्य पूजां कुर्वीत ' या नियमानुसार मनानेंच पंचोपचार पूजा तरी करावी पंचोपचार पूजेचे साधे मंत्र प्रयोगांत दिले आहेत पृथ्वी, आकाश, वायु, तेज व आप हीं पंचभूतें समर्पण करणें हा पंचोपचार पूजेंतील मुख्य हेतु आहे **पंचमहाभूतांचा व पंचविषयांचा पसारा म्हणजेच प्रपंच.** (प्र पंच ). तीं अर्पण केल्यावर जें राहतें **तेंच पूज्य व तेंच पूजक!** पूजेंतील रहस्य हें प्रकरण पाहावें मानस पूजेंत अपार आनंद मिळतो मनानें अर्पण केलेल्या पदार्थांचा सुगंध प्रत्यक्ष घ्राणेंद्रियास येऊं लागतो! हें लक्षांत ठेवावें कीं अनेकांनीं गेल्या ५।१० वर्षांच्या काळांत हें अनेक वेळा अनुभविलें आहे हें त्रिविध प्रचीतीनें सिद्ध झालेलें सत्य आहे

**'मुक्ताविद्रुम'** या श्लोकांत 'शुभ्र कपाल गुण' 'शूल कपाल गुण' 'शुभ्र कपाल गदा' असे पाठभेद आढळले दे भा, बृह पारा-स्मृति व इतर कांहीं ठिकाणीं ' शूल कपाल गुण' हाच पाठ आढळला जुन्या छापील पोथ्यांत हा श्लोक व 'शुभ्र कपाल गुण' हा पाठ होता व तोच

या लेखकाच्या पाठात होता, पण 'कलौ पाराशरस्मृति' हें एक कारण आणि 'शूलं कपालं शुभं' हा पाठ अधिक सयुक्तिक म्हणून तोच घेतला आहे

कपाल = नृकरोटी माणसाच्या डोक्याची कवटी ती शुभ्रच असते, म्हणून 'शुभ्र' हें विशेषण निरर्थक ठरतें शिवाय 'अरविन्दयुगल = कमलयुग्म, कमलाची जोडी म्हटलें आहे, म्हणजे एका हातात दोन कमलें पाहिजेत, पण 'शुभ्र कपाल' पाठ घेतला व दोन कमलें एका हातात दिलीं कीं एक हात रिकामा राहतो! म्हणून तो पाठ त्याज्य बाकेलिखित पुस्तकात 'शूल कपाल शुभ' आहे देवी भागवतात तसेंच आहे

प्रात सध्या व मध्यान्ह सध्याच्या ध्यानात दहाच्यावर भेद आढळले! पण चार हात असून एका किंवा अधिक हातात आयुधादि काहींच नसणें योग्य नाहीं व गद्य वर्णनापेक्षा श्लोकात असलेलें वर्णन लक्षात ठेवण्यास चागलें त्यातहि सावच लाभ मर्णनें दिसली, म्हणून नारदपुराणातील सुटसुटीत वर्णन दिलें आहे

सायसध्याध्यानात फारसा भेद आढळला नाहीं, पण गद्यात असलेलें न घेता नारदपुराणोक्त सुटसुटीत श्लोकात्मक दिलें आहे

तैत्तिरीय लिखित निबंध ग्रयात सध्याध्यानवर्णनात फारसे भेद आढळले नाहीत, म्हणून इतर शाखीयाच्या ध्यानाहून तें निराळें असलें तरी तेंच घेतलें आहे माध्यदिन निबन्धग्रथातील योग्य वाटलें तें त्याच्या सध्यात दिलें आहे

पचमुखीचें ध्यान पूजन केल्यावर मग त्या त्या सध्येचें ध्यान करावें

## आवाहन

आवाहन म्हणजे निमत्रण, बोलावणें, ये, या, अशी प्रार्थना मत्रानें करणें 'मंत्राधीनं तु दैवतम्' देवता मत्राच्या अधीन असल्यामुळें त्याना यावेंच लागतें देवता एकाच वेळीं पाहिजे तेवढीं रूपें घेऊ शकतात हें लक्षात ठेवावें नुसत्या नाममत्रानीं जिथें आवाहन असतें तिथें तेवढ्यानें सुद्धा येतात, हें त्रिवार सत्य आहे, व अशा अनुभवाचे लेखी, शेंकडो पुरावे जवळ आहेत आवाहन, मत्रानीं केलें नाहीं तर येत नाहींत हेंहि

सिद्ध झालें आहे. देवता येतात व योग्य साधकाला दिसतातहि. मंत्र च देवतास्वरूप असल्यानें मंत्रांतूनच त्या प्रगट होतात, हें आहे मर्म !

मराठी चांगलें लिहितां न येणाऱ्या एका मद्रास येथील, ब्राह्मण साधकाच्या इंग्रजी पत्राचा फोटोच मागील पानावर दिला आहे. हे गृहस्थ B. Com. असून एका ऑडिटिंग फर्ममध्यें काम करणारे व इंग्रजी-सिनेमागृहाचे मालक-चालक आहेत.

येतांना किंवा आलेल्या देवता कोणाला उघड्या डोळ्यानीं तर कोणाला मिटलेल्या डोळ्यानीं दिसतात. फार काय रत्नवेदिका, रत्न-सिंहासन इत्यादिसुद्धा येतात; याविषयीं लेखी पुरावे आहेत.

मुद्रांचीं लक्षणें पुढील प्रकरणात दिलीं आहेत.



प्रकरण २६ वें

# मुद्रा-वर्णन

मोदनात् चैव देवानां द्रावणात् पापसततेः ।
तस्मात् मुद्रेति सा ख्याता सर्वकामाऽर्थसाधिनी ॥

देवाना आनद देणारी व पापपरपरेला पळविणारी म्हणून (मुद्+द्रा) मुद्रा असें म्हणतात मुद्रा सर्व कामना व सर्व अर्थ याची सिद्धि करणारी आहे हात व हाताचीं बोटें वगैरेंनीं करावयाच्या विविध आकृति म्हणजेच मुद्रा मुद्रा दाखविण्यानें पापादि असुर राक्षस कसे पळविले जातात हें पूर्वी सागितलें आहेच

गायत्रीचें ध्यान व आवाहन, पूजन केल्यावर, शापविमोचन केल्यावर, मुद्रा दाखवावयाच्या असतात चोवीस अक्षराच्या मुद्रा व त्याच्या देवता याचें तेरीज पूर्वीच दिलें आहे एकेका मुद्रेनें एकेका अक्षराची देवता प्रसन्न होते, व त्यामुळें गायत्रीजप सिद्धिदायक होतो मुद्रा न दाखविल्यास गायत्री सिद्धिदायक होत नाहींच, परतु त्या चोवीस अक्षराच्या देवता शाप देतात, (श्लोक पुढें आहेत)

क्रमशः चोवीस मुद्रांचीं नांवें- (पाठभेद कसात दिले आहेत)
संमुखं (सुमुख, सन्मुखं) संपुटं चैव विततं विस्तृतं तथा ।
द्विमुखं त्रिमुखं चैव चतु.-पंच-मुखं तथा ॥ १ ॥
षण्मुखाऽधो मुखे (मुख) चैव व्यापकाजलिकं तथा ।
शकटं यमपाशं च ग्रंथित (ग्रथित) सन्मुखोन्मुखं (चो-मुखोन्मुख) ॥२॥
प्रलंबं मुष्टिकं चैव मत्स्य- (मीन) कूर्मोवराहकम् ।
सिंहाक्रान्तं महाक्रान्तं मुद्गरं पल्लवं तथा ॥ ३ ॥

हेच श्लोक महाराष्ट्रात सर्वत्र प्रचलित आहेत, तसेंच गुजरार्थेत व दक्षिण देशात हि

एता मुद्रा न जानाति गायत्री निष्फला भवेत्।
एता मुद्राः प्रकुर्वीत गायत्री सिद्धिदा भवेत् ॥ ४ ॥
एता मुद्रा न जानाति तस्य देवी न सिध्यति।
शपन्ति देवताः सर्वा गायत्र्यक्षरसंश्रिताः ॥ ५ ॥ (हा फारसा प्रचारात नाहीं)

## मुद्रालक्षणें व स्पष्टीकरण

१. संमुखं (समुख, सन्मुख)–संमुखं संहतौ हस्तौ उत्तानौ कुंचितांगुली ॥ नमस्कारासाठीं जोडतात तसे हात, बोटाचीं अग्रें जरा वाकवून, एकमेकास जोडावे व हृदयाजवळ समोर धरावे

२. संपुटं–संपुटं पद्मकोपामौ करौ अन्योन्यसंहतौ ॥ डावा हात उताणा खोलगट करुन त्यावर खोलगट केलेला उजवा हात झाकण्या-सारखा पालथा (उपडा) घालावा

३. विततं–विततं संहतौ हस्तौ उत्तानौ आततांगुली ॥ तळव्याचे मूळ भाग घट्ट चिकटवून, प्रत्येकाचीं बोटें जोडलेलीं ठेवून, हात नमस्कारासारखे समोर धरावे मूळ भाग घट्ट जोडलेलेच ठेवून प्रत्येकाचीं जोडलेलीं ताठ बोटें मुटीं न करता बोटासह तळवे डाव्या उजव्या बाजूस एकमेकापासून जास्तींत जास्त दूर न्यावेत

४ विस्तृतं विस्तृतं संहतौ पाणी मिथो सुक्तांगुली द्वयोः ॥ वितत मुद्रेंत जोडून ठेवलेलीं प्रत्येक हाताचीं बोटें एकमेकापासून शक्य तेवढीं दूर फाकवावीं

५ द्विमुखं–या मुद्रेचें सविस्तर वर्णन पृष्ठ १६० वर पहिल्या परिच्छेदात पाहावें

संमुखाऽऽसक्तयो पाण्यो· कनिष्ठाद्वययोगतः।
शेषांगुलीनां वैकल्ये द्विमुखत्रिमुखादय ॥

(टीका–कनिष्ठिरयोर्योगे, अगुष्ठयोर्योगे च शेषागुलीना वैकल्ये द्विमुखम्। तर्जन्यो योगे त्रिमुखम्। मध्यमयोर्योगे चतुर्मुखम्। अनामिकयो योगे पञ्चमुखम् इत्यर्थ ॥)

६ त्रिमुखं– द्विमुख मुद्रा कायम ठेवून शिवाय दोन्ही तर्जनी एकमेकीस जोडून मध्यमापासून दूर न्याव्या

७. चतुर्मुखं– वरील मुद्रा कायम ठेवून दोन्ही मध्यमा जोडून तर्जनी-कडे न्याव्या

८. पंचमुखं– वरीलप्रमाणेच अनामिका जोडाव्या. (जोडलेल्या दोन दोन बोटानीं १।१ मुख होतें)

९ षण्मुखं–

शेषांगुलीनां सयोगे कनिष्ठायोगनाशने ।
तिर्यक्-संयुज्यमानाग्रौ संयुक्तांगुलिमण्डलौ ॥
हस्तौ षण्मुखमित्युक्ता मुद्रा मुद्रा विशारदैः ॥

नमस्काराप्रमाणे समोर हात जोडून, दोन्ही करंगळ्या डाव्या उजव्या बाजूस शक्य तेवढ्या फाकवाव्या, बाकीच्या बोटाचीं पेरं पुढली पेरेंच चिकटवून, तळहातात चांगली पोकळी निर्माण करावी व अग्रे जोडलेले आंगठे तर्जनींना लागलेले ठेवावे

१० अधोमुखं–

आकुंचिताग्रौ संयुक्तौ न्युब्जौ हस्तौ अधोमुखम् ॥

जास्तींत जास्त पाणी हातात घेण्यासाठीं जसा पसा करतात तसे दोन्ही हाताचे करावे व नतर ते तसेच पालथे करून एकमेकास तर्जनींच्या जवळ घट्ट लावावे आंगठ्याच्या पाठी एकमेकास लावाव्या

११ व्यापकांजलिक–

उत्तानौ तादृशावेव व्यापकांजलिकौ करौ ॥

व्यापकन्यास करण्यासाठीं करतात तशी ओंजळ (अंजलि) म्हणजे व्यापकांजलिक मुद्रा जास्तींत जास्त पाणी ओंजळींत घेऊन तें गळू न देण्यासाठीं जशी ओंजळ घट्ट करतात तशी करावी अशी ओंजळ करून कोणी दोन्ही हात हृदयाच्या बाजूनें वाटोळे फिरवितात तें चुकीचें

१२ शकटं -अधोमुखौ बद्धमुष्टी मुक्तांगुष्ठकौ करौ । शकटं नाम मुद्रेयम्–' आंगठे सुटे ठेवून पालथ्या (उपड्या) हाताच्या मुठी

वळाव्या व उजवी पालथी मूठ डाव्या मुठीवर ठेवावी व आगठे खालीं करावे

१३. यमपाशम् अत परम् ॥

बद्धमुष्टिकयोः पाण्योः उत्ताना वामतर्जनी ॥
कुंचिताग्राऽन्यथा युक्ता तर्जन्याऽन्युब्जवक्त्रया ।
उत्तानसंधिसंलीन-चद्धांगुलिदलौ करौ ॥ ( हें वर्णन थोडें अपुरें आहे ) दोन्ही हाताच्या तर्जनी व करगळ्या पसरून मधलीं दोन बोटें आगळ्याखाली दाबून ठेवावीं डावा उताणा हात उजव्याकडे अग्रें करून समोर धरावा उजवा पालथा धरून त्याची करगळी डाव्याच्या तर्जनी वर किंचित वाकवून ठेवावी आणि उजव्याची तर्जनी डाव्याच्या करगळीवर ठेवावी नतर डाव्या हाताचीं मधलीं दोन बोटें उजव्या हाताच्या पालथ्या असलेल्या तर्जनीवर उताणी ठेवावी त्याचीं अग्रें उजव्याच्या आगळ्यानें दाबून धरावीं उजवी मधलीं दोन पालथीं बोटें डाव्याच्या तर्जनीखालून दाबून धरावीं लहान मुलात ही मुद्रा 'वाघाचा डोळा' नावानें प्रसिद्ध आहे

१४ ग्रंथितं ( ग्रथित ) 'संमुखो घटितौ दीर्घांगुष्ठौ ग्रंथित उच्यते' मधलें बोट ( दीर्घ अगुल ) पसरून ठेवून दोन्ही हाताच्या मुठी वळाव्या, व डाव्या हाताचें उताणें मधलें बोट उजव्याच्या पालथ्या मधल्या बोटानें गाठ ( ग्रथि ) मारल्यासारखें घट्ट धरून, दोन्ही आवळावीं

१५ सन्मुखोन्मुखम् ( उन्मुखोन्मुख )

ऊर्ध्वांगुलिर्वामहस्त॰ तादृशा दक्षिणेन तु ।
अधोमुखेन संयुक्तः सन्मुखोन्मुखमुच्यते ॥(सन्मुख+उन्मुख) जेवताना घास घेण्यासाठीं पाची बोटें करतात तशीं दोन्ही हाताचीं करावीं डाव्या बोटाची अग्र वर करून त्यावर उजव्या हाताची ग्रासमुद्रा पालथी घालावी ( असे ठेवल्ने दोन्ही हात कोणी खालीं वर करतात तें चूक

१६. प्रलंब. उत्तानोत्तानकौटी च प्रलम्बः कथित करौ ॥
( टीका – उत्तानौ अनामिका–कनिष्ठिकौ करौ प्रलंब कथित )

डाव्या हाताची करंगळी व अनामिका उताण्या ठेवून, बाकीचीं बोटें मिटून, डावा हात उजव्या कोपराजवळ न्यावा, उजवा हात वर करून त्याचें कोपर, डाव्याच्या उताण्या दोन बोटांवर ठेवावें आणि वर के ले. उजव्या हाताची अनामिका व करंगळी ताठ वर पसरून बाकीचीं बोटें मिटावीं, म्हणजे गवड्याच्या ओळव्यासारखी साधारण आकृति होते

१७. मुष्टिकम्–

मुष्टी चाऽन्योन्यसंयुक्तौ उत्तानौ मुष्टिकौ भवेत् ॥

ठोसा मारण्यासाठीं आंगठा आंत घालून मूठ वळतात, तशा दोन्ही हाताच्या मुठी वळून, उताण्या एकमेकींना लावून ठेवाव्या

१८. मत्स्य (मीन)

मत्स्यस्तु संमुखीभूतौ मुक्ताऽनामाकनिष्ठिकौ ।
ऊर्ध्वसंयुक्तवक्त्रौ तु शेषांगुल्दिलौ करौ ॥

सन्मुखी मुद्रेसारखे हात करून बोटाचीं अग्रें वर करावीं सपाट जोडलेल्या करंगळ्या व अनामिका इतरांपासून दूर न्याव्यात, आणि बाकीच्या बोटांचीं फक्त पुढचीं पेरेंच एकमेकांस जोडून ठेवावीं, आंगठे, तर्जनी व मध्यमा यांत फटी राहू नयेत (ही पाण्यातून वर उडी मारणाऱ्या माशाची मुद्रा झाली) यापेक्षा सोपा प्रकार मुद्राप्रकाश ग्रंथातला इतरत्र सापडला तो—

दक्षपाणे पृष्ठदेशे वामपाणितलं न्यसेत् ।
अंगुष्ठौ चालयेत् सम्यग् मुद्रेयं मत्स्यरूपिणी ॥

उजव्या पालथ्या हातावर डावा पालथा हात ठेवावा, व दोन्ही आंगठे चांगले खालीं वर हालवावे (ही पाण्यात पोहणाऱ्या माशाची मुद्रा होते) मुद्राप्रकाशातील कूर्ममुद्रा पुढील प्रकारापेक्षा फार कठिण आहे

१९ कूर्म-

अधोमुख- करो वाम तादृशा दक्षिणेन तु ।
पृष्ठदेशे समाक्रान्त कूर्मो नामाऽभिधीयते ॥

डावा हात पालथा पसरून, त्यावर उजवा पालथा पसा ठेवावा पसाऱ्या बोटाचीं अग्रें डाव्याच्या नखाजवळ टेकून ठेवावीं, व दोन्ही आंगठे खालीं करावे

२०. वराह–

ऊर्ध्वमध्यं वामभुजः कक्षायाम् आश्रयेत् करम् ॥
वराहो नाम मुद्रेयं कथिता मुनिसत्तमैः

(ऊर्ध्वमध्य यथा स्यात् तथा वामभुज भूत्वा तस्य कक्षाया दक्षकर आश्रयेत्)

मोठे लिंबू बोटांनीं उचलून घेण्यासाठीं जशी पाच बोटें धरतात तशी डाव्या हाताचीं करून, तो हात कोपरापासून मनगटापर्यंत सरळ समोर धरावा, त्याचें मधलें बोट वर ताठ धरावें, त्याच्या अनामिकेचें अग्र तर्जनीला लावावें, आणि उजवा हात डाव्या काखेंत (बगलेंत) घालावा (वर केलेलें मधलें बोट रानडुकराच्या नाकाडावरील सुळ्यासारखें दिसतें असें जोडलेल्या तर्जनी व अनामिका मिळून त्या वराहाच्या नाकासारखें, व चार बोटांच्या मधला भाग त्याच्या तोंडासारखा दिसतो

२१. सिंहाक्रान्तं–

कण्ठाश्रितौ करौ कर्णसंश्रितौ आयतांगुली
सिंहाक्रान्तं नाममुद्रा महाक्रान्ताच कथ्यते ॥

उजवा हात पुढल्या बाजूनें गळ्याजवळून डाव्या कानाजवळ न्यावा, तसाच डावा उजव्या कानाजवळ न्यावा, ताठ पसरलेल्या चार चार बोटांचा पृष्ठभाग कानास लावावा

२२ महाक्रान्तं–

किंचिदाकुंचिताग्रौ च हस्तौ कृत्वा तथा भवेत् ॥

सिंहाक्रान्तांतील कानास लावलेल्या बोटांचीं अग्रें थोडीं बाहेर वाकवावीं

२३. मुद्गरं–

ऊर्ध्वं किंचित् गतौ पाणी मुद्गरो वामतर्जनी ।
ग्रस्ता दक्षिणहस्तेन मुद्रा प्रोक्ता मनीषिभिः ॥

तर्जनी वर ताठ पसरून, आंगठा आंत घालून मूठ वळलेला डावा हात कोपरापासून वर सरळ धरावा, व उजव्याचें मनगट डाव्याच्या मनगटाला लावून, डाव्याची तर्जनी, उजव्याच्या आंगठा आंत घातलेल्या मुठींत घट्ट धरावी (दोन्ही हातांनीं वर उचललेल्या मुद्गरासारखी आकृति होते

२४ पल्लवं–

अधोमुख स्थितो मूर्ध्नि पल्लवो दक्षिणः करः ॥

बोटें ताठ पसरलेला उजवा तळहात, पाठीकडून, शेंडीच्या वर, बोटें पुढील बाजूस पसरून धरावा बोटें डोक्याला न लावता पालथी मुटी ताठ ठेवावी

**सूचना**- मुद्रालक्षणाचे वरील श्लोक श्रीशंकराचार्यकृत गा पु प व धारेकृत गा पु प यातून मुद्रणदोष काढून टाकून घेतले आहेत गुरु चरित्राच्या परिशिष्टात (कामत प्रदीप) जे आहेत त्यात व यात महत्त्वाचा फरक नाहीं मात्र लक्षात ठेवावें कीं, त्या परिशिष्टात मराठींत जीं लक्षणें दिलीं आहेत तीं त्यातील श्लोकाप्रमाणें नाहींत, व त्याना आधार काय हेंही तेथें दिलेलें नाहीं

## गायत्रीजपानंतर दाखवावयाच्या मुद्रा.

सुरभिर्ज्ञानशूर्पे च योनिः कूर्मोऽथ पंकजम् ।
लिंग निर्याणकं चैव जपान्तेऽष्टौ प्रदर्शयेत् ॥

सुरभि (धेनु), ज्ञान, शूर्प (सूप), योनि, कूर्म, पद्म (कमळ), लिंग (शिवलिंग) व निर्याण या आठ मुद्रा गायत्रीजपानतर दाखवाव्या यास विसर्जन मुद्रा म्हणतात

ज्या ग्रथात २४ मुद्राच्या लक्षणाचे श्लोक सापडले, त्यातील एकामध्येंहि या मुद्राचीं लक्षणें दिलेलीं नाहींत वरील श्लोक मात्र आहे धेनु, योनि पकज, ज्ञान व लिंग याचीं लक्षणें रामार्चन चद्रिका व मा श्रा सू०, म महा० इत्यादींत पूजाविधींत वगैरे सापडलीं कूर्ममुद्रा वरील २४ मध्यें आहे शूर्प व निर्याण या मुद्रा पूर्वीं कृतींत असलेल्या इतराशीं ताडून पाहून, समन्वय करून, दोष दूर केले व लक्षणें ठरलीं तीं पुढें दिलीं आहेत

१. **सुरभि – धेनु**– उताण्या डाव्या हाताचें मधलें बोट आगठ्यानें दाबून ठेवून बाकीचीं तीन बोटें ताठ पसरावीं उजवा हात पालथा पसरून आगठा खालीं मिटून ठेवावा उजव्या मधल्या बोटाचें पुढलें पेर डाव्या तर्जनीच्या अग्रावर पालथें ठेवावें डावी मध्यमा उजव्या मध्यमेवर उताणी ठेवून तिच्यावर उजव्या तर्जनीचें अग्र पालथें ठेवावें उजवी अनामिका डाव्या करगळीवर व करगळी डाव्या अनामिकेवर पालथी ठेवावी व दोन्ही आगठे मध्यमाच्या मुळाशीं टेकावे. ही मुद्रा खालीं बोटें करून धरावी (गायीच्या चार स्तनासारखी आकृति होते)

प्रणवत्रयसंयुक्तां त्रिबीज (तीन व्याहृती) सहितां जपेत् ।
अन्यथा जपमानस्य नैष्फल्यं शौनकोऽब्रवीत् ॥

तीन व्याहृतियुक्त व तीन प्रणवयुक्त गायत्रीमंत्र जपासाठीं पाहिजे असा जप न केला तर तो निष्फल होतो, असें शौनक ऋषि म्हणतात

कलियुगात पाराशरस्मृति मुख्य प्रमाण होय तिच्यात व इतर अनेक स्मृतींत व मंत्रमहार्णवात वर सांगितल्याप्रमाणेंच वचनें आहेत दे०भा०त सुद्धा असाच सांगितला आहे 'प्रणवान्ता गायत्री जपादिभिरुपास्या' असें श्रीमदाचार्यवचन आहे प्रारंभीं व व्याहृतींपूर्वी पाहिजेच हें घर ठरलेंच

ओंकारः पूर्वमुच्चार्य भूर्भुवस्व. तथैव च ।
गायत्री प्रणव.चान्ते जप एवं उदाहृतः ॥( याज्ञ०, वसिष्ठ स )

यात गायत्रीपूर्वी प्रणव सांगितला नसला तरी प्रथम दिलेला सामान्य नियम गृहीत आहेच, म्हणून विरोध नाहीं

**मंत्र व जप**– 'मननात् त्राणनात् मंत्र ' (रा पू १।१२) मनन केलें असता त्राण, संरक्षण, उद्धार करतो म्हणून 'मंत्र' असें म्हणतात 'देवादीना च साधने' देवादिकाना वश करण्याचें साधन असाहि अर्थ आहेच पण मनन अर्थचिंतन केल्यानेंच तो सिद्धि फल देतो अर्थचिंतन कसें करावयाचें हें जप शब्दानें सुचविलें जातें 'असकृत् आवृत्ति जप जपनम् ' पुन पुन्हा मंत्राची आवृत्ति करणें म्हणजे जप जप करणें जकार जन्म मरणाचा विच्छेदक व पकार पापाचा संहारक आहे पापाचा संहार करून, जन्ममरण दु खादिकाचा नाश करणारा म्हणूनहि जप म्हणतात (श्लोक प्रारंभीं दिला आहे ) म्हणूनच बृहत्पाराशर स्मृतींत म्हटलें कीं विधियज्ञ, पाकयज्ञ व इतर नाना प्रकारचे मोठमोठे याग, हे जपयज्ञाच्या पासगालाहि पुरणार नाहींत 'यज्ञाना जपयज्ञोऽस्मि ' ( भ गीता ) 'जपात् सिद्धिर्जपात् सिद्धि जपात् सिद्धि कलौ युगे' त्यातहि नरकात जाणाऱ्याना सुद्धा हात देऊन त्याचें रक्षण करणारी गायत्री । जिच्या सारखें पावन करणारें इथें किंवा स्वर्गात सुद्धा दुसरें काहीं नाहीं तिचा जप करीत राहिल्यानें जें पाहिजे तें साध्य होईल

*अधिक प्रणव का लावूं नयेत?* ब्रह्मचारी व गृहस्थ यानीं जास्त प्रणव वापरल्यास ऐहिक सुखोपभोगवृद्धि व वंशवृद्धि होत नाहीं वानप्रस्थ

आणि कुटीचकादि तीन प्रकारचे संन्यासी, यानीं पंचवप्रणवयुक्त किंवा दश-एकादशप्रणवयुक्त गायत्रीचा जप करावा. प्रणव, व्याहृती व गायत्रीच्या प्रत्येक पादापूर्वी व अतीं लावला कीं पचप्रणवयुक्त होते; व सातव्याहृतींपूर्वी ११ आणि गायत्रीच्या प्रत्येक पादापूर्वी ११ मिळून १० प्रणव होतात; व शेवटीं लावला म्हणजे ११ होतात; फार काय

यो न वाञ्छति संतानं मोक्षं इच्छति केवलम् ।
प्रत्योंकारं असौ कुर्यात् अक्षरं मोक्षं आप्नुयात् ॥ (बृ. पारा.)

ज्या कोणा द्विजाला संतति, संपत्ति इत्यादि काहीं नको असेल, त्यानें गायत्रीच्या प्रत्येक अक्षरापूर्वी ओंकार लावून जपतत्पर व्हावें, म्हणजे त्याला मोक्ष मिळेल. या अर्थाचीं वचनें अनेक ग्रंथात आहेत.

**एक उदा.**-एक जोगळेकर नावाचे ब्राह्मण गृहस्थ, मुली, मुलगे, पत्नी वगैरे असलेले एकदा भेटले व म्हणाले कीं "स्वामी! प्रापंचिक बाबतीत माझी प्रत्येक बाजूनें हल्लीं अशी पीछेहाट, दुःस्थिति होत आहे, कीं अगदीं वैतागून गेलों आहे; हें जिणें नकोसें झालें आहे!" त्यास विचारलें कीं कोणाकडून मत्रोपदेश वगैरे घेऊन काहीं उपासना करता का? उत्तर- "होय, प्रणवाचा उपदेश घेऊन जप करतो' 'कोणीं दिला?' एका विधवा बाईचें नाव त्यानीं सागितलें! **केवळ प्रणवाचा जप परमहंस संन्याशांशिवाय इतरांस वर्ज्य सागितला आहे; त्याची जाज्वल्य प्रतीति मिळाली!** त्यास सागितलें कीं, नुसत्या प्रणवाचा जप बंद करा. त्रिप्रणवयुक्त गायत्रीचा जप सख्येंत पुष्कळ वाढवा त्यानी तसें केलें व त्याची परिस्थिति काहीं महिन्यानीं सुधारली. यावरून बोध घ्यावा.

प्रायश्चित्तासाठीं काहीं प्रसगीं पचप्रणवयुक्त, व दशप्रणवयुक्त गायत्रीचा जप गृहस्थासहि सागितला आहे

हवनात व्याहृतिरहित प्रणवपूर्वक गायत्रीचाच; व इतर कर्मांत, प्रणव, तीनव्याहृती, प्रणव व गायत्री असा, दोन प्रणवयुक्त मत्राचा उपयोग करावा. जप मात्र तीनप्रणवयुक्त गायत्रीचाच केला पाहिजे

**जप किती?** कोणत्याहि मत्राच्या जपात सख्या मोजणें जरी आवश्यक आहे तरी जिथें जिथें सख्येंतील जपसख्येचा उल्लेख आहे तो गौणपक्ष

२. ज्ञान–उजव्या आंगठ्याचें व तर्जनीचें अग्र जोडावें व बाकी तीन बोटांचीं अग्रें थोडीं आत वाकवावीं. अंगुष्ठ-तर्जनी यांनीं बनलेला चक्राकार भाग छातीच्या दिंपीवर लागेल असा धरावा व मांडी घातलेल्या डाव्या गुडघ्यावर डावा हात ठेवावा व ताठ बसावें. ही ज्ञानमुद्रा होय.

३. शूर्प– ( सूप ) दोन्ही हात ओंजळीसारखे पण अगदीं सपाट जोडून, त्याचे आगठे मनगटाकडे नेऊन अग्रें जोडावीं; म्हणजे साधारण शूर्पाकृति होते.

४. योनि– दोन्ही हात उताणे ठेवून, मध्यमा आगठ्याखालीं दाबून ठेवाव्या. उजव्याची उताणी अनामिका डाव्या तर्जनीनें पकडून ठेवावी, पण पुढलें पर्व त्या तर्जनीच्या बाहेर ठेवावें. तशीच डावी अनामिका उजव्या तर्जनींत पकडून ठेवावी. दोन्ही मध्यमा उघडून समोर पसरून त्याचीं अग्रें परस्परास लावावीं. करंगळ्या मिटून आंगठ्यांचीं अग्रें करंगळ्याच्या मुळाशीं टेकावीं.

५. कूर्म– चोवीस मुद्रात १९ वी आहेच.

६. पंकज– ( पद्म-कमळ ) वर बोटें केलेले उताणे हात, आंगठे आंत घालून जवळजवळ धरावे. वर अग्रें केलेलीं सर्व बोटें सुटीं ताठ ठेवून वर्तुलाकार करावीं. फुललेल्या कमळासारखी आकृति होईल.

७. लिंग–उजव्या हाताचा आगठा वर ताठ करून तो डाव्या हाताच्या आंगठ्यानें मूळ पेराशीं पकडावा व डाव्या हाताच्या चारी बोटावर उजव्याचीं चार बोटें ( मं. महार्णव. ) मुठीसारखीं ठेवावीं. ही शिवसानिध्यकारिणी आहे.

८. निर्वाण–बोटें फाकवून पसरलेला डावा पालथा हात आपल्या समोर धरावा. उजव्या उताण्या हाताची करंगळी डाव्या करंगळीच्या बाहेर, उजवी अनामिका डाव्याच्या करंगळी व अनामिका याच्या फटींत व त्याप्रमाणेंच उजवी मध्यमा व तर्जनी क्रमानें डाव्याच्या बोटामध्यें बसवाव्या; उजवीं बोटें डाव्यांनीं पकडून ठेवून हात बाहेरच्या बाजूनें आंत गोल फिरवून वर करावे. दोन्ही तर्जनी वर पसरून त्याचीं अग्रें जोडावीं व आगठे मिटलेले आत ठेवावे. कोणी त्या जोडलेल्या तर्जनी भ्रूमध्यावर लावतात.

• • •

प्रकरण २७ वें

# गायत्रीजप

गायत्र्यास्तु परं नास्ति दिवि चेह च पावनं ।
हस्तत्राणप्रदा देवी पतता नरकार्णवे ॥ १ ॥ (यो याज्ञ )
विधियज्ञाः पाकयज्ञा ये चाऽन्ये यज्ञव• मखाः ।
सर्वे ते जपयज्ञस्य कला नार्हन्ति षोडशीम् ॥ २ ॥ (वृ पारा)
जकारो जन्मविच्छेदे पकारः पापनाशनः ।
तस्मात् जप इति प्रोक्तः जन्मपापनिवारकः ॥ ३ ॥ ( आग्नेये )

जपासाठीं गायत्री मंत्र-

' सर्वमंत्रप्रयोगेषु प्रणवः प्रथम• स्मृतः ।
तेन संपरिपूर्णं यत् पूर्णं तत् कर्म नेतरत् ॥ (अग्नि पु २१५।२)

कोणत्याहि वेदमंत्राचा उच्चार करताना त्याच्यापूर्वी प्रणव-ओंकार लावलाच पाहिजे तो पूर्वी लावून केलेलें कर्मच पूर्ण होऊ शकतें तो न लावता-न वापरता केलेलें कर्म पूर्ण होणें शक्य नाहीं म्हणूनच देव• पूजेंत पुरुषसूक्ताचे मंत्र वेळोवेळीं १।१ म्हणताना प्रत्येकापूर्वी ओंकार वापरतात देवे म्हणताना सुद्धा प्रत्येक मंत्रापूर्वी प्रणव उच्चारतात सध्या भाष्यामध्यें सुद्धा प्रत्येक मंत्राच्या पूर्वीं ओंकार वापरलेला आहे यावरून ठरतें कीं गायत्री मंत्रापूर्वीं प्रणव उच्चारलाच पाहिजे वरील अग्निपुराण वचन सध्यावर्णनाच्या अध्यायातच आहे म्हणूनच

प्रणवो भूर्भुवस्स्वश्च पुनःप्रणवसयुता ।
अंत्योंकारसमायुक्ता मन्यन्ते मुनय• पराम् (वृद्ध पारा )

या प्रमाणें तीन प्रणवयुक्त मंत्र जपासाठीं पाहिजे

प्रणवत्रयसंयुक्तां त्रिबीज (तीन व्याहृती) सहितां जपेत् ।
अन्यथा जपमानस्य नैष्फल्यं शौनकोऽब्रवीत् ॥

तीन व्याहृतियुक्त व तीन प्रणवयुक्त गायत्रीमंत्र जपासाठीं पाहिजे. असा जप न केला तर तो निष्फल होतो; असें शौनक ऋषि म्हणतात.

कलियुगांत पाराशरस्मृति मुख्य प्रमाण होय. तिच्यांत व इतर अनेक स्मृतींत व मंत्रमहार्णवांत वर सांगितल्याप्रमाणेंच वचनें आहेत. दे०भा०त सुद्धा असाच सांगितला आहे. 'प्रणवान्ता गायत्री जपादिभिरुपास्या' असें श्रीमदाचार्यवचन आहे. प्रारंभीं व व्याहृतींपूर्वीं पाहिजेच हें वर ठरलेंच.

ओंकारः पूर्वमुच्चार्य भूर्भुवस्वः तथैव च ।
गायत्री प्रणवश्चान्ते जप एवं उदाहृतः ॥( याज्ञ०; वसिष्ठ. सं. )

यांत गायत्रीपूर्वीं प्रणव सांगितला नसला तरी प्रथम दिलेला सामान्य नियम गृहीत आहेच, म्हणून विरोध नाहीं.

मंत्र व जप– 'मननात् त्राणनात् मंत्रः' (रा. पू. १।१२) मनन केलें असता त्राण, संरक्षण, उद्धार करतो म्हणून 'मंत्र' असें म्हणतात. 'देवादीनां च साधने' देवादिकांना वश करण्याचें साधन असाहि अर्थ आहेच. पण मनन-अर्थचिंतन केल्यानेंच तो सिद्धि-फल देतो. अर्थचिंतन कसें करावयाचें हें जप शब्दानें सुचविलें जातें. 'असकृत् आवृत्तिः जपः जपनम्' पुनः पुन्हा मंत्राची आवृत्ति करणें म्हणजे जप. जप करणें. जकार जन्म-मरणाचा विच्छेदक व पकार पापाचा संहारक आहे. पापाचा संहार करून, जन्ममरण-दुःखादिकांचा नाश करणारा म्हणूनहि जप म्हणतात. (श्लोक प्रारंभीं दिला आहे.) म्हणूनच बृहत्पाराशर स्मृतींत म्हटलें की विधियज्ञ, पाकयज्ञ व इतर नाना प्रकारचे मोठमोठे याग, हे जपयज्ञाच्या षोडशांशालाहि पुरणार नाहींत. 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि' (भ. गीता). 'जपात् सिद्धिर्जपात् सिद्धिः जपात् सिद्धिः कलौ युगे' इत्यादि नरकांत जाणाऱ्यांना सुद्धा हात देऊन त्यांचें रक्षण करणारी गायत्री ! जिच्याशारखें पावन करणारें स्वर्गांत सुद्धा दुसरें कांहीं नाहीं. तिचा जप करीत राहिल्यानें जे पाहिजे तें साध्य होईल.

अधिक. प्रणव का लावूं नये ? ब्रह्मचारी व गृहस्थ यांनी ज्यास्त प्रणव वापरल्यास ऐहिक सुखोपभोगवृद्धि व वंशवृद्धि होत नाहीं. वानप्रस्थ

आणि कुटीचकादि तीन प्रकारचे सन्यासी, यानीं पचवप्रणवयुक्त किंवा दश एकादशप्रणवयुक्त गायत्रीचा जप करावा प्रणव, व्याहृती व गायत्रीच्या प्रत्येक पादापूर्वी व अतीं लावला कीं पचप्रणवयुक्त होते, व सातव्याहृतींपूर्वी १।१ आणि गायत्रीच्या प्रत्येक पादापूर्वी १।१ मिळून १० प्रणव होतात, व शेवटीं लावला म्हणजे ११ होतात, फार काय

**यो न वाञ्छति संतानं मोक्षं इच्छति केवलम् ।**
**प्रत्योंकार असौ कुर्यात् अक्षरं मोक्षं आप्नुयात् ॥** (बृ पारा)

ज्या कोणा द्विजाला सतति, सपत्ति इत्यादि काहीं नको असेल, त्यानें गायत्रीच्या प्रत्येक अक्षरापूर्वी ओंकार लावून जपतत्पर व्हावें, म्हणजे त्याला मोक्ष मिळेल या अर्थाचीं वचनें अनेक ग्रथात आहेत

**एक उदा.** एक वोगळेकर नावाचे ब्राह्मण गृहस्थ, मुली, मुलगे, पत्नी वगैरे असलेले एकदा भेटले व म्हणाले कीं "स्वामी ! प्रापचिक बाबतींत माझी प्रत्येक बाजूनें हल्लीं अशी पीछेहाट, दु स्थिति होत आहे, कीं अगदीं वैतागून गेलों आहे, हें जिणें नकोसें झालें आहे !" त्यास विचारलें कीं कोणाकडून मन्त्रोपदेश वगैरे घेऊन काहीं उपासना करता का ? उत्तर– "होय, प्रणवाचा उपदेश घेऊन जप करतो ? 'कोणीं दिला ?' एका विधवा बाईचें नाव त्यानी सागितलें ! केवळ प्रणवाचा जप **परमहंस संन्याशाशिवाय इतरास वर्ज्य सागितला आहे, त्याची जाज्वल्य प्रतीति मिळाली !** त्यास सागितलें कीं नुसत्या प्रणवाचा जप बद करा त्रिप्रणवयुक्त गायत्रीचा जप सर्व्यांत पुष्कळ वाढवा त्यानी तसें केलें व त्याची परिस्थिति काहीं महिन्यानीं सुधारली यावरून बोध घ्यावा

प्रायश्चित्तासाठीं काहीं प्रसगीं पचप्रणवयुक्त व दशप्रणवयुक्त गायत्रीचा जप गृहस्थासहि सागितला आहे

हवनात व्याहृतिरहित प्रणवपूर्वक गायत्रीचाच, व इतर कर्मांत, प्रणव, तीनव्याहृती, प्रणव व गायत्री असा, दोन प्रणवयुक्त मत्राचा उपयोग करावा जप मात्र तीनप्रणवयुक्त गायत्रीचाच केला पाहिजे

**जप किती ?** कोणत्याहि मत्राच्या जपात सख्या मोजणें जरी आवश्यक आहे तरी जिथें जिथें सर्व्यांतील जपसख्येचा उल्लेख आहे तो गौणपक्ष

पीत चंदन, रक्तचंदन इ. बिल्वकाष्ट घालावे. पण बाजारांतील वापरू नये. ज्या देवतेचा मंत्र असेल त्या देवतेचें अष्टगंध वापरावें. जटामासी वगैरे काष्ठौषधि–दुकानात मिळतात.

**बाजारांतील माळा–** रुद्राक्ष, पोंवळीं, स्फटिक व तुलसीकाष्ठें याच्या खऱ्या शुद्धमाळा विकत मिळणें महाराष्ट्रात तरी अतिदुष्कर झालें आहे. बोराच्या बियाच्या किंवा लाकडाच्या मण्यावर लाख लावून केलेल्या बनावट मण्यांच्या माळा रुद्राक्षाच्या म्हणून ५।७ रुपये घेऊन पदरात घातल्या जातात. पोंवळ्याच्या व स्फटिकाच्या नावानें कांचेच्या, दसपट किंमत घेऊन विकल्या जातात! घाणेरीच्या (तणतणीच्या), वेलाच्या किंवा वगैरीच्या काष्ठाच्या अस्सल तुलसीच्या म्हणून विकल्या जातात!

**सोपा उपाय–** शुद्ध चंदनाचीं काष्ठें किंवा तुलसीचीं जाड काष्ठें देऊन स्वत:च्या देखत त्याचे मणी काढून घ्यावे. त्याला मुदा ८।१० आणे प्रत्येक माळेस घेतील. माळेचे मणि सारख्या आकाराचे असावेत. पुत्रवंतीच्या माळा खऱ्या व स्वस्त मिळतात; पण काहींचीं छिद्रें फार मोठीं असतात. ३ माळा घेतल्या वर एक चांगली तयार करता येते. चांदीच्या किंवा सोन्याच्या बिनलाखी मण्याच्या करवून घ्याव्या. खरे स्फटिक गयाक्षेत्रात मिळतात, पण माळेला ७५–१०० रुपये तरी पडतील! खरीं पोंवळीं जवाहिऱ्यांकडून घेऊन त्याच्या कराव्या जपमाळेंत भिन्न जातीचे मणि नसावे.

**रुद्राक्ष–** रुद्राक्षजाबालोपनिषदात रुद्राक्षाचें वर्णन आहे. त्यात श्वेत, रक्त, पीत व कृष्ण अशा चार वर्णांच्या रुद्राक्षाचें वर्णन आहे. हा उल्लेख १९३२ च्या पूर्वी पाहिला होता, म्हणून १९३३ सालीं काशीक्षेत्रात रुद्राक्ष-माळाच्या सर्व दुकानात तपास केला, तेव्हा उत्तर मिळालें कीं, 'सफेद रुद्राक्ष! यह नाम तो हम लोगोंने आपके मुखसे ही सुना! कभी किसीनें देखेंभी नहीं हैं!' १९४४ च्या सुमारास कळलें कीं, धौम महाबळेश्वरीं श्रीयुत कानिटकर याच्या मळ्यात रुद्राक्षवृक्ष आहे. त्याचे २।३ दों मणि मागविले; तें पुडकें उघडून पाहिलें तों पांढरे 'चतुर्मुखी रुद्राक्ष' (ब्रह्मा) त्याना निसर्गत:च मुखे होतीं व तीं छिद्रे मण्याच्या साधारण मध्यापर्यंत

होती. परंतु महाराष्ट्राच्या दुर्भाग्यानें १९४८ मधील जाळपोळीच्या लाटेंत तो परमपवित्र, परम दुर्लभ वृक्ष तोडून टाकला गेला असें कळलें. पुन्हां तो वृक्ष फुटला कीं नाहीं याचा तपास केला नाहीं. आजरें (जिल्हा कोल्हापूर) गांवाच्या जवळपास रुद्राक्ष वृक्ष असल्याचें कळलें आहे; तसेंच पुण्यास फर्ग्युसन कॉलेजच्या बागेंत आहे असें समजतें. भद्राक्ष नावाची रुद्राक्षाचीच एक जात आहे. ते विहित नसले तरी बनावटीपेक्षा फार चांगले! खरे रुद्राक्ष व माळा काशींत मिळतात. सोनाराकडील कसोटीवर रुद्राक्ष घासला म्हणजे साधारण सोन्यासारखी पिवळट रेषा निघते. (रुद्रा. जा. उ.) याची प्रतीति आली आहे. श्वेत-रक्तादि चार प्रकारचे रुद्राक्ष ब्राह्मणादि चार वर्णांनीं क्रमशः वापरावे. (रुद्रा. जा.-उप.) स्फटिकाचीं सुद्धा परीक्षा लक्षणें आहेत, पण विस्तार किती करावयाचा! स्फटिकमाला जपास फार जड होते.

द्विजेतरांनीं माला संस्कार आपल्या जपाच्या नाममंत्रानें करावा. तसा मंत्र नसेल तर 'हरे राम हरे राम०' या बत्तीस अक्षरी मंत्रानें प्रत्येक मणि अभिमंत्रित करावा. बाकीचा विधि त्याच मंत्रानें करावा. स्त्रियांसाठीं हाच नियम.

माळ कशी धरावी इ. अनामिकेच्या मधल्या पेरावर माळ, मेरुमण्याचे ठिकाणीं धरावी. मध्यमेनें मणि खालून ढकलून आंगठ्याच्या पेरानें क्रमानें ओढावे, नख लावूं नये. एक मणि ओढतांना खालच्या किंवा वरच्या मण्याला बोटाचा स्पर्श करूं नये. मेरुमण्यापर्यंत आल्यावर मेरुमण्याला आंगठ्यानें प्रदक्षिणा करावी; आणि आंगठा व मधलें बोट यानीं माळ हळूच उलटी फिरवून, इतर बोटावर जाऊं न देता, तर्जनी न लावता, अनामिकेच्या मधल्या पेरावर पूर्वीप्रमाणें ठेवावी व जो मणि शेवटीं आला होता, त्याच्यापासून पुन्हां प्रारंभ करावा.

प्रमाद व त्यांचे दुष्परिणाम— माळेला हिसके दिल्यानें कार्यसिद्धि होत नाहीं. ती आपटल्याने दुःखप्राप्ति. आवाज झाला तर रोग. हातातून गळून खालीं पडली तर जापकाचा नाश, किंवा मोठीं विघ्नें! जप करतांना तुटली तर मरण येण्याचा संभव. झोके दिल्यानें बुद्धि चंचल

होते, मणि फुटला तर व्याधि होतात खट्खट् आवाज झाला तर कलह भांडणें उत्पन्न होतात ज्या बोटावर धरली असेल त्यावरून दुसऱ्यावर गेली तर विद्वेष उत्पन्न होतो नीच मनुष्याचा वा अपवित्र पदार्थाचा स्पर्श माळेला झाला तर पंचगव्यानें स्नान घालून, ती शुद्ध करून, मग वापरावी, तोंपर्यंत करमालेनें जप करावा

**प्रायश्चित्त–** जप करताना मणि फुटला, गळून पडला, माळ हातातून गळून पडली तर, आणि केव्हाही अपवित्र व्यक्ति, पदार्थ यांचा स्पर्श झाला तर, द्विजानीं गायत्रीचा १०८ जप व इतरानीं नाममंत्राचा एक हजार जप प्रायश्चित्तार्थ करावा

**जपातील विघ्नें–** जप करताना पुष्कळाना झोप येऊं लागते व माळ गळून पडते जपातील, ध्यानातील मुख्य विघ्नें चार आहेत लय विक्षेप, कषाय व रसास्वाद, लय म्हणजे निद्रेसारखी स्थिति हें विघ्न येत आहे असें वाटताच उठून आसनावरच उभें राहावें, किंवा डोळ्याना पाणी लावावें, अथवा भगवद्गीतेंतील एकादा श्लोक किंवा तसें काहीं तरी मोठ्यानें म्हणू लागावें, 'हरे राम हरे राम० हरे हरे' हा मंत्र मोठ्यानें म्हणावा, म्हणजे तें विघ्न पळून जातें विक्षेप म्हणजे इतर विचार मनात येणें हें विघ्न येताच डोळे उघडून उपास्य देवतेच्या चित्राच्या, किंवा एकाद्या संताच्या फोटोंतील डोळ्याकडे टक लावून पाहावें बाकीच्याचें वर्णन परमामृत ग्रंथात पाहावें

**मंत्र-पुरश्चरणाचे विशेष नियम–** काहीं द्विजाच्या सूचनेवरून ही माहिती दिली जात आहे प्रारंभीं पुण्याहवाचन वगैरे विधि केला पाहिजे, म्हणजे सुतक, सोएर यांचा दोष पुरश्चरण समाप्तीपर्यंत नाहीं पहिल्या दिवशीं जितका जप केला असेल तितका रोज झालाच पाहिजे, कमी अधिक करू नये अधिक केल्यास तो पुरश्चरणसंख्येंत गणू नये सीमोल्लंघन, नदीतलाव इ पोहून पलीकडे जाणें निषिद्ध आहे त्रिकाळ स्नान, त्रिकाळ त्या देवतेची पूजा, निदान दोनदा पूजा केली पाहिजे क्षौर, केस कापणें, दाढी करणें या गोष्टी करू नयेत जप बसून किंवा उभ्यानें आसनावरच करावा

**आहार**– माधुकरी, किंवा घरचें असेल तर हविष्यान्न, दुग्धफलाहार, यांपैकीं जें शक्य असेल तें. पुरश्चरण ही एक तपश्चर्या आहे; आणि तपश्चर्येच्या काळांत गृहस्थानेंहि माधुकरी मागण्यास हरकत नाहीं. भोजन एकदाच. मात्र माधुकरी स्वतःच्या साठींच मागावी. विकण्यासाठीं किंवा आश्रितांचें पोषण करण्यासाठीं नव्हे. तसेंच माधुकरींतील अन्न देऊन भाडीं पासवून घेणें, इत्यादि गोष्टी अगदीं निंद्य आहेत. या गोष्टी घडतात हें 'चक्षुर्वै सत्यं' आहे; म्हणून मुद्दाम उल्लेख करावा लागला. गायत्रीपुरश्चरण केल्याशिवाय द्विजानीं इतर मंत्राचें पुरश्चरण करूं नये. गायत्रीचें पुरश्चरण २४ लक्षाचें. त्या पूर्वी मंत्रशुध्द्यर्थ, प्रायश्चित्त म्हणून पंचप्रणवयुक्त गायत्रीचा १५ हजार या दशप्रणवयुक्त गायत्रीचा पांच हजार जप वगैरे करावें लागतें, त्यासाठीं आनंदाश्रमाचें गायत्रीपुरश्चरणपद्धति हें पुस्तक पहावें. बाकीचे सर्व नियम पूर्वी दिले आहेतच. त्रिकाल संध्या, वैश्वदेव (यथाधिकार) इत्यादि केलेंच पाहिजे. प्रातः संध्या केल्यावर, सूर्योदयानंतर पुरश्चरणाचा जप सुरु करावा. जास्तींत जास्त मर्यादा अपराण्हकाल समाप्तीपर्यंत. इतर मंत्रांचा रात्रींसुद्धा करावा.



प्रकरण ३० वें

# उपस्थानादि

तिन्ही संध्यांत 'सूर्योपस्थान' कर्म आहे व तें फार महत्त्वाचें आहे.

**उपस्थान** = ( उप + स्थान ) म्हणजे उप-स्थिति. 'अवकाशे स्थितौ स्थानम्' (अमरे), सूर्याजवळ सूर्याच्या दरबारांत हजेरी देऊन, हात जोडून सूर्याची स्तुति-प्रार्थना करणें म्हणजे सूर्योपस्थान. सूर्याचा उदय व अस्त यांवरच सर्व प्राणिमात्रांचें जीवन अवलंबून आहे, म्हणूनच पक्षीसुद्धा अरुणोदय होताच व सायंकाळीं सूर्यास्तानंतर किलबिल, चिलबिल इत्यादि ध्वनि करीत, जणू सूर्याची स्तुतीच करीत असतात. प्रत्येक मनुष्यानें तर सूर्याकडे तोंड करून त्रिकाळीं सूर्याची स्तुति व प्रार्थना यथाधिकार केलीच पाहिजे.

ऋग्वेदीय व तैत्तिरीय संध्येंत उपस्थान, गायत्रीजपानंतर आहे; व शुक्ल-यजुर्वेदीय संध्येंत अर्घ्यदानप्रदक्षिणा झाल्यावर आहे. त्या त्या शाखांचे मंत्र, प्रयोगांत सार्थ दिले आहेत सायंसंध्येंतसुद्धा 'सूर्योपस्थाने विनियोग.' असेंच म्हटलें पाहिजे, हें पूर्वी श्रुत्याधारें सिद्ध केलें आहेच.

**विधि**– सकाळीं पूर्वेस सूर्याकडे तोंड करून व सायंकाळीं पश्चिमेस तोंड करून, उभ्यानें, हात जोडून उपस्थानमंत्र अर्थाकडे लक्ष देऊन म्हणावे. मध्यान्हकाळीं सर्व तसेंच; पण सूर्याकडे तोंड करून दोन्ही बाहू व हात जोडून उपस्थान करावयाचें. उभे राहण्याचे विविध प्रकार अर्घ्यदान प्रकरणांत दिले आहेत.

वरिष्ठ अधिकारी ( साहेब ) कचेरींत आले की उठून हात जोडून, किंवा अन्य प्रकारें त्याचा आदरसत्कार करतात. कारण 'जो अन्न देतो

उदरासी। शरीर विकारें लागे त्यासीं।' (दा. बो.), एवढेंच नव्हे तर बुद्धिमुद्धा विकावी लागते; पण सर्व जगाला अन्न, पाणी, जीवनशक्ति देणारापुढें हात जोडून त्याची स्तुति प्रार्थना ज्यांना करावीशी वाटत नाहीं त्याचें व त्यांच्यामुळें धर्माचें व देशाचें दुर्भाग्य! याशिवाय दुसरें काय म्हणावें!

## दिग्-दिग्देवता-वन्दन

उपस्थानानंतर पूर्वादि सर्व दिशांना व दिशापतींना नमस्कार करावयाचा असतो. नतर संध्याप्रार्थना व गायत्रीविसर्जन करावयाचें असतें. गायत्रीचेंच आवाहन केलेलें असल्यानें विसर्जनहि गायत्रीचेंच केलें पाहिजे; तथापि 'या संध्या सैव गायत्री' या वचनानुसार संध्याविसर्जन म्हटलें तरी दोष नाहीं. 'देवीविसर्जनान्तं स्यात् संध्याकर्म' देवी = गायत्री, किंवा संध्यादेवीच्या विसर्जनानेंच संध्याकर्म समाप्ति होते. याचा विधि प्रयोगात दिला आहे. पुढील प्रकरणात गायत्रीचे काहीं उपयुक्त सकाम प्रयोग दिले आहेत.



प्रकरण ३१ वें

# गायत्रीचे सकाम प्रयोग

' सर्व-कामदुघा देवी गायत्री स्वर्गमोक्षदा ।
गायत्र्या नास्ति चाऽप्राप्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥

मुमुक्षूनीं इतर कोणतीहि इच्छा, कामना बाळगून कोणतेंहि कर्म करूं नये हें जरी खरें असलें तरी मोक्ष हा एकच पुरुषार्थ नसून धर्म, अर्थ, काम सुद्धा शास्त्र संतसंमत पुरुषार्थच आहेत. बहुजनसमाज सकामच असतो. व तें अस्वाभाविक या निंद्य नाहीं. फार काय ' धर्माऽविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ' ( भ. गी ) धर्म-अविरोधी काम, कामना ही भगवताची एक विभूति आहे लोक सकाम कर्में अधिक आस्थेनें करतात. त्यांतील नियमपालनाची शिकस्त करतात; त्यायोगें इंद्रियनिग्रहाचा व शमाचा अभ्यास सहज होतो. वाणीनें सकाम कर्मांची निन्दा करणाऱ्या, पण चित्तानें कामनांचें वाळें विणणाऱ्या व मनोरथाचे गगनचुंबी मनोरे उभारणाऱ्या लोकांपेक्षा कामनासिद्धीसाठीं शास्त्रविहित कर्म यथाविधि करणारे फार चांगले.

न बुद्धिभेदं जनयेत् अज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ' ( भ गी )

असें जें ज्ञान्यांना, जीवन्मुक्तांना सांगितलें तें त्याच हेतूनें. जसें ' सगुणीं भजतां पाविजे निर्गुणा ' तसेंच सकाम कर्में करता करताच निष्कामता प्राप्त होऊं शकते; इत्यादि अनेक हेतुस्तव श्रुति-स्मृति-पुराणादि सद्ग्रंथांत अनेक मंत्रांचे जसे सकाम प्रयोग वर्णिले आहेत तसेंच गायत्री मंत्राचेहि सांगितले आहेत.

सकामांतील प्रकार—मुख्यतः तीन आहेत. १ पापाचें प्रायश्चित्त म्हणून, २ ऐहिक कामनाची प्राप्ति करण्यासाठीं आणि ३ उपद्रवशान्तीसाठीं. चौथा प्रकार जारणमारणादि अभिचारकर्मे करण्यासाठीं, ग्रंथात वर्णिला आहे. पण ते प्रयोग येथें देण्याची इच्छा नाहीं व देणें योग्य नाहीं. हल्लीच्या तमोगुणाच्या साम्राज्यात ते प्रगट करणें म्हणजे पिशाचाच्या हातीं कोलीत देणें ठरेल.

प्रायश्चित्तार्थ सांगितलेले काहीं प्रयोग प्रथम देणें बरें. पापक्षालनासाठीं संकल्पपूर्वक केलेलें शास्त्रोक्त कर्म म्हणजे प्रायश्चित्त. संध्यासंकल्पातसुद्धां पापक्षालन हा एक हेतु आहेच. 'पापानां कर्मणां फलं दुःखम् ।; म्हणून त्या प्रमाणात पापक्षय होईल त्या प्रमाणात भावी दुःखें कमी होतील. सर्वच पापाचा नाश केला गेला कीं सुखदुःखादि-द्वन्द्वातीत व मोहातीत होता येतें. (भ. गी.)

## प्रायश्चित्तार्थ प्रयोग—प्रकार पहिला

१. उपपातक जाणून बुजून केलें असेल तर एक हजार गायत्रीजप करून काळ्या तिळानीं एक हजार हवन गायत्रीमंत्रानें यथाविधि करावें.

२. गोहत्या, मातृहत्या, पितृहत्या, ब्राह्मणहत्या, गुरु-विप्र-स्त्रीगमन, सुवर्णचोरी, मद्यपान यांतील कोणतेंहि महापातक केलें किंवा घडलें तर गायत्रीचा एक लक्ष जप संकल्पपूर्वक करून १० हजार हवन तिळाचें करावें. या अनुष्ठानाचा विधिः—लोकवस्तीपासून अगदीं दूर बांधलेल्या झोपडींत एकट्यानें राहून करावें. गायत्रीमंत्र म्हणत, नदींत शंभर वेळा बुड्या मारून स्नान रोज करून, पाण्यात बुडी मारून गायत्रीजप करावा. या प्रमाणें रोज शंभर किंवा अधिक जप माध्यान्हापर्यंत करावा व गायत्री मंत्रानें अभिमंत्रित करून थोडें पाणी प्यावें. असें शंभर वेळा करावें व एक लक्ष जप वरील पद्धतीनें झाल्यावर हवन करावें.

३. क्षुद्र पातकासाठीं शंभर जप करावा.

## प्रकार दुसरा

१. दीर्घायुष्य—दुधांत शिजवलेला चरु (भात) किंवा नुसतें तूप, दूर्वा व काळे तीळ या तीन द्रव्यांनीं प्रत्येकीं तीन हजार हवन करावें. दूर्वा

टीचभर लाव पाहिजेत तीन दुर्वांची एक आहुति व त्या तुपात बुडवि-लेल्या पाहिजेत हवनाचें प्रत्येक द्रव्य तुपात भिजवलेलें पाहिजे, असा सामान्य नियम आहे

२. ब्रह्मतेज-पळसाच्या फुलाचें एक लक्ष हवन

३. गोधनप्राप्ति- रक्तचंदनाचा भुसा व भूमिस्पर्श न झालेलें गोमय, याचे निदान मोठ्या लिंबा एवढाले गोळे तुपात बुडवून एक हजार हवन

४. अपमृत्युहरण-केवळ दुग्धाहारी बनून संध्या करून, सूर्योदयीं पुन्हा स्नान करून, मध्यान्हकाळ समाप्तिपर्यंत जप करावा याप्रमाणें एक लक्षाचें अनुष्ठान करावें मध्यान्य काळ १८ घटकांनीं संपतो

५. शौर्यवीर्य बलप्राप्ति-तुपात बुडविलेल्या लाल तांदुळाचा लक्ष होम

६ विविध असाध्य रोगनिवारण-एक दिवस पंचगव्याहार, एक दिवस निर्जल उपवास व एक दिवस एकभुक्त हविष्यान्न असें त्रिरात्र व्रत करीत एक लक्ष जप करावा (मध्यान्हकाळ समाप्तिपर्यंत)

७. भौतिकरोगनिवारण व अभिचार शान्ति-अभिचार म्हणजे जारणमारणादि प्रयोग, चेटूक इत्यादि शनिवारीं सूर्योदयाबरोबर स्नान करून, पिंपळाच्या वृक्षाखालीं बसून मध्यान्हकाळ संपेपर्यंत जप करावा असें दर शनिवारीं करावें

८. सर्वव्याधिनाश- गुळवेलीचे पेरापेरावर तुकडे करून गाईच्या दुधात बुडवून सात दिवस रोज दोनशें हवन करावें

९ ज्वरशान्ति- दुधात भिजविलेल्या आम्रपत्राचें तुपात बुडवून एक हजार हवन पानें अच्छिद्र, स्वच्छ, न पिकलेलीं, देठासुद्धा पाहिजेत

१० क्षयरोग- दुधात भिजविलेल्या गोड्या वेखंडाच्या कांड्याचें हवन सात दिवस रोज दोनशेंप्रमाणें, तेवढ्यानें न भागल्यास तीन सप्ताह

११. कुष्ठ-(कोड) शंखपुष्पीच्या फुलाचें तुपात बुडवून हवन, रोज दोनशें प्रमाणें २१ दिवस (हीं फुलें पौष, माघ महिन्यातच मिळू शकतात लहान असतात म्हणून एका आहुतीस कमीत कमी तीन तरी घ्यावीं.)

१२. फेफरें (मृगी)- अघाड्याच्या बियांचें, रोज दोनशें प्रमाणें २१ दिवस. मधली दोन बोटें व आगठा यांत राहतील तेवढ्याची एक आहुति. हिला मृगीमुद्रा म्हणतात करंगळी व तर्जनी सुट्या. तुपांत कालवून हवन करावें.

१३. उन्माद- पिशाचादि बाधेमुळें उन्माद रोग होतात. भूतोन्माद देवतोन्माद वगैरेंचीं लक्षणें '**माधवनिदान**' ग्रंथात पाहावीं. पिंपळ, उंबर, वड, पिंपरी शमी व रुई यास दुग्धतरु म्हणतात. यांच्या प्रत्येकीं एक हजार समिधांचें हवन, तुपात बुडवून. नतर गायत्रीमत्रानें एकहजार वेळा सूर्यतर्पण.

१४. असाध्य प्रमेह- उंबराच्या समिधांचें तुपात, किंवा तूप व मध यात बुडवून एक सप्ताह तरी रोज दोनशें हवन.

१५. प्रमेह- मध किंवा उसाचा रस यांचें २१ दिवस रोज दोनशे हवन.

१६. सुपुत्र प्राप्ति- पायसाचें बाराशें हवन; शेष पायस ऋतुस्नात ब्राह्मण सुवासिनीस भोजनात वाढावें. (शिजवताना तूप व साखर घालून दुधात शिजविलेला भात म्हणजे पायस).

१७. अपमृत्युनिवारण- दूर्वा व त्रिमधु (दूध, तूप, मध समप्रमाणात एकत्र) या दोन द्रव्यांचें सात दिवस रोज प्रत्येकीं शंभर हवन. किंवा चरु, शमीसमिधा, पायस व घृत या चार द्रव्यांचें प्रत्येकीं शंभर प्रमाणे सात दिवस हवन. किंवा सात दिवस रोज वडाच्या शंभर समिधांचें हवन करून त्याच्या मागोमाग पायसाचें रोज शंभर हवन.

१८. मरणभीतिनाश- केवळ दुग्धाहारी बनून सूर्योदयापासून अपराण्हकाळ समाप्ति; दिनमानाच्या ⅘ भागाची समाप्तिपर्यंत सात दिवस जप करावा.

१९. निर्मल बुद्धि- ब्राह्मीचा रस १०८ वेळा गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित, प्यावा.

२०. अभीष्ट प्राप्ति- पाण्यात बुडी मारलेल्या काळात गायत्रीजप मोजून करावा. याप्रमाणें रोज शंभर जप एक महिना करावा.

२१. वृष्टीसाठीं- पायसाचें किंवा पायसमिश्रित वेताच्या पानाचें सात दिवस रोज शंभर हवन.

२२. वृष्टि बंद होण्यास– जलाशयात भस्माच्या शंभर आहुति.

२३. विद्याप्राप्तीसाठीं–ऐं बीज; लक्ष्मीसाठीं श्रीं बीज; सर्वकामप्राप्तीसाठीं ह्रीं बीज, आदि अंतीं लावून; व आयुष्य वृद्धीसाठीं ओं हौं जूं सः 'गायत्री मंत्र' व त्याच्या शेवटीं स. जूं, हौं ओम्' याप्रमाणें रोज सूर्योदयापासून जप करावा.

याशिवाय अनेक प्रयोग आहेत; त्यात एका पायावर, बाहू वर ताठ धरून, उन्हांत करावयाचे प्रयोगहि आहेत व त्यानीं कवित्व, अमोघ वाणी, त्रिकालदर्शित्व, अणिमादि सिद्धि, इत्यादि प्राप्त होतात; पण सद्यःकालीन ब्राह्मणास तें तप झेंपण्यासारखें नाहीं म्हणून येथें दिले नाहींत. देवी भागवत स्कंध ११ अध्याय २४ मध्यें वर्णन आहे.

वर दिले आहेत तसले सकाम प्रयोग, गायत्री पुरश्चरण करून मग करावे, असा सर्वसाधारण नियम आहे; तथापि पुरश्चरण न केलेल्यासुद्धा, या काळातहि अनुभव येतात, हें दिसलें व ऐकलें आहे; पण हें लक्षात ठेवावें कीं या प्रयोगांचें फळ मिळण्यास उत्तम नीतिमत्ता, श्रुतिस्मृतिपुराणोक्त सदाचार, व नियमितपणें संध्या वेळेवर करणें हें भांडवल पाहिजेच.

**सूचना**– वरील सकाम प्रयोग करणारानीं त्या त्या अनुष्ठानापूर्वी वेळेवर संध्या केलीच पाहिजे. समिधा २।३ दिवसांपेक्षा जास्त शिळ्या असल्यास त्या हवनाचें फळ मिळणार नाहीं; कारण त्यातील रसच फलदायक असतो.

## प्रकार तिसरा

१. वीज पडणें, भूकंपादि उत्पात होणें, इत्यादींचा संभव असता जंगली वेताच्या समिधानीं सात दिवस सतत सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत हवन करावें.

२. गृहग्रामादिकात होणारा देवता, भूत, पिशाचादिकाचा उपद्रव बंद होण्यासाठीं–चांदीच्या, तांब्याच्या, मृत्तिकेच्या किंवा दुग्धवृक्षाच्या पात्रात ठेवलेल्या पंचगव्यात बुडवून दुग्धवृक्ष समिधाचें गायत्रीमंत्रानें एक हजार वेळा हवन करावें, नंतर पात्रात राहिलेलें पंचगव्य एक हजार वेळा

गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित करावें. मग गायत्रीस्मरण करीत तें पंचगव्य दर्भकूर्चानें गृहग्रामादिकांत प्रोक्षण करावें; नंतर बलिदान करीत असतां इष्टदेव सवित्याचें ध्यान करावें. यानें देवतादि त्यास वश होतील व गृहग्रामादिकांत आपला अनिष्ट प्रभाव पाडूं शकणार नाहींत.

भूतपिशाच बाधानिवारण–शंभर वेळां अभिमंत्रित केलेलें पाणी पिण्यास द्यावें किंवा शंभर वेळा अभिमंत्रित केलेलें भस्म कपाळावर व मस्तकावर लावावें, म्हणजे उपद्रव नष्ट होतात.

**सूचना**-वरील माहिती मुख्यतः देवी भागवतांतील आहे; काहीं थोडी शारदातिलक व अग्निपुराण यांतील आहे.

**कोटि जप केल्यानें कोणतीहि कामना पूर्ण होते.** (व्यास स्मृति.)



प्रकरण ३२ वें

# गायत्रीची आरती व स्तोत्रें

## गायत्रीची आरती

जय गायत्री चिन्मय-देवी आद्या श्रीशक्ती ।
श्रुतिजननी जय जगद्व्यापिनी सेवक-हितकर्ती ॥ (ध्रु० )
जय जय पंचमुखी त्र्यंबनयना श्रुति दशकर वदती ।
जय जय चंद्रकलायुत मुकुटा अष्टायुध हातीं ॥ १ ॥
वरदाऽभयकर शरणा, द्विजवर तुज उपासीती ।
त्रिपदि चतुष्पदि मंत्रमयी बहुपदी तुज गाती ॥ २ ॥
तुज गात्या त्रासी तू, म्हणुनी गायत्री म्हणती ।
प्राणा रक्षिसि; कुंडलिनी तू नरदेहीं, वदती ॥ ३ ॥
ब्राह्मी रौद्री शक्ति वैष्णवी तुझे अंश असती ।
' शाक्त सर्व उपनीत, ' महर्षी संहितेंत कथिती ॥ ४ ॥
श्रेष्ठ तुझ्या मंत्रासम दुसरा मंत्र न या जगतीं ।
ब्रह्मादिक मृतसंजीवनि तव योगें बनतीं ॥ ५ ॥
भूतपिशाचादीक घोर अति तव मंत्रें जळतीं ।
प्रज्ञा तुझिया कृपाकटाक्षें राहि न भवभीती ॥ ६ ॥
प्रज्ञानानन्दस्वामिविरचित गायत्रींची आरती समाप्त.

---

१. मुज झालेले. २. विश्वामित्र वगैरेंत.

## गायत्री जयकार-स्तोत्र

ब्रह्मदेवमुख-विनिर्गता जय । निर्दोषा त्रिगुणातीता जय ॥१॥
जय कौमारी गायत्री जय । जय जय युवती सावित्री जय ॥२॥
सरस्वती जय जय वृद्धा जय । प्रणवरूपिणी संध्या जय जय ॥३॥
भेदाऽवस्थाऽतीता जय जय । ब्रह्मरूपिणी देवी जय जय ॥४॥
जय गायत्री ब्रह्माणी जय । जय सावित्री रुद्राणी जय ॥५॥
जयति वैष्णवी सरस्वती जय । कालाऽतीता आदिशक्ति जय ॥६॥
सृष्टिस्थितिलय-कारिणि जय जय । विश्वभरणपोषणकारिणि जय ॥७॥
संतत-परानन्द-दायिनि जय । योगक्षेमवाहिनी जय जय ॥८॥
जय जापकभय-वारिणि तारिणि । जयत्यविद्याक्लेश-निवारिणि ॥९॥
ब्रह्माऽमर-वंदित-संध्या जय । जगद्-व्यापिनी जगदंबा जय ॥१०॥
पाप-ताप-रुज-हारिणि जय जय । भोगैश्वर्य-दायिनी जय जय ॥११॥
मातर्मम हृद्गततिमिरं हर । ज्ञानभानु-कर-निकरं विस्तर ॥१२॥
प्रज्ञानानन्देन-मथितं । श्रुतिसारं स्मृति-पुराणगदितम् ॥१३॥
नित्यं पठेद् द्विजः शतवारं । भक्त्या युत-यम-नियमाऽऽचारम् ॥१४॥
तं गायत्री-मंत्र-जप-परं । नयेदेव सा संसृतिपारम् ॥१५॥

प्रज्ञानानन्दस्वामिविरचितं गायत्रीजयकारस्तोत्रं सम्पूर्णम्

अस्त्येकं परमं गुह्यं गायत्री कवचं तथा ।

## श्रीगायत्री-कवचम्

( हे द्विजाधिपाय इतरानी मत्यु नये )

नारद उवाच–स्वामिन् सर्व जगन्नाथ संशयोऽस्ति मम प्रभो ।
चतुःषष्टिकलाऽभिज्ञ, पातकाद् योगविद्वर— ॥१॥
मुच्यते केन पुण्येन, ब्रह्मरूपः कथं भवेत् ।
देहश्च देवतारूपो मन्त्ररूपो विशेषतः २॥॥
कर्म तच्छ्रोतुमिच्छामि न्यासं च विधिपूर्वकम् ।
ऋषिश्छन्दोऽधिदैवं च ध्यानं च विधिवत् प्रभो ॥३॥

नारायण उवाच--

पठनाद् धारणान्मर्त्यः सर्वपापैः प्रमुच्यते ॥४॥
सर्वान् कामान् अवाप्नोति देवीरूपश्च जायते ।
गायत्रीकवचस्याऽस्य ब्रह्म-विष्णु-महेश्वरा. ॥५॥
ऋषयो, ऋग्यजुः सामाऽथर्वच्छन्दांसि नारद ।
ब्रह्मरूपा देवतोक्ता गायत्री परमा कला ॥६॥
'तत्' बीज, भर्ग इत्येषा शक्तिरुक्ता मनीषिभिः ।
कीलक च धियः प्रोक्त, मोक्षार्थे विनियोजयेत् ॥७॥

न्यास— तत्सवितुश्च हृदये वरेण्य शिरसि न्यसेत् ।
भर्गो देवस्य शिखाया कवचे धीमहीति च ॥ ८ ॥
धियो योनस्तथा नेत्रे त्वस्त्राय च प्रचोदयात् ॥ ९ ॥

अथ ध्यानम्--मुक्ता विद्रुम-हेमनीलधवलच्छायैर्मुखैस्त्रीक्षणै ।
युक्तामिन्दुकलानिबद्धमुकुटा तत्त्वार्थवर्णात्मिकाम् ॥
गायत्रीं वरदाऽभयाऽङ्कुश-कशा-शूल कपाल गुण ।
शख चक्रमथाऽरविन्दयुगल हस्तैर्वहन्तीं भजे ॥ १० ॥

गायत्री पूर्वत. पातु सावित्री पातु दक्षिणे ।
ब्रह्मसन्ध्या तु मे पश्चाद् उत्तराया सरस्वती ॥ ११ ॥
पार्वती मे दिश रक्षेत् पावकीं[1] जलशायिनी ।
यातुधानीं[2] दिश रक्षेद् यातुधान-भयकरी ॥ १२ ॥
पावमानीं[3] दिश रक्षेद् पवमान-विलासिनी ।
दिश रौद्रीं[4] च मे पातु रुद्राणी रुद्ररूपिणी ॥ १३ ॥
ऊर्ध्व ब्रह्माणि मे रक्षेद् अधस्ताद् वैष्णवी तथा ।
एव दश दिशो रक्षेत् सर्वांग भुवनेश्वरी ॥ १४ ॥

---

१ आग्नेय दिशा. २ नैर्ऋत्य दिशा. ३ वायव्य ४ ईशान्य

पद्न्यास– तत् पद पातु मे पादौ, जंघे मे सवितुः पदम् ।
वरेण्य कटिदेशे तु, नाभिं भर्गस्तथैव च ॥ १५ ॥
देवस्य मे तु हृदय, धीमहीति च गल्लयोः ।
धियः पद च मे नेत्रे, यः पदं मे ललाटकम् ॥ १६ ॥
नः पद पातु मे मूर्ध्नि शिखाया मे प्रचोदयात् ।

अक्षरन्यास–तत् पद पातु मूर्धानम् सकारः पातु भालकम् ॥१७॥
चक्षुषी तु विकारार्णः तुकारस्तु कपोलयोः ।
नासापुटे वकारार्णो रेकारस्तु मुखे तथा ॥ १८ ॥
णिकार ऊर्ध्वमोष्ठ तु यंकारस्त्वधरोष्ठकम् ।
आस्यमध्ये भकारार्णो र्गोकारश्चुबुके तथा ॥ १९ ॥
देकारः कण्ठदेशे तु वकारः स्कधदेशकम् ।
स्यकारो दक्षिण हस्त धीकारो वामहस्तकम् ॥ २० ॥
मकारो हृदय रक्षेद् हिकार उदरे तथा ।
धिकारो नाभिदेशे तु योकारस्तु कटिं तथा ॥ २१ ॥
गुह्य रक्षतु योकार ऊरू द्वौ नः पदाक्षरम् ।
प्रकारो जानुनी रक्षेत् चोकारो जघदेशकम् ॥ २२ ॥
दकारोऽगुल्फदेशे तु याकारः पदयुग्मकम् ।
तकार व्यञ्जन चैव सर्वाङ्ग मे सदाऽवतु ॥२३॥
इद तु कवच दिव्य बाधाशतविनाशनम् ।
चतु षष्टिकला-विद्यादायक मोक्षकारकम् ॥२४॥
मुच्यते सर्वपापेभ्य· परब्रह्माऽधिगच्छति ।
पठनाच्छ्रवणाद्वाऽपि गोसहस्र-फल लभेत् ॥२५॥

॥ इति श्रीदेवीभागवतपुराणे नारायणोक्त गायत्रीकवच सम्पूर्णम् ।

## श्रीगायत्रीहृदयम्

(हें द्विजेतरानीं म्हणू नये)

नारद उवाच--

भगवन् देवदेवेश भूतभव्यजगत्प्रभो ।
कवच तु श्रुत दिव्य गायत्रीमत्रविग्रहम् ॥ १ ॥

अधुना श्रोतुमिच्छामि गायत्रीहृदय पर --।
यद्धारणाद् भवत् पुण्य गायत्रीजपतोऽखिलम् ॥ २ ॥

नारायण उवाच--

देव्याश्च हृदय प्रोक्त नारदाऽथर्वणे स्फुटम् ।
तदेवाऽह प्रवक्ष्यामि रहस्याऽतिरहस्यकम् ॥ ३ ॥

विराड्रूपा महादेवी गायत्री वेदमातर ।
ध्यात्वा तस्यास्तथाऽङ्गेषु ध्यायेद् एताश्च देवता ॥ ४ ॥

पिण्डब्रह्माण्डयोरैक्याद् भावयेत् स्वतनौ तथा ।
देवीरूपे निजे देहे तन्मयत्वाय साधक ॥ ५ ॥

नाऽदेवोऽभ्यर्चयेद् देव इति वेदविदो विदु ।
ततोऽभेदाय काये स्वे भावयेद् देवता इमा ॥ ६ ॥

अथ तत् सप्रवक्ष्यामि तन्मयत्वमथो भवत् ।
गायत्री हृदयस्याऽस्याऽप्यहमव ऋषि स्मृत ॥ ७ ॥

गायत्री छन्द उद्दिष्ट देवता परमेश्वरी ।
पूर्वोक्तेन प्रकारेण कुर्याद् अगानि पट्क्रमात् ॥
आसन विजने देश ध्यायेद् एकाग्रमानस ॥८॥

---

१ गायत्रीकवचात सांगितलेलें. २ षडगन्यास

अथ अर्थन्यास:- पौर्वर्धी देवता । दतपक्तावश्विनौ । उभे सन्ध्ये चोष्ठौ । मुखं अग्निः । जिव्हा सरस्वती । ग्रीवायां तु बृहस्पतिः । स्तनयोर्वसवोऽष्टौ । बाह्वोर्मरुतः । हृदयेपर्जन्यः । आकाश उदरम् । नाभौ अन्तरिक्षं । कट्योः इन्द्राग्नी । जघने विज्ञानघनः प्रजापतिः । कैलास-मलये ऊरू । विश्वे देवाः जान्वोः । जघायां कौशिकः । गुह्य अयने । गुल्फे पितरः । पादौ पृथ्वी । वनस्पतयोऽङ्गुलीषु । ऋषयो रोमाणि । नखानि मुहूर्तानि । अस्थिषु ग्रहाः । असृङ्मांस ऋतवः । संवत्सरा वै निमिषम् । अहोरात्रौ आदित्यश्चन्द्रमाः । प्रवरां दिव्यां गायत्रीं सहस्रनेत्रां शरणमहं प्रपद्ये । ओं तत्सवितुर्वरेण्याय नमः । ओं तत् पूर्वजाय नमः । ओं तत् प्रातरादित्य-प्रतिष्ठायै नमः ॥

फलश्रुति—प्रातरधीयानो रात्रिकृतं पापं नाशयति । सायमधीयानो दिवसकृतं पापं नाशयति । सायंप्रातरधीयानोऽपापो भवति । सर्वतीर्थेषु स्नातो भवति । सर्वैः देवैः ज्ञातो भवति । अवाच्यवचनात्पूतो भवति । अभक्ष्यभक्षणात् पूतो भवति । अभोज्यभोजनात् पूतो भवति । असाध्यसाधनात् पूतो भवति । दुष्प्रतिग्रहशतसहस्रात् पूतो भवति । पङ्क्तिदूषणात्पूतो भवति । अनृतवचनात्पूतो भवति । अथ अब्रह्मचारी ब्रह्मचारी भवति । अनेन हृदयेन अधीतेन क्रतुसहस्रेण इष्टं भवति । अष्टौ ब्राह्मणान् सम्यग् ग्राहयेत् । तस्य सिद्धिर्भवति । य इदं नित्यमधीयानो ब्राह्मणः प्रातः शुचिः सर्वपापैः प्रमुच्यते । (इति) ब्रह्मलोके महीयते । इत्याह भगवान् नारायणः ।

॥ इति श्रीदेवीभागवतमहापुराणप्रोक्तं गायत्रीहृदयं संपूर्णम् ॥

सूचना—फलश्रुतींत ज्या पापाचा उल्लेख केलेला आहे तीं मुद्दाम जाणून बुजून केलेलीं समजणें योग्य नाहीं. मुद्दाम केलेल्या पापाच्या क्षयासाठीं संकल्पपूर्वक प्रायश्चित्तेंच केलीं पाहिजेत. चुकून, क्रोधाच्या भरात, जीं घडलीं असतील त्यांचा नाश यानें होईल.

## गायत्री स्तोत्रम्

नारद उवाच–

भक्तानुकम्पिन् सर्वज्ञ हृदय पापनाशनम् ।
गायत्र्या कथितं तस्माद् गायत्र्याः स्तोत्रमीरय ॥ १ ॥

नारायण उवाच–

आदिशक्ते जगन्मातर्भक्तानुग्रहकारिणि ।
सर्वत्र व्यापिकेऽनन्ते श्रीसन्ध्ये ते नमोऽस्तु ते ॥ २ ॥
त्वमेव सन्ध्या गायत्री सावित्री च सरस्वती ।
ब्राह्मी रौद्री वैष्णवी च रक्ता श्वेता सितेतरा ॥ ३ ॥
प्रातर्बाला च मध्याह्ने यौवनस्था भवेत्पुनः ।
वृद्धा सायं भगवती चिन्त्यते मुनिभिः सदा ॥ ४ ॥
हंसस्था च वृषारूढा तथा गरुडवाहिनी ।
ऋग्वेदाध्यायिनी भूमौ दृश्यते या तपस्विभिः ॥ ५ ॥
यजुर्वेदं पठन्ती च अन्तरिक्षे विराजते ।
सा सामगाऽपि स्वर्गेषु भ्राम्यमाणा तथा भुवि ॥ ६ ॥
रुद्रलोकं गता त्वं हि विष्णुलोकनिवासिनी ।
त्वमेव ब्रह्मणो लोकेऽमर्त्यानुग्रह-कारिणी ॥ ७ ॥
सप्तर्षि प्रीतिजननी माया बहु वरप्रदा ।
शिवयोः करनेत्रोत्था ह्यश्रुस्वेदसमुद्भवा ॥ ८ ॥
आनन्दजननी दुर्गा दशधा परिपठ्यते ।
वरेण्या वरदा चैव वरिष्ठा वरवर्णिनी ॥ ९ ॥
गरिष्ठा च वराहा च वरारोहा च सप्तमी ।
नीलगंगा तथा सन्ध्या सर्वदा भोगमोक्षदा ॥ १० ॥
भागीरथी मर्त्यलोके पाताले भोगवत्यपि ।
त्रिलोकवाहिनी देवी स्थानत्रयनिवासिनी ॥ ११ ॥

भूर्लोकस्था त्वमेवाऽसि धरित्री लोकधारिणी ।
भुवर्लोके वायुशक्तिः स्वर्लोके तेजसां निधिः ॥ १२ ॥
महर्लोके महासिद्धिर्जनलोके जनन्यपि ।
तपस्विनी तपोलोके सत्यलोके तु सत्यवाक् ॥ १३ ॥
कमला विष्णुलोके च गायत्री ब्रह्मलोकगा ।
रुद्रलोके स्थिता गौरी हरार्धाङ्गनिवासिनी ॥ १४ ॥
अहमो महतश्चैव प्रकृतिस्त्वं हि गीयसे ।
साम्यावस्था स्थिता त्वं हि शबलब्रह्मरूपिणी ॥ १५ ॥
ततः परा पराशक्तिः परमा त्वं हि गीयसे ।
इच्छाशक्तिः क्रियाशक्तिर्ज्ञानशक्तिस्त्रिशक्तिदा ॥ १६ ॥
गंगा च यमुना चैव विपाशा च सरस्वती ।
शरयूर्देविका सिंधुर्नर्मदैरावती तथा ॥ १७ ॥
गोदावरी शतद्रुश्च कावेरी देवलोकगा ।
कौशिकी चन्द्रभागा च वितस्ता च सरस्वती ॥ १८ ॥
गंडकी तपिनी तोया गोमती वेत्रवत्यपि ।
इडा च पिंगला चैव सुषुम्ना च तृतीयका ॥ १९ ॥
गान्धारी हस्तिजिह्वा च पूषाऽपूषा तथैव च ।
अलम्बुसा कुहूश्चैव शंखिनी प्राणवाहिनी ॥ २० ॥
नाडी च त्वं शरीरस्था गीयसे प्राक्तनैर्बुधैः ।
हृत्पद्मस्था प्राणशक्तिः कण्ठस्था स्वप्ननायिका ॥ २१ ॥
तालुस्था त्वं सदाधारा बिन्दुस्था बिन्दुमालिनी ।
मूले तु कुण्डलीशक्तिर्व्यापिनी केशमूलगा ॥ २२ ॥
शिखामध्यासना त्वं हि शिखाग्रे तु मनोन्मनी ।
किमन्यद् बहुनोक्तेन यत् किंचित् जगतीत्रये ॥२३॥

तत्सर्वं त्वं महादेवि श्रिये सन्ध्ये नमोऽस्तु ते ।
इतीदं कीर्तितं स्तोत्रं सन्ध्यायां बहुपुण्यदम् ॥२४॥

महापापप्रशमनं महासिद्धिप्रदायकम् ।
य इदं कीर्तयेत् स्तोत्रं संध्याकाले समाहितः ॥२५॥

अपुत्रः प्राप्नुयात् पुत्रं धनार्थी धनमाप्नुयात् ।
सर्वतीर्थ-तपो-दान-यज्ञ-योग-फलं लभेत् ॥२६॥

भोगान् भुक्त्वा चिरं कालं अन्ते मोक्षमवाप्नुयात् ।
तपस्विभिः कृतं स्तोत्रं स्नानकाले तु यः पठेत् ॥२७॥

यत्र कुत्र जले मग्नः सन्ध्यामज्जनजं फलम् ।
लभते नात्र सदेहः सत्यं सत्यं च नारद ॥२८॥

श्रृणुयाद् योऽपि तद् भक्त्या स तु पापात् प्रमुच्यते ।
पीयूषसदृशं वाक्यं सन्ध्योक्तं नारदेरितम् ॥२९॥

इति श्रीदेवीभागवते नारायणप्रोक्तं सन्ध्यास्तोत्रं संपूर्णम् ॥

सूचना–'गंगा च यमुना' पासून 'वेत्रवत्यपि' पर्यंत पुण्य नद्यांची नावें आहेत. इडा पिंगला वगैरे १० मुख्य नाड्यांची नावें आहेत. दे. भा. 'अलम्बुषा' पाठ आहे पण 'कौषीतकिब्राह्मणोपनिषद् व योगशिखोपनिषद् यांत 'अलम्बुसा' पाठ आहे व तोच अनेक उपनिषदांत आहे. या नाड्यांची स्थानें व कार्यें या विषयीं माहिती वरील दोन उपनिषदांत पाहावी. कुंडली=कुंडलिनी; ती मूलाधारापासून मस्तकावरील केसांच्या मुळापर्यंत जाऊ शकते.

—०—

## गौतम-महामुनिकृत-गायत्रीस्तोत्रम्

**गौतम उवाच-**

नमो देवि महाविद्ये वेदमातः परात्परे ।
व्याहृत्यादिमहामन्त्ररूपे प्रणवरूपिणि ॥ १ ॥
साम्यावस्यात्मिके मातर्नमो ऱ्हींकाररूपिणि ।
स्वाहास्वधास्वरूपे त्वा नमामि सकलार्थदाम् ॥ २ ॥
भक्तकल्पलता देवीं अवस्थात्रयसाक्षिणीं ।
तुर्यातीतस्वरूपा च सच्चिदानन्दरूपिणीम् ॥ ३ ॥
सर्ववेदान्तसंवेद्या सूर्यमण्डलवासिनीं ।
प्रातर्बाला रक्तवर्णा मध्यान्हे युवतीं पराम् ॥ ४ ॥
सायान्हे कृष्णवर्णा त्वा वृद्धा नित्य नमाम्यहम् ।
सर्वभूतारणे देवि, क्षमस्व परमेश्वरि ॥ ५ ॥
इति स्तुता वेदमाता प्रत्यक्ष दर्शन ददौ ।
पूर्णपात्र ददौ तस्मै येन स्यात् सर्वपोषणम् ॥ ६ ॥
उवाच,मुनिमम्बा सा य य काम त्वमिच्छसि ।
तस्य पूर्तिकर पात्र मया दत्त भविष्यति ॥ ७ ॥
इत्युक्त्वाऽन्तर्दधे देवी गायत्री परमाकला ॥ ८ ॥

इति श्रीदेवीभागवतमहापुराणे गौतमकृत-गायत्रीस्तोत्र सपूर्णम् ॥

दे भा १२।९ हा सर्व अध्याय मुद्दाम अवलोकन करावा. गायत्रीनें दिलेल्या पूर्णपात्रामुळें गौतममुनींनीं लाखों ऋषिमुनींचें पालनपोषणादि सर्व अनेक वर्षे केलें व ते ऋषिमुनि कृतघ्न, मत्सरी बनले ! इत्यादि कथा आहे

सूर्यस्तोत्रें पुढील प्रकरणात आहेत

♡ ♡ ♡

प्रकरण ३३ वें

# सूर्य- स्तोत्रे.

## सूर्याष्टकम्

श्रीगणेशायनमः । साव उवाच— आदिदेव नमस्तुभ्य प्रसीद मम भास्कर । दिवाकर नमस्तुभ्य प्रभाकर नमोऽस्तुते ॥ १ ॥ सप्ताश्वरथमारूढ प्रचण्ड कश्यपात्मजम् । श्वेतपद्मधर देव त सूर्यं प्रणमाम्यहम् ॥ २ ॥ लोहित रथमारूढ सर्व लोकपितामह । महापापहर देव त सूर्यं प्रणमाम्यहम् ॥ ३ ॥ त्रैगुण्य च महाशूर ब्रह्माविष्णुमहेश्वर । महापापहर देव० ॥ ४ ॥ बृंहित तेजःपुञ्ज च वायुराकाशमेव च । प्रभुस्त्वं सर्व लोकाना त सूर्यं० ॥ ५ ॥ वधूकपुष्पसंकाश हारकुंडलभूषितम् । एकचक्रधर देव त सूर्यं० ॥ ६ ॥ त सूर्यं विश्वकर्तार महातेजः प्रदीपनम् । महापापहर देव त ० ॥ ७ ॥ त सूर्यं जगता नाथ ज्ञानविज्ञानमोक्षदम् । महापापहर देव त सूर्यं प्रणमाम्यहम् ॥ ८ ॥ इति श्री सूर्याष्टकस्तोत्र संपूर्णम् ॥

—०—

## सूर्यकवचस्तोत्रम्

श्रीगणेशाय नमः। याज्ञवल्क्य उवाच । शृणुष्व मुनिशार्दूल सूर्यस्य कवच शुभम् । शरीरारोग्यद दिव्य सर्वसौभाग्यदायकम् ॥ १ ॥

देदीप्यमानमुकुटं स्फुरन्मकरकुण्डलम् । ध्यात्वा सहस्रकिरणं स्तोत्रमेतदुदीरयेत् ॥२॥ शिरो मे भास्करः पातु, ललाटं मेऽमितद्युतिः । नेत्रे दिनमणिः पातु श्रवणे वासरेश्वरः ॥३॥ घ्राणं घर्मघृणिः पातु वदनं वेदवाहनः । जिव्हां मे मानदः पातु कंठं मे सुरवन्दितः ॥४॥ स्कन्धौ प्रभाकरः पातु वक्षः पातु जनप्रियः । पातु पादौ द्वादशात्मा सर्वांगं सकलेश्वरः ॥५॥ सूर्यरक्षात्मकं स्तोत्रं लिखित्वा भूर्जपत्रके । दधाति यः करे तस्य वशगाः सर्वसिद्धयः ॥६॥ सुस्नातो यो जपेत् सम्यग् योऽधीते स्वस्थमानसः । स रोगमुक्तो दीर्घायुः सुखं पुष्टिंच विंदति ॥७॥

इति श्रीयाज्ञवल्क्यविरचितं सूर्यकवचस्तोत्रं संपूर्णम् ।

—०—

## श्रीसूर्यस्तोत्रम्

(यात सूर्योपनिषदाचा गोषवारा आहे.)

सुरक्त-वारिज-स्थितं । द्विपंचवाह[1]वाहनम् ॥
वराऽभयाऽम्बुजद्वयं । धरं स्मरामि भास्करम् ॥ १ ॥
त्रिलोक-जन्म-दायकं । हि काळचक्र-नायकं ॥
चराऽचराऽऽत्मरूपिणं । भजामि तं प्रभाकरम् ॥ २ ॥
स सूर्य एव सर्वलोक । कर्म-कारणं श्रुतं ।
रविर्हि यज्ञ-वृष्टि-धान्य । कारको नमामि तम् ॥ ३ ॥
रवेर्जनी[2] रवेः स्थिती । रवौ लयो भवत्यहो ! ।
अशेष-वेद-कारणं । नमामि तं विभाकरम् ॥ ४ ॥
रविर्मही-जलाऽनलाऽ । निलादिभूत-कारण ।
रविर्हि नेत्रसंस्थितो । नमामि तं दिवाकरम् ॥५॥

---

१, सात घोड्याचा रथ असलेला. २. उत्पत्ति, जन्म.

रविर्हि पञ्च-पञ्चक । त्रिधिहारिहरिः श्रुतः ।
समस्त-देवतात्मको । नमामि त अहस्करम् ॥६॥
पर च शाश्वत पद । गताऽऽगतिर्यतो नहि ।
सवितृ-मण्डल-स्थित । गुरोर्गुरु नमामि तम् ॥७॥
रविः सुरेन्द्रपूजितो । रविर्मुनीन्द्र-सस्तुतः ।
रविर्मनीषिभिः स्तुतो । नमामि त नमामि तम् ॥८॥
रवेः कृपाप्रसादतो । ममाऽऽशु चित्तदर्पणः ।
भवेत्सुनिर्मलः सदा । चिदात्मसौख्यदायकः ॥९॥
प्रज्ञानानन्द-स्वामि-विरचित सूर्यस्तोत्र सपूर्णम् ।

पञ्चपचक = २५ तत्वें.

याशिवाय वाल्मीकि रामायणातील 'आदित्यहृदय' हि काहीं साधकानीं आपल्या साधनात अन्तर्भूत केलें आहे.

* * *

प्रकरण ३४ वें

# ऋषि-छंद-देवतादि-निर्णय.

देवता ऋषिपूर्वकम् ॥ ३७ ॥ छंदोभिर्विनियोगैश्च मंत्रब्राह्मणसंयुतं ।
एतद्धीनं न कुर्वीत कुर्यात् चेत् स्यात् तदाऽऽसुरम् ॥ ३८ ॥

जे मंत्र संध्याजपहोमादिकर्मांत वापरावयाचे असतील त्यांचे ऋषि, छन्द, देवता, विनियोग व ब्राह्मण (मंत्रांचें स्थान व त्यांचा अर्थ) या पांच गोष्टींचें ज्ञान पाहिजेच आणि ऋषिछंद देवता व विनियोग यांचा उच्चार केला पाहिजे, अशा अर्थाचीं वचनें स्मृतिपुराणादिकांत अनेक आहेत शिवाय कलियुगांत मुख्य प्रमाणभूत जी पाराशरस्मृति तिच्यांतच मंत्रांचें स्थान व अर्थ म्हणजे ब्राह्मण असें स्पष्ट म्हटलें आहे वर दिलेल्या बृहत्पाराशरस्मृति-श्लोकांत हेंच सांगितलें आहे, आणि म्हटलें कीं या पांचांविरहित कर्म करूं नये, केलें तर तें आसुरी कर्म ठरतें

## देवता ऋषि-विनियोगादींचीं लक्षणें–( बृ. पारा स्मृ. )

यस्मिन् मंत्रेच यो देव तेन देवेन चिन्हितम् ।
मंत्र तद्दैवत विद्यात् सेति तत्र तु देवता ॥ ३९ ॥
येन यदृषिणा दृष्ट सिद्धि प्राप्ता तु येन वै ।
मंत्रेण, तस्य स प्रोक्तो मुनेर्भावस्तदात्मक ॥ ४१ ॥
यत्र कर्मणि चारब्धे जपहोमार्चनादिकम् ।
क्रियते, येन मंत्रेण नियोग तस्य स स्मृत ॥ ४२ ॥
अस्य मंत्रस्य चाऽर्थोऽय अय मंत्रोऽत्र वर्तते ।
तत्तस्य ब्राह्मण ज्ञेय मंत्रस्येति श्रुतिक्रमः ॥ ४४ ॥

एतद्धि पंचकं ज्ञात्वा क्रियते कर्म यद्द्विजैः ।
तदनन्तफलं तेषां भवेद् वेदनिदर्शनात् ॥ ४५ ॥
एकांशेनाऽपि यन्न्यूनं कुर्यात् कर्म द्विजोऽमतिः ।
नाशो तस्य फलं विन्देत् क्लेशमात्रं तु तस्य तत् ॥
प्रपद्यते स्थाणुगर्तं स्वयंवापि प्रलीयते ॥ ४७ ॥

**याचा भावार्थ**– मंत्रात ज्या देवाचें वर्णन असेल ती त्या मंत्राची देवता, तो त्या देवतेचा मंत्र ज्या ऋषीला जो मंत्र दिसला, प्राप्त झाला (किंवा ज्यानें तो कोणास सांगितला) आणि ज्यानें त्याचें अनुष्ठान करून सिद्धि मिळविली, तो त्या मंत्राचा ऋषि, तो मंत्र त्या ऋषीचा, हें लक्षण चांगलें लक्षांत ठेवावें. एकाद्या कर्मांत, जप, होम, पूजादि जें ज्या मंत्रानें करावयाचें त्या कर्माचा उल्लेख म्हणजे त्या मंत्राच्या नियोगाचा, उल्लेख या मंत्राचा हा अर्थ आणि हा मंत्र अमुक वेद, आरण्यक, परिशिष्ट इत्यादींत अमुक ठिकाणीं आहे याचें जें ज्ञान त्यास 'ब्राह्मण' म्हणतात

**छंद**– छंद शास्त्रात ज्या अनेक छंदांचा उल्लेख आहे (उदा. अनुष्टुप्) त्यापैकीं ज्या छंदात एकादा मंत्र असेल तो त्या मंत्राचा छंद, जसें मराठींत 'वृत्त'

छंद, ऋषि, देवता, विनियोग व ब्राह्मण या पांच गोष्टी जाणून जें कर्म केलें जातें तें अनंतफलदायक होतें, त्याच्या फळाचा विनाश होत नाहीं, पण या पांचापैकीं एक जरी कमी असलें तरी तें कर्म खड्यांत जातें व कदाचित त्या कर्त्याचाहि नाश होतो. (श्लोक मागील पृष्ठावर आहेत.)

ऋग्वेदी सन्ध्येच्या तीन भाष्यांत व तैत्तिरीय सन्ध्येच्या तीन भाष्यांत मंत्रांच्या स्थानानें स्पष्ट उल्लेख असून पोथ्यांत कोणीच ते दिले नाहींत सध्याच्या मराठी पुस्तकांत अर्थ दिले असलें तरी एकांतहि स्थानाचा उल्लेख नाहीं! माध्यन्दिन आह्निक सूत्रावलींत स्थानाचे उल्लेख असूनहि, त्या धाराऱ्या सार्थ पुस्तकांत ते नाहींत, पण म. म. विद्याधर शर्मा गौड वेदाचार्य इ. काशींतील पंडितप्रवरांनीं संपादिलेल्या गीताप्रेसच्या पुस्तकांत स्थानानें उद्धृत आहेत, इतकेंच नव्हे तर ऋषिछंददेवतांचा निर्णयहि साधार केला आहे यावरून काय ठरतें? अधिक भारवेवारक कोण?

(तैत्तिरीय) कृष्णयजुर्वेदाचें सर्वानुक्रम सूत्र नाहीं, आणि त्या वेदातील अनेक मत्र इतर सर्वांच्या सध्यात आहेत, त्यामुळें ऋष्यादिकाच्या उल्लखात इतकी विविधता आढळते कीं ती पाहून आस्तिकाना सुद्धा किळस येतो! मग इतराचा विश्वास उडाला तर नवल काय? हें वैचित्र्य पाहून किळसच वाटतो, पण ज्या ऋग्वेदाचें सर्वानुक्रम सूत्र आहे व ज्यात ऋग्वेदाच्या सर्व मत्राच्या ऋष्यादींचे उल्लेख आहेत, त्यातील काहीं मत्राची अशीच दुर्दशा केलेली पाहून नीड येते एकच उदाहरण पहा—

'ऋत च सत्य' हा मत्र ऋग्वेदातला (ऋ स अ ८ अ ७ व ४८) आहे याचें सर्वानुक्रमसूत्र 'ऋतच माधुच्छन्दसोऽघमर्षणो भाववृत्तमानुष्टुभ तु' असे आहे 'ऋतच' मत्राचा ऋषि मधुच्छन्दऋषीचा पुत्र अघमर्षण भाववृत्त दैवत, व अनुष्टुप् छद आहे, पण निर्णयसागर पोथींत 'भाववृत्ति', कुठें भाववृत्त कुठें भावभृपः, भावभृत, भावभूत ' असे उल्लेख आहेत! कुठें 'राध्यजायत'च्या जागीं 'रात्रिरजायत' पाठ आहे! पण ऋक्सहितेंत 'रात्र्यजायत' आहे असे अनेक चमत्कार व जावई शोध सध्येच्या छापील पोथ्या व पुस्तकें यात केलेले आढळले! जगदीश्वर मुद्रणालयाच्या शुक्लयजुर्वेदीय सध्येच्या पोथ्यात पुस्तकात ऋषि छद देवताचा उल्लेख प्रणवाशिवाय इतराचा नाहीं! त्या वेदाचें सर्वानुक्रम सूत्र आहे! सध्येसारख्या द्विजाचा प्राण असणाऱ्या विषयात ही अनास्था!

सध्येंत प्रथम, प्राणायामाच्या वेळीं प्रणवाच्या (ओंकाराच्या) ऋष्यादींचा उच्चार करावा लागतो हा एकाक्षर-मत्र तैत्तिरीय नारायण उपनिषदात आहे, तेथें 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म। अग्निर्देवता । ब्रह्म इत्यार्षम्। गायत्रं छंदं, परमात्मस्वरूपम् । सायुज्य विनियोगम्' (नारा उ १४।३३) (तै आ १०।३३) ओं हें एक अक्षर ब्रह्म आहे गीतेत हेंच म्हटलें आहे 'तस्य वाचक प्रणव' (पा यो) प्रणव = ओं, हें त्या परमात्म्याचें, परब्रह्माचें नाव आहे 'ओंकारः परम ब्रह्म' (याज्ञ स्मृ) आधीं वस्तु असते किंवा अस्तित्वात येते व मग तिला नाव दिलें जातें नाव ठेवणारा त्या वस्तूहून कोणीतरी निराळा लागतो परब्रह्मानें स्वत.च आपलें नाव 'ओं' ठेवलें असें म्हणता येईल काय? परब्रह्म निष्क्रिय, निर्गुण, निराकार आहे नाव ठेवणें

वगैरे काहींहि तें करूं शकेल काय? पण मजा कशी झाली पाहा — 'ब्रह्म इति आर्षम्' यात ओंकाराच्या ऋषीचा उल्लेख आहे. काहीं निबंध ग्रंथकारानीं व्याकरण शास्त्राचा विशेष विचार न करतां 'ब्रह्म' हें पदच ऋषीचें नाव मानलें; मग 'ब्रह्म'चें परब्रह्म झालें व कुठें 'परब्रह्म' झालें व कुठें 'परब्रह्म ऋषि-' कुठें 'परब्रह्म ऋषि.' असे उल्लेख होऊं लागले आणि स्मृतिवचनाकडे बघण्याची इच्छाच झाली नाहीं. सं. र. माला, निर्णयसागर पोथी, जगदीश्वर मुद्रणालय पोथी इत्यादि लिहिणाऱ्या शास्त्री पंडिताना साशंकता वाटली असेल कदाचित्; म्हणून त्यानीं 'रामाय स्वस्ति' 'रावणाय स्वस्ति' याप्रमाणें एकदा 'परब्रह्म ऋषिः' किंवा 'परब्रह्म ऋषि- लिहिलें व एकदा 'ब्रह्मा ऋषि.' लिहिलें व संध्येचीं पुस्तकें लिहिणाऱ्या काहीं लेखकानीं त्याची री ओढली.

इ. स. १९०० सालीं कुलोपाध्यायानीं जी संध्या शिकाविली होती ती कधीं विसरली न गेल्यानें पोथी बघण्याची वेळ आली नाहीं व घोटाळा दृष्टीस पडला नाहीं. 'परब्रह्म ऋषि 'च होते १९४३ सालीं आश्रमांतर झालें; त्यात सद्गुरु महाराजाकडून मिळालेल्या प्रणवाच्या विज्ञानात 'प्रजापतिः ऋषिः' हें प्राप्त झालें. प्रजापति = ब्रह्मदेव. त्यास काशींतील परंपरागत दुधाहारी मठाच्या स्वामीकडून मिळाली होती (ती माहिती).

या ग्रंथाच्या लेखनासाठीं ग्रंथावलोकन सुरू झाल्यावर वरील विविध ब्रह्मघोटाळे पुढें आले! याज्ञवल्क्य स्मृतींत, 'ब्रह्मार्षं च स्वयंभुवः' असें सापडलें. त्याचा स्पष्ट अर्थ स्वयंभू ब्रह्मा ऋषि असाच होतो; पण ब्रह्मार्षं = ब्रह्म आर्षं असें वाचक समजतील; म्हणून प्रयत्न सुरू! 'मदन पारिजात'मध्यें संवर्त स्मृति वचन अगदीं स्पष्ट सापडलें कीं 'ओंकारस्य ऋषिर्ब्रह्मा' ओंकाराचा ऋषि ब्रह्मा अनि पु २०५।३२ 'प्रणवस्य ऋषिर्ब्रह्मा' 'ब्रह्मार्षं तस्य विज्ञेयम्' (वृ पारा स्मृ)

> ओंकारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा ।
> कण्ठं भित्वा विनिर्यातौ तस्मान्माङ्गलिकावुभौ

हें प्रसिद्धवचन उपनिषद्भाष्यात सापडलें.

ओंकारोऽथव्याहृतयः गायत्री सशिरास्तथा ।
आदित्यरक्षणार्थं तु सायं प्रातर्दिने दिने ।
सृष्टा· स्वयंभुवा पूर्वं ब्रह्मणस्तन्मुखं श्रुतम् ' (याज्ञ स्मृति)

ओंकार व्याहृती, गायत्री व गायत्री शिरोमंत्र यांची उत्पत्ति **स्वयंभूनें** केली. स्वयभू = ब्रह्मदेव सागलीहून मागविलेल्या ऋक्सर्वानुक्रमसूत्राच्या उताऱ्यात ' गृह्यपरिशिष्ट अ १ खड ८ मध्यें ' **प्रणवस्य ब्रह्मा** परमात्मा, दैवी गायत्री ' हा आधार मिळाला ' काशींतील पडितानीं लिहिलेल्या पुस्तकाच्या भूमिकेंत ' **ब्रह्मा ऋषि** ' साधार सिद्ध केलेलें सापडलें, पण प्रयोगात ' ब्रह्म ऋषिः ' आढळलें म्हणून गीताप्रेस व्यवस्थापकास पत्रानें विचारलें त्याचें उत्तर १८ जुलाई १९६१ चें आलें कीं ' ब्रह्मा च असौ ऋषिश्च' या विग्रहानुसार सधि ' ब्रह्म ऋषि ' असा होऊ शकतो त्यास पाणिनी सूत्राचा आधारहि दिला आहे

असे भरभक्कम आधार सापडले, तरि व्याकरणाचें मूळातच अल्प असलेलें ज्ञान गत २५ वर्षांत मलिन झालेलें ! त्यामुळें 'ब्रह्म इत्यार्षम्' या श्रुतीचा समाधानकारक निश्चय होईना ! म्हणून मुंबईतील एका सदाचारसपन्न, प्रतिष्ठापराङ्मुख दुरभिमानरहित, तैत्तिरीय, व्याकरणाचार्य, वेदान्ताचार्य इत्यादि परीक्षोत्तीर्ण, शास्त्र्यास पत्रानें विचारलें कीं 'ब्रह्मा + इत्यार्षम्' आणि ब्रह्म + इत्यार्षम्' याचे सधि कसे लिहिले जातील ? त्याच्या ६।९।६१ च्या पत्रात लिहून आलें कीं 'पुंल्लिंगी ब्रह्मन् शब्दाचें रूप असल्यास 'ब्रह्म इत्यार्षम्' हें बरोबर व नपुसक विवक्षा असून 'ब्रह्मा' असें लिहिलें असल्यास 'ब्रह्मा इत्यार्षम्' हें बरोबर '

या पत्रानें तैत्तिरीय श्रुतीचा पूर्ण उलगडा झाला 'ब्रह्मन्' पुंल्लिंगी ब्रह्मदेव, प्रजापति, स्वयभू ब्रह्म = परब्रह्म हें नपुसक लिंगीं ब्रह्मन् शब्दाचें रूप आहे परब्रह्म ऋषि ' असें सागावयाचें असतें तर श्रुतीनें 'ब्रह्म इत्यार्षम् ' असें सागितलें असतें, पण याचाहि उलटा अर्थ घेतला गेला असता ! प्रणवाचा ओंकाराचा ऋषि कोण या विषयीं कोणासहि शका कुशका घेण्यास जागा राहिली नाहीं हें सर्व पुराव पाहिल्यावरसुद्धा जे कोणी दुरभिमानी 'परब्रह्म ऋषि ' किंवा 'परब्रह्म ऋषि 'च म्हणत राहतील ते

तातस्य कुपोऽयमिति ब्रुवाणाः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति ।
या वर्गातलेच ठरतील ।

प्रणव-देवता– तैत्तिरीय श्रुति वचनानें 'अग्नि' देवता असें वाटलें तरी 'देवोग्नि परमात्मा' अग्नि पु व इतर अनेक स्मृत्यादि ग्रंथात व सध्याभाष्यात अग्नि = परमात्मा, असाच अर्थ केला आहे

छंद– 'गायत्र' म्हणजे गायत्री, छद असें म्हटलें असलें तरी 'दैव्येकम्' या सूत्रानुसार दैवी गायत्री छद असें अनेकानीं स्पष्ट केलें आहे व गृह्य परिशिष्टातहि 'दैवी गायत्री'च आहे 'देवी गायत्री छन्द' असा पाठ काहीं पोथ्यात व पुस्तकात आढळतो तो त्याज्य आहे

विनियोग कुठें 'सर्वकर्मसु सध्याप्रकरणात 'आदिकर्माणि' श्रुतीनें 'शापुज्यन्' म्हटलें आहे हीं सर्व वचनें हेंच सागतात कीं, ज्या कर्मात उपयोग करावयाचा असेल त्याचा विनियोगात उच्चार करावा प्राणायामे, अर्घ्यदाने, जपे (इत्यादि) विनियोग

प्रणवानतर सात व्याहृतींचा उपयोग करावयाचा असतो त्याविषयीं दोन प्रकार आढळतात

'व्याहृतीना च सर्वासा आर्ष चैव प्रजापति' (सवर्त स्मृति)

'व्याहृतीना च सर्वासामृषिरेव प्रजापति' (अग्नि. पु)

प्रणववर्णनात योगी याज्ञ० स्मृतीच्या वचनात सागितलें आहे कीं, व्याहृती ब्रह्मदेवानें स्वयभूनें उत्पन्न केल्या

'अव्याहृतमिद ह्यासीत् सदेवासुरमानुषम् ।
सक्षेपायाऽसृजत् ब्रह्मा तेना व्याहृती पुरा॥' (बृह पारा स्मृ)

एक दोन स्मृतींत व अग्निपुराणात एका पाठभेदात व्याहृतींचे सात ऋषि सागितले आहेत पण 'कलौ पाराशर स्मृति' मुख्य प्रमाण म्हणून प्रजापति (= ब्रह्मदेव) ऋषिच अधिक ग्राह्य, शिवाय त्यामुळें विस्तारहि वाचतो, छद व देवता यात मतभेद नाहींत

नतर त्रिपदा गायत्री मंत्र येतो– याच्या ऋषिछद देवतावर्णनात कुठेंच मतभेद दिसला नाहीं गायत्री छद, विश्वामित्र ऋषि व सविता देवता

एक महत्त्वाचा प्रश्न विचारखतापुढें उभा राहील कीं हा विश्वामित्र कोण ? कौशिक विश्वामित्र कीं दुसरा कोणी विश्वामित्र ? वसिष्ठाच्या शभर पुत्रास मारणारा व शेवटीं 'धिग् बल क्षात्रिय बल ब्रह्मतेजो बल बल। इत्यादि म्हणणारा कौशिक विश्वामित्र जर गायत्रीचा ऋषि असेल तर त्या विश्वामित्राच्या पूर्वींचे, फार पुरातन ऋषि, अत्रि, मरीचि वसिष्ठ इत्यादि ब्रह्मदेवाचे मानव पुत्र गायत्रीची उपासना करीत होते कीं नाहीं ? आणि 'ब्रह्मादयोऽपि सध्याया ता ध्यायन्ति जपन्तिच' (देवी भाग) ब्रह्मदेवादि सुद्धा गायत्रीची उपासना करतात हें वचन खोटें कीं काय ?

**समाधान** अशा शंकेला थारा मिळू नये म्हणून मनु वगैरेंनीं विश्वामित्र शब्दाचा अर्थ स्पष्ट केला आहे

त्रिभ्य एव तु वेदेभ्य पाद पाद अदूदुहत्।

तादित्यृचोऽस्या सावित्र्या परमेष्ठी प्रजापति ' (मनु २।५७ श्रीकृष्ण पंडितभाष्येऽपि) परमेष्ठी प्रजापतीनें (ब्रह्मदेवान) 'तत्०' इत्यादि सावित्री = गायत्री ऋचेचा एक एक पाद तीन वेदाचें जणू दूध काढून तयार केला योगी याज्ञवल्क्य स्मृतींत

ओंकारोऽथ व्याहृतयो गायत्री सावित्रास्तथा।
सृष्ट स्वयभुवा पूर्वम्—'

स्वयभू ब्रह्मदेवानें गायत्रीची उत्पत्ति केली '।विश्वस्य मित्र द्विजराज-पूज्यो मुनीर्नियोगस्तु जपादिकेषु' (वृ पारा) 'विश्वस्य जगतो मित्र विश्वामित्र प्रजापति ' इत्यादि वचनानीं सिद्ध झालें कीं, हा विश्वामित्र म्हणजे ब्रह्मदेव, जो सर्व विश्वाचा—जगाचा मित्र आहे व सर्व द्विजश्रेष्ठाना पूज्य आहे सर्वेषामेव वेदाना गुह्योपनिषदा तथा। सारभूता तु गायत्री निर्गता ब्रह्मणो मुखात् ॥ (छांदो परि) मात्र येथें 'विश्वामित्र' न म्हणता प्रजापति ' म्हणून चालणार नाहीं, कारण श्रुति स्मृति पुराणें व सर्वानुक्रमसूत्रें यात 'विश्वामित्र' शब्दच आहे. फक्त त्या शब्दाचा अर्थ प्रजापति हें जाणणें जरूर आहे प्रयोगात 'विश्वामित्र = प्रजापति' असें पुढें उल्लेखिलें आहे

**शिरोमंत्र**– 'आपो ज्योती' मंत्राला गायत्रीशिरोमंत्र म्हणतात. पूर्वी दिलेल्या योगी-याज्ञवल्क्य वचनात स्पष्ट सांगितलें आहे कीं हा ब्रह्मदेवानें निर्माण केला. अग्नि पुराणांत

ऋषिः प्रजापतिस्तस्य छन्दोहीनं यजुर्यतः ।
ब्रह्माग्निवायुसूर्याश्च देवताः संप्रकीर्तिताः ॥

असें म्हटलें आहे. धर्मसिंधु, सं. र. माला; मा. आ. सू; इत्यादींत 'यजुः' छंदच दिला आहे; म्हणून प्रजापति ऋषिः, ब्रह्मा, अग्नि, वायु व सूर्य (आदित्य) देवता व यजुः छंद हें ठरलें.

**पहिल्या मार्जनाचे मंत्र**–'आपो हिष्ठा' इत्यादि तीन आहेत. याविषयीं फारसे मतभेद नाहींत. व ऋक्सर्वानुक्रम सूत्र आहे. सं. र. माला ग्रंथात याचे ऋषिदेवता निराळे दिले आहेत; पण ते उल्लेख ऋक्सर्वानुक्रम-सूत्रविरोधी असल्यानें उपेक्षणीय आहेत.

**मंत्राचमन**– यात प्रातः, मध्यान्ह व साय संध्येत अनुक्रमें 'सूर्यश्च०' 'आपः पुनन्तु०' व 'अग्निश्च०' हे मत्र आहेत व हे सर्व तैत्तिरीय आरण्यक व नारायणोपनिषद् मधले आहेत. तें आरण्यक-उपनिषद्–नारायणानें सांगितलें आहे; व त्यात याच्या ऋष्यादिकाचा उल्लेख नाहीं; म्हणून नारायण ऋषि मानणेंच सयुक्तिक आहे; शिवाय संवर्त स्मृतीचा फार मोठा आधार यास आहे. त्यात 'आपः पुनन्तु' व 'अग्निश्च' याचा 'नारायण' म्हटलें आहे; 'सूर्यश्च०'चा 'अग्नि' सांगून 'केचन नारायण इति मन्यन्ते' असें म्हटलें आहे. कोणी 'याज्ञिक्यो देवता उपनिषद ऋषयः' कोणी 'ब्रह्मा', धर्मसिंधूत एकदा 'याज्ञवल्क्य उपनिषद ऋषि.' व एकदा 'नारायण' व 'आप पुनन्तु'चा नारायण व याज्ञवल्क्य इत्यादि भेद! गृह्य परिशिष्टातील वचनात ब्रह्मा, रुद्र व विष्णु सांगितले आहेत. वरील सर्व कारणास्तव तिन्ही मत्राचा नारायण ऋषि घेणेंच योग्य आहे.

'सूर्यश्च०' या मंत्राचा नारायण ऋषि. । सूर्यमन्यु मन्युपतयो रात्रिश्च देवताः । प्रकृतिश्छन्द. । हें ठरलें.

'आपः पुनन्तु०' यात दोन मंत्र आहेत व स. र. मा 'इति द्वयो.' असेंच म्हटलें आहे, ते लेखक तैत्तिरीय आहेत. गृह्यपरिशिष्टात 'विष्णु.

आप अष्टि ' असा उल्लेख आहे; पण सर्वतस्मृतींत 'नारायण आपोऽनुष्टुप्' असा स्पष्ट उल्लेख आहे. यातील पहिल्यात ' आप पुनन्तु० ' यात ३३ व ' यदुच्छिष्ट० ' यात ३२ अक्षरें आहेत. दोन एकच समजून ' अष्टि ' म्हटलेलें दिसतें. अष्टि छदात ६४ अक्षर असतात. एक जास्त असलें तरी छद ताच राहतो, फार तर त्याला ' भुरिक् ' हें उपपद लागतें ( अग्नि पु ) सर्वत स्मृतींत ' आपो देवता ' असें म्हटलं तो केवळ पहिल्या पादातील देवतेचा उल्लेख आहे. ज्याप्रमाणें ' सूर्यश्च० ' मंत्रात ज्या देवताना प्रार्थना आहे त्या सर्व बहुतेकानीं घेतल्या आहेत व ' अग्निश्च० ' यातीलहि सर्व घेतल्या आहेत, म्हणजेच लिंगोक्त देवता घेतल्या, त्याप्रमाणें ' आप पुनन्तु० ' यातील लिंगोक्त देवता घेणें जरूर आहे, त्या आप पृथिवी, ब्रह्मणस्पति व ब्रह्म या चार आहेत, म्हणून या मंत्राचा ऋषि नारायण, अनुष्टुप् छद व आप पृथिवी ब्रह्मणस्पति ब्रह्मच देवताः हें ठरलें

' अग्निश्च० ' नारायण ऋषि । अग्निमन्युमन्युपतयोऽहश्च देवता । प्रकृतिश्छन्द हें ठरलें. काशीतील महामहोपाध्याय वेदाचार्य यानीं या मंत्राचे असेच ऋषि देवता छद दिले आहेत

**दुसरें मार्जन**– यात ' आपो हि ष्ठा० ' इत्यादि नऊ मंत्राचे सूक्त आहे, व ' ससृपी० ' हा मंत्र आहे वरील सूक्ताच्या छदर्षि देवता-वर्णनात फारसा मतभेद नाहीं, त्यात ' पचमी वर्धमाना, व ' सप्तमी प्रतिष्ठा ' असा उल्लेख सर्वानुक्रमसूत्रानुसार आहे पण वर्धमाना व प्रतिष्ठा हीं स्वतंत्र छदाचींच नावें आहेत असेंच बहुतेक म्हणतील पण हे दोन गायत्रीचेच प्रकार आहेत त्याचीं लक्षणें आरंभीच्या प्रकरणात ऋषि, छद, देवता विवेचनात दिलीं आहेत प्रयोगात वर्धमाना (गायत्री) व प्रतिष्ठा (गायत्री) असें स्पष्ट केलें आहे ' ससृपी ' या मंत्राचे ऋष्यादि तिन्ही सध्या भाष्यात किंवा पोथ्यात किंवा सध्येच्या पुस्तकात कोठें दिलेले नाहींत. गृह्यपरिशिष्टादींतील ऋष्यादि वर्णनात मिळाले नाहींत हा गृह्यपरिशिष्टातला मंत्र आहे यात एकदर तीस अक्षरें आहेत ३२ अक्षराचा अनुष्टुप् होतो २ अक्षरें कमी असलेला अनुष्टुप् छद ठरला, ' द्वाभ्या विराट् स्वराजो ' या पिंगल सूत्राप्रमाणें हें ठरलें ब्रह्मर्षि सातवळेकर याजकडून ऐसें समजलें कीं याचा शन्ताति ऋषि व हा

अथर्व० ६।२३।१ मंत्र आहे. देवता आपः मन्त्रार्थावरून स्पष्ट आहे; म्हणून सन्ताति ऋषिः । आपो देवताः । स्वराडनुष्टुप् छन्द । हें ठरलें.

अघमर्षण– 'ऋतंच०' इत्यादि तीन मंत्र आहेत. ऋक्सर्वानुक्रम सूत्र स्पष्ट असल्यानें त्याप्रमाणें ऋष्यादि दिले आहेत. याविषयीं या मंत्राच्या देवतेच्या वर्णनांतील घोटाळ्याविषयीं आधींच उल्लेख केला आहे.

अर्घ्यदान– मध्यान्हसंध्येंत 'हंसः शुचिषद्०' हा मंत्र आहे. याचें सर्वानुक्रमसूत्र व विवरणें दोन ठिकाणचीं मिळालीं. एकांत त्रिष्टुप् छंद आहे व एकांत जगती. या मंत्रात ४७ अक्षरें आहेत. त्रिष्टुप् छंद ४४ अक्षराचा व जगती ४८ अक्षराचा; म्हणून जगती छंद घेणेंच शास्त्रशुद्ध. 'वामदेवः सूर्यो जगती' हें सूत्रविवरणच शुद्ध आहे. पोथ्यांत 'गौतमो वामदेवः' आहे तें घेणें योग्य नाहीं

उपस्थान– 'मित्रो जनान्' या सूक्ताचा 'गाथिनो विश्वामित्र ऋषि.। सविता देवता' असें अनेकांनीं दिलें आहे; पण ऋक्सर्वानुक्रम-सूत्रविवरणांत 'विश्वामित्रो मित्रस्त्रिष्टुप् अन्त्याश्चतस्रो गायत्र्य.' असा उल्लेख आहे. मित्र म्हणजे सूर्य, सविता हा साधारण अर्थ असला तरी त्याच्या विशेष अर्थामध्यें फार अंतर आहे सविता = उत्पत्त्यादि करणारा आणि मित्र = मित्राप्रमाणें हित करणारा; मंत्रात सविता शब्द नसून 'मित्र' शब्दच आहे. जो सविता आहे तो संहारहि करतो, तो मित्रासारखा वागेलच असें नाहीं. दोष घडले कीं, तो शिक्षा करणारच; पण मित्र दोषाकडे न बघता सुख देतो, हित करतो' 'मित्र'च्या जागीं 'सूर्य' भानु सुद्धा म्हणणें चूकच.

'त्र्यंबकं०' 'मैत्रावरुणिर्वसिष्ठ ऋषिः' असेंच पोथ्या पुस्तकांत आढळतें, पण सर्वानुक्रम-सूत्रांत फक्त 'वसिष्ठ' च आहे. वसिष्ठ ब्रह्मदेवाचे मानसपुत्र- मैत्रावरुणि = मित्र व वरुण याच्या पासून झालेला, वसिष्ठ. मूळ वसिष्ठाचा राजाच्या शापानें नाश झाल्यावर मित्र व वरुण यापासून पुन्हा वसिष्ठाची उत्पत्ति झाली. दोन्ही व्यक्ति एकच असल्या तरी दोघात हजारों वर्षांचा कालभेद आहे; म्हणून व सूत्रात 'वसिष्ठ' च आहे म्हणून 'वसिष्ठ ऋषिः' च म्हटलें पाहिजे. 'त्र्यंबकं' चा उच्चार 'त्रियंबकं' करतात तोच शुद्ध होय.

'चित्रं देवानां' 'कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप्' असें सूत्र विवरण असून 'आंगिरस कुत्सः' असा पाठ आढळतो कुत्स ऋषि च घेणें योग्य आहे.

'नमो ब्रह्मणे' सूत्र परिशिष्टांतील वचनात 'जगती' छंद असा उल्लेख मिळाला; पण तो लेखक-प्रमाद मानणें भाग आहे; कारण या मंत्रात ११।११ अक्षरांचे चार चरण अगदीं स्पष्ट आहेत. 'त्रिष्टुभो रुद्राः पादः' या छंदाच्या प्रत्येक पादात ११ अक्षरें असतात. 'जगत्या आदित्याः पादः' 'जगती' च्या प्रत्येक पादात १२ अक्षरें असतात, असें अग्नि पुराणांतील 'छन्दःसार' अध्यायात स्पष्ट म्हटलें आहे. 'जगती'ला ४८ अक्षरें पाहिजेत, व यात ४४ आहेत. हा अगदीं शुद्ध त्रिष्टुप् छंद आहे. पिंगलसूत्राधारें हेंच ठरलें. 'गणानां त्वा०' मंत्राचा 'शौनको गृत्समदो गणपतिर्जगती' म्हणजे जगती छंद आहे. अक्षरें ४८ आहेत; मोजून पहावीं.

'तच्छंयोः' या मंत्राच्या स्थानाचा उल्लेख एकाहि संध्याभाष्यातसुद्धा नाहीं; पुण्यातील एका ग्रंथीं वैदिकाकडून लिहून आलें कीं, याचें 'मूलमपि च न ज्ञायते तन्मार्गणमावश्यकमिति मन्ये' (भाद्र. शु ५।१८८२) याचें मूळ-स्थान विदित नाहीं. त्याचा शोध करावा लागेल. ब्रह्मर्षि सातवळेकर यांचेकडून याचें स्थान कळलें तें प्रयोगात दिलें आहे.

'आयातु वरदा०' याचे ऋष्यादि पोथ्या-पुस्तकात दिलेले नाहींत, व स्वरहि त्या मंत्रास दिलेले नाहींत, पण खडराजदीक्षितकृत भाष्यात तो स्वरासहित छापलेला आहे हा मंत्र तैत्तिरीय आरण्यकातला आहे. ऋष्यादि एका ग्रंथात सांपडले प्रयोगात दोन्हींचा उल्लेख केला आहे. 'उत्तमे शिखरे०' याचेहि ऋष्यादि दिले आहेत.

ऋग्वेदीय संध्येंतील इतर मंत्राच्या विषयीं फारसे मतभेद दिसले नाहींत; त्याचे ऋष्यादि ऋक्सर्वानुक्रमसूत्रानुसार च प्रयोगात दिले आहेत.

ऋक्प्रातिशाख्य ग्रंथ उव्वटभाष्यसारासह आयत्या वेळीं हातीं आला त्याचा तर छंदादिनिर्णय करण्यात फार उपयोग झाला पटल १६ व १७ यात फार उपयुक्त माहिती मिळाली. या ग्रंथाचे अभ्यासी फारच विरळा! 'पिंगल छन्द सूत्रम्' हलायुधवृत्ति व कादम्बिनी टीका टिप्पणी सहित काशीहून मुद्दाम मागविलें, त्याचाहि फार उपयोग झाला.

## शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन संध्येतील मंत्रांचे ऋषि-देवता-छंद

या वेदाचें सर्वानुक्रमसूत्र असून सुद्धा पुष्कळ विविधता उत्पन्न झाली आहे या सध्येंतहि तैत्तिरीयाचे बरेच मंत्र आहेत, थोडे ऋग्वेदातले आहेत. यजु सर्वानुक्रम सूत्राचे उतारे गीताप्रेसच्या पुस्तकात मिळाले त्यामुळें निर्णय करणें सुलभ झालें

'अपवित्रः'- वामदेव ऋषि. । विष्णुर्देवता अनुष्टुप् छद । इतरत्र मिळाले गीताप्रेस पुस्तकात नाहींत

सूचना- 'पृथ्वीति०' प्रणव, व्याहृती, गायत्री, गायत्री शिर, 'सूर्यश्च०' 'आप पुनन्तु०' 'अग्निश्च०' 'ऋत च०' 'आ कृष्णेन०' 'आपोहिष्ठा०' या मंत्राच्या ऋष्यादीचा निर्णय पूर्वी केला आहे तसाच

१ 'द्रुपदादिव०' हा मंत्र किंचित् फरकानें तैत्तिरीय सध्येंतहि आहे, अक्षरसख्या सारखीच आहे याचें यजु सर्वानुक्रमसूत्र-'द्रुपदादिवानुष्टुब्आपी' आहे अनुष्टुप् छद 'आपो देवता' इतकेंच त्यात आहे मा आ सू त 'कोकिल राजपुत्र' असा उल्लेख आहे, पण बृहत्पाराशर स्मृतींत 'कोकिलो राजपुत्र' असा स्पष्ट उल्लेख आहे, म्हणून 'कोकिलो राजपुत्र' किंवा 'राजपुत्र कोकिल ऋषि । आपो देवता' अनुष्टुप् छद । हें ठरलें (बृ पारा २।५०)

२ 'सुमित्रिया०' हा एकच (१३+१८) ३१ अक्षराचा मंत्र वा यजु० ६।२२ चें उत्तरार्ध, ३५।१२, ३६।२३, व ३८।२३ इतक्या ठिकाणीं आहे हा एकच मंत्र असून मा आ सूत्रावलींत 'सुमित्रिया दुर्मित्रिया इति द्वयो' असे म्हटलें आहे, त्यास कुठें आधार नाहीं शुक्लयजु सर्वानुक्रम सूत्रात ६।२२ उत्तरार्ध व ६।१३ या दोन्ही मंत्राविषयीं उल्लेख आहे कीं 'सुमित्रिया न आपः, हविष्मती लिंगोक्त देवता अनुष्टुप्' लिंगोक्त देवता 'आप' आहेत सूत्रात ऋषीविषयीं उल्लेख नाहीं, पण 'यजु सर्वानुक्रमसूत्रम्' ग्रंथात पहिल्या अध्यायाच्या प्रारंभींच सूत्र आहे कीं 'इषेत्वा' या पहिल्या मंत्रापासून 'ख ब्रह्म' या अ ४० मधील शेवटच्या मंत्रापर्यंत जेथें सूत्रात ऋषींचा उल्लेख केलेला नाहीं तेथें 'विवस्वान्' ऋषि मानावा, म्हणून ठरलें कीं 'सुमित्रिया० या मंत्राचा विवस्वान् ऋषि । आपो देवता व १ अक्षर कमी असलेला अनुष्टुप्, म्हणजे निचृदनुष्टुप् छन्द ।

३. 'उद्वयं०' प्रस्कण्वः सूर्योऽनुष्टुप् असा उल्लेख मा. आ. सू. व गीताप्रेस पुस्तक यात आहे व तो बरोबर आहे. 'उदुत्यं०' मा. आ. सू. व पाठकशास्त्री पुस्तक यात अनुष्टुप् छंद दिला आहे, पण 'यजुःसर्वानुक्रमसूत्र उदुत्यं प्रस्कण्वः सौरी गायत्री' असें आहे. उदुत्यमिति प्रस्कण्वो गायत्रं सूर्यदेवता' (वृ. पारा. स्मृ. अ. २) याच्या तिसऱ्या पादात एक अक्षर कमी आहे; पण 'इयादि पूरणः' या सूत्रानुसार जसें 'त्र्यंबकं यजामहे' यात उच्चार 'त्रियंबकं' 'घृणिः सूर्य आदित्य' यातील 'सूर्य'चा सूरिय केला पाहिजे. (स र. मा. पहा), तसाच या मंत्रातील 'सूर्यम्' चा 'सूरियम्' केला म्हणजे गीताप्रेस-पुस्तकात 'निचृद्गायत्री' म्हटलें आहे तसें म्हणण्याचें कारण नाहीं. मात्र अनुष्टुप् छद म्हणताच येणार नाहीं. त्यात ८।८ अक्षराचे चार चरण पाहिजेत. यात तीनच आहेत व अक्षरें २३ आहेत. गायत्रीछंद म्हणणें योग्य वाटल्यास निचृद (एक अक्षर कमी असलेला) 'गायत्री' म्हणावें. प्रयोगात सूत्रानुसारच वर्णन दिलें आहे. वृहत् पाराशरस्मृतीतहि 'गायत्री'च म्हटलें आहे.

४. तच्चक्षुर्देवहितं- याचा मा. आ. सू. उष्णिक् छंद दिला आहे. पाठकशास्त्रीपोथीत तोच. शुक्ल परिशिष्टात 'पुरउष्णिक्' दिला आहे. उष्णिक् छदात २८ अक्षरें पाहिजेत. पुरउष्णिक्चें लक्षण अग्निपुराणात 'सूर्यवसु-वस्वर्णे ' त्रिपाद् भवेत्' (श्लोक ६) १२, ८, ८, अक्षराच्या तीन चरणाचा पुरउष्णिक् छद होतो. हेंच ऋक्प्रातिशाख्य व पिंगलसूत्रात आहे. या मंत्रात ६७ अक्षरें आहेत. ६८ अक्षराचा अत्यष्टिः छंद होतो. यजु सर्वानुक्रम सूत्रभाष्यकार अनंतदेव यानीं ऊहापोह करून हेंच सिद्ध केलें आहे कीं पुर उष्णिक् छद असूच शकत नाहीं; कारण त्यात २८ अक्षरें असतात (मात्र त्यानीं पुरउष्णिक्चें लक्षण दिलेलें नाहीं.) येथें 'एकाधिका ब्राह्मी त्रिष्टुप्' व्यूहेनाऽत्यष्टिर्वा.' व्यूह म्हणजे एका अक्षराची पूर्ति करणें मा आ. सू. नुसता उष्णिक् दिला आहे, त्याला तर काहींच आधार नाहीं. म्हणून दध्यङ्ङाथर्वण ऋषिः (सूर्योदेवता) अत्यष्टिच्छन्दः

५. आवाहन मंत्र- 'तेजोसि मसि' हा एक व 'धामनामासि... यजनमासि' हा दुसरा मंत्र आहे यानें यजु सर्वानुक्रमसूत्र- 'तेजोसि धामाज्य, परमेष्ठिप्राजापत्यो दर्शपूर्णमास मंत्राणा ऋषि देवा प्राजापत्या.'

असें आहे. यात छंदांचा उल्लेख नाहीं. मा. आ. सू. हा एकच मंत्र आहे असें छापलें व म्हटलें आहे व पाद किंवा मंत्रार्धहि दाखविलेले नाहींत. पाठक शास्त्री पुस्तकात 'तेजोसि ... धामनामासि । प्रियं देवाना ...... यजनमसि ॥ असे १६।१६ अक्षरांचे दोन भाग पाडले आहेत व एकच मंत्र म्हणून म्हटलं आहे. तें जरी मान्य केलें तरी १२ अक्षरेंच आहेत. जगती छंदात ४८ अक्षरें, १२।१२ अक्षरांच्या चार चरणाचीं पाहिजेत; असें असता मा. आ. सू. व पाठकशास्त्री पुस्तक यात 'जगती' छंद म्हटलें आहे; तें अशास्त्रीय आहे. पहिल्या मंत्रात ११ अक्षरें आहेत. ११ अक्षराचा आसुरी पंक्ति छंद होतो. दुसऱ्यात २१ अक्षरें आहेत. २१ अक्षराचा ऋगुष्णिक् छंद असतो असें ऋक्प्रातिशाख्यावरून सिद्ध झालें आहे. पिंगलसूत्रानेंहि हेंच ठरलें. वरील सूत्रात 'आज्यं' म्हटलें आहे, म्हणून मा. आ. सू. म्हटल्याप्रमाणें 'आज्य' देवता म्हणण्यात हरकत नाहीं; म्हणून 'तेजोसि धामनामासि' या दोन मंत्राचा ऋषिः परमेष्ठी प्रजापतिः । आज्यं देवता । प्रथमस्य आसुरी पंक्ति । द्वितीयस्य ऋगुष्णिक् छन्दः । हें ठरलें. ( ऋक्प्रातिशाख्य पटल १६ पहा ).

६. गायत्र्युपस्थानम्– 'गायत्र्यस्येकपदी सावदोम्' इतकाच मंत्र मा. आ. सू. दिला आहे व तो कोठला आहे हें दाखविलेलें नाहीं. हा मंत्र शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यक उपनिषदातला ५।१४।७ वा आहे. त्यात 'सावदोमा प्रापत्' असें आहे; म्हणजे 'आ प्रापत्' हीं तीन अक्षरें गळलीं आहेत. असे घोटाळे होऊं नयेत म्हणूनच मंत्राच्या मूळ स्थानाचें ज्ञान स्मृतींनीं आवश्यक म्हणून सांगितलें आहे. या मंत्रात ५० अक्षरें आहेत; तीन कमी घेतलीं तर ४७ होतात. असें असता मा. आ. सू. 'गायत्री छंद' म्हटलें आहे. ४८ अक्षराचा जगती छंद होतो. (गायत्रीचीं अक्षरें चोवीस !) दोन जास्त असल्यास त्याला स्वराड् हें उपपद लागतें. १ कमी असल्यास 'निचृद' उपपद लागतें. हा मंत्र बृहदारण्यकात जितका दिला आहे तितकाच घेणें योग्य. म्हणून 'गायत्र्यसि मंत्रस्य विवस्वान् ऋषिः । स्वराड्जगती छंद. । परमात्मा देवता । गायत्र्युपस्थाने विनियोग' । असें ठरलें. तीन अक्षरें कमी घेण्याचाच ज्याचा हट्ट असेल त्यानीं 'निचृद् जगती छंद' । तरी म्हणावें, वे. मू. मुळेशास्त्री नगर

याचे जवळील जुन्या पोथींत उपनिषत्प्रमाणेंच आहे. ( पत्र ३०।११।६१ )

**प्रदक्षिणामंत्र-** ' विश्वतश्चक्षु० ' मा. आ. सू. याचा विश्वकर्मा भौवन ऋषिः। विश्वकर्मा देवता। त्रिष्टुप् छंदः। असा उल्लेख आहे; पण यजुःसर्वानुक्रमसूत्रानुसार ' भौवन ऋषिः। विश्वकर्मा देवता। त्रिष्टुप् छंदः। सूर्यप्रदक्षिणाया विनियोगः। असें घेणेंच योग्य आहे.

**जपनिवेदन-** ' देवा गातुविद० ' मा. आ. सू. विराट् छंद दिला आहे; पण कोणत्या छंदाचा विराट् हें सांगितलेलें नाहीं. या मंत्रात ३० अक्षरें आहेत; ३२ अक्षरांचा अनुष्टुप् छंद; त्यात दोन अक्षरें कमी आहेत; म्हणून विराडनुष्टुप् छंद म्हणणें भाग आहे. ' मनसस्पतिर्ऋषिः। वातो देवता। विराडनुष्टुप् छंदः। जपनिवेदने विनियोग.। हें ठरलें. (दोन कमी वा अधिक असतील तर) ' द्वाभ्यां विराट् स्वराजौ ' पिंगलसूत्र.

**गायत्री विसर्जनम्-** ' उत्तमे शिखरे० ' मा. आ. सू. उत्तमे शिखरे देवि भूम्या पर्वतमस्तके। ब्राह्मणेभ्यो विनिर्मुक्ता...सुखम् असा मंत्र आहे. पाठकशास्त्री पुस्तकात ' उत्तमे शिखरे जाता भूम्या पर्वतमूर्धनि इत्यादि; बाकीचें बरोबर आहे. यानीं मंत्र कोठला हें दिलेलें नाहीं। गीता प्रेस पुस्तकात मंत्राचें स्थान दिलें आहे तें बरोबर आहे; पण उत्तमे शिखरे देवी ' असा पाठ आहे. हा मंत्र तै. आ. प्र. १० अ. ३० मधला आहे व तेथें तो ' उत्तमे शिखरे जाते भूम्या पर्वतमूर्धनि। ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छदेवि यथासुखम् ' असा आहे. नारायणोपनिषद्मध्येंहि असाच आहे; म्हणून हाच घेणें योग्य आहे. संध्याभाष्यकारानीं (ऋग्वेदी व तैत्तिरीय) हाच घेतला आहे.

**ऋषि देवता छंद-** पाठकशास्त्री पुस्तकात दिलेलेच नाहींत. मा. आ सू. ' कश्यप ऋषिः ' गीता प्रेस ' वामदेव ऋषिः ' म्हटलें आहे. तैत्तिरीय नारायणोपनिषदात आहे; तेथें ऋष्यादींचा उल्लेख नाहीं. ' स्मृतिमुक्ताफल ' ग्रन्थातहि कर्मकाण्डविभागात ' वामदेव ' ऋषिच आहे म्हणून वामदेवऋषिः। सध्या-गायत्री देवता। अनुष्टुप् छंदः संध्या गायत्री-विसर्जने विनियोग। हें ठरलें.

* * *

प्रकरण ३४ वें

# तैत्तिरीय-संध्येंतील मंत्रांचे छंद, ऋषि व देवता.

तैत्तिरीयानीं सुद्धा इतराप्रमाणेंच मंत्राच्या छंद, ऋषि देवताचा व विनियोगाचा उच्चार केलाच पाहिजे हें पूर्वी साधार सिद्ध केलें आहेच व श्रीमद् जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य मठ शृंगेरी यांचें प्रमाणपत्रहि या ग्रंथात छापलें आहे, त्यातील एकच महत्त्वाचें वचन येथें पुरें –

'आपस्तम्बगृह्यसूत्रभाष्ये सुदर्शनकृते पूर्वोदाहृत छान्दोग्य ब्राह्मणवाक्यमेवोदाहृत्य ऋष्यादिस्मरणमावश्यकमिति प्रतिपादितम् । वक्तव्यं छंद आदौ तु ततश्चर्षिः प्रकीर्तितः देवताविनियोगश्च तैत्तिरीयक पाठकै रिति स्मृतौ तैत्तिरीयैरपि अवश्य ऋष्यादिस्मरण विहितमस्ति '

संस्कार-रत्नमाला ग्रंथात तैत्तिरीय संध्याच्या सर्व मंत्राच छंदर्ष्यादि दिलेले आहेत, परंतु त्यातील बरेच उल्लेख स्मृतिविरोधी व ऋक्सर्वानुक्रम आणि यजु सर्वानुक्रमसूत्रें आणि पुराणवचनें यांच्या विरुद्ध असल्यानें ते प्रमाद दूर करून ग्राह्य वाटले तेथें त्यातील आधार घेतले आहेत ज्या मंत्राच्या ऋष्यादींचा निर्णय या प्रकरणात पूर्वी केला आहे त्याबद्दल येथे पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं

आवाहन-मंत्र– 'आयातु वरदा० इत्यनुवाकस्थमंत्राणां वामदेव ऋषि । प्रात (मध्यान्ह-साय) संध्या देवता । प्रथमद्वितीययोरनुष्टुप् । 'सर्ववर्णे०' याचा द्विपदा गायत्री छंद सं र मा मध्यें दिला आहे पण तो प्रमाद आहे ८।८ अक्षराचे दोन चरण त्यात आहेत द्विपाद् द्वादशावस्ववर्णैः' (अग्नि पु) १२,८ अक्षराच्या दोन चरणाच्या छंदाचें नांव द्विपाद गायत्री (पिंगल सू०) हे लक्षण येथें नाहीं, म्हणून येथे द्विपादनुष्टुप्

छद म्हणणे भाग आहे ८।८ अक्षराच्या चार पादाचा अनुष्टुप् येथें दोनच पाद आहेत 'ओजोऽसी०' यजुश्छन्द । किंवा प्राजापत्यानुष्टुभ् म्हणावा ( ऋ प्रा )

**दुसरें मार्जन**–'दधिक्राव्णो' वामदेव ऋषि । दधिक्रावा देवता। अनुष्टुप् छद ॥ 'हिरण्यवर्णा०' इति मत्रचतुष्टयस्य नारायण ऋषि.। आपो देवता । त्रिष्टुप् छन्द ॥

**द्रुपदादिवेति** या मत्रात व यजुर्वेदी मत्रात थोडा फरक असला तरी अक्षरें तितकींच आहेत म्हणून छद तोच आहे पूर्वी निर्णय केला आहे

अर्घ्यदानात गोपीनाथभट्टानीं स र मा मध्यें अस्त्रोपसहरण सागितलें आहे त्याचा मत्र गायत्रीशिरोमत्रच आहे

'तच्चक्षुर्देवहितं' या मत्राविषयीं यजुर्वेदी मत्रात चर्चा केली आहे, पण हा मत्र तैत्तिरीय आरण्यकातील ४।४२ वा आहे यात १५+७४ = ८९ अक्षरें आहेत असें असून स रत्नमालेंत 'सोम सूर्यो गायत्री म्हटलें आहे गायत्री छद २४ अक्षराचा। ८८ अक्षराचा आकृति छद (अग्नि पु) (ऋक्प्रातिशाख्य) येथें १ अक्षर जास्त आहे '**न्यूनाधिकेन एकेन निचृद् भुरिजौ**' असें पिंगल सूत्र आहे, म्हणून याचा 'भुरिग् आकृति १ छद ठरतो 'भुरिगाकृति छन्द ' पिंगलसूत्र-हलायुधवृत्तिमध्यें आकृति छदाचें हेंच उदाहरण दिलें आहे तैत्तिरीय आरण्यकात ज्या मत्राच्या छदादिकाचा उल्लेख आहे त्याशिवाय ऋषि नारायण घेणेंच ऋषिनिर्णयाच्या शास्त्र-नियमानुसार भाग आहे 'नारायण सूर्यो भुरिगाकृति ' असें ठरलें अशा प्रकारेंच इतर मत्राच्या बाबतींत निर्णय केला आहे

'यत्किंचेदं०' 'कितवास:' इति द्वयो 'शुन शेपो वरुणास्त्रिष्टुप्' सूर्योपस्थाने विनियोग । वरुण देवतेचा मत्र असून 'सूर्योपस्थाने विनियोग। वरुण देवतेचा मत्र असून 'सूर्योपस्थाने' असें कीं याचें उत्तर '**वारुणी-भिरादित्यमुपस्थाय प्रदक्षिणम् इति श्रुति**' असें तैत्तिरीय सध्या-भाष्यकार श्रीकृष्णपडित यानीं म्हटलें आहे सायसध्योपस्थानातील सगळेच मत्र वरुणदेवतेचे आहेत व त्याचा वक्ता, ती प्रार्थना करणारा ऋषि शुन शेप' हाच आहे हें इम मे वरुण' या मत्राच्या श्रीकृष्ण पडितभाष्यात स्पष्ट दिसतें ते लिहितात 'पुरा कश्चिच्छुन शेपो नाम

ऋषि पशुत्वेन यूपे बद्ध सन् तद्बंधविमोचनार्थं वरुण प्रार्थयामास ' असा उल्लेख सध्याभाष्यात असून व ही शुन शेपाची कथा प्रसिद्ध असून स र- मालेंत या सर्व मत्राचा ' विश्वे देवा ऋषय ' म्हटलें आहे।

**संध्याविसर्जनम्**— उत्तमे शिखरे इत्यनुवाकमत्रयो वामदेव ऋषिः (स्मृतिमुक्ताफले) प्रातः (मध्यान्ह वा साय) सध्या देवता। प्रथमस्य अनुष्टुप्। द्वितीयस्य स्वराट्त्रिष्टुप्। 'घृणि सूर्य०' इत्यस्य नारायण ऋषिः। सूर्योदेवता। त्रिष्टुप्छद । सध्याविसर्जने विनियोग ।

स र मालेंत आणखी दोन दिलेले आहेत, पण तीन भाष्यें व एक सार्थ संध्यापुस्तक यात कोणीच ते दिलेले नाहींत म्हणून प्रयोगात दिले नाहींत



प्रकरण ३५ वें

# केशवादि चोवीस नांवांचा अर्थ व परस्पर संबंध

१ केशव–क ब्रह्मा, ईश, रुद्र, (केशौ) ब्रह्मदेव व रुद्र यांस (वर्तयति–प्रेरयति) प्रेरणा देणारा, यांचें पालन करणारा, म्हणून केशव यानें प्रभाव महिमा कळला पण हा कोण हा बोध होत नाहीं म्हणून सांगतात

२ नारायण जो केशव त्यालाच नारायण म्हणतात यानें कळतें कीं क्षीराब्धिनिवासी चतुर्भुज हा (१) अर = दोष, न अर = नार = गुण दोषरहित सर्व सद्गुणांचें नारांचें जो अयन, आश्रयस्थान तो (२) नारा वेदा आहेत अयन आश्रयस्थान ज्याचें, म्हणजेच वेदप्रतिपाद्य (३) नरसन्धि = नारम् (नर = जीव) नार अयते अनेन, म्हणून नारायण जगाचें जन्मादि कर्ता (४) निर्दोष वेदोत्पन्न ज्ञानानेंच जाणला जाणारा (५) नारम् = फलम्, जीवांना त्यांच्या कर्मानुसार फल देणारा (ऐहिक सुखदु खादि व पारलौकिक) (६) आलस्यरहित (७) नाशरहित (८) मुक्तांचें आश्रयस्थान (९) नारा = आप = पाणि आहे निवासस्थान ज्याचें तो (१०) उदकाचा जनक हा प्रभाव कशामुळें?

३ तो माधव आहे मा = माया, मायापति, मायाप्रेरक, मायाधीश, लक्ष्मीपति तो आहे (मा + धव) म्हणून त्याचा असा प्रभाव आहे स्थिती व कशामुळें हें कळें, पण तें केवळ शाब्दिक! काहीं ऐतिहासिक पुरावा पाहिजे, म्हणून सांगतात

४. तो गोविन्द आहे- गो विन्द गा = वेद धेनु, पृथ्वी, स्वर्ग विन्दति जो मिळवितो ( विद्‌ लाभे ) तो गोविन्द दैत्यानीं पळवून नेलेले वेद मत्स्यावतार घेऊन परत मिळविले समुद्रमथनाचे वेळीं कूर्मावतार घेऊन, मंदर पर्वताला धारण करून देवाना कामधेनू मिळवून दिली हिरण्याक्षानें चोरून नेलेली पृथ्वी वराहावतार घेऊन मिळविली हिरण्याक्षाचा वराहावतारस्पानें वध करून देवाना स्वर्ग मिळवून दिला ! अहो ! पण ता जर क्षीरसागरातच रहात असला तर स्थानपरिच्छिन्न, स्थानबद्धच ! छे ! छे !

५ विष्णु आहे तो ' सर्व स्थावर जंगमात्मक विश्वात आहे त्यास व्यापून राहिला आहे 'स. भूमिं विश्वतः वृत्वा अत्यतिष्ठत् दशांगुलम् ' (पु सूक्त ) विष्ल् व्याप्तौ वैकुंठाधिपति विष्णु म्हणतात तो निराळाच की काय ? तस नाहीं जो नारायण तोच वैकुंठाधिपति विष्णु, त्याचेंच दुसरें रूप त्या नारायणाला किंवा विष्णूला अवतार घेतल्याशिवाय काहीं करता येत नसावें असें मागील उदाहरणावरून वाटेल। तसे वाटू नये व तो स्वत दैत्यवध करू शकतो ह दाखविण्यासाठीं पुढील नाव आहे

६ मधुसूदन- मधु व कैटभ हे दोन दैत्य विष्णूनें स्वत मारले. मधु दैत्याचा संहार करणारा म्हणून मधुसूदन, व कैटभ दैत्याचा वध करणारा म्हणून कैटभारि, हीं विष्णूची नावें आहेत तो नरावतार घेत नाहीं असें वाटेल म्हणून काहीं नरावतारसूचक नावें पुढें आहेत शिवाय हेंहि दाखवावयाचें आहे कीं दैत्याचा पराभव, नाश करून देवाचें पालन, देवकार्य, करण्यासाठीं त्याला शस्त्रास्त्राची जरूर लागतेच असं नाहीं एवढ्याच साठीं पुढील नाव आहे

७. त्रि-विक्रम बलीला जिंकून देवाना स्वर्गादि सुख मिळवून देण्यासाठीं ' त्रीणि पदा विचक्रमे विष्णु ' विष्णूने तीन पावलें टाकलीं दोन पावलातच पृथ्वीपासून ब्रह्मलोकापर्यंतचें सर्व व्यापून टाकलें, व तिसऱ्या पावलानें बळीला पाताळात घातला ! (२) त्रैलोक्यात ज्याचा विक्रम चालतो असा (३) तिन्ही वेदाना सुद्धा अगोचर असलेला (४) विष्णु गरुडवाहन असून सुद्धा तो गरुडापेक्षा अधिक त्वरेनें गतीनें त्रैलोक्यात

संचार करू शकतो हें गजेन्द्रमोक्षाच्या निमित्तानें दाखविलें बलीला जिंकताना ज्यानें विक्रम करून दाखविला तो देहानें प्रथम किती लहान होता हें दाखविण्यासाठीं पुढलें नाव !

८ वामन- ७ वर्षे वयाचा ऋषिकुमार, अदितिपुत्र, मुंज झालेला वामनमूर्ति (अगदीं खुजा) बटु। ज्याच्या जवळ बटूचा पळसाचा दंड व लहानसा कमंडलु (झारी) होता तो। तो दंड सुद्धा एवढा वाढला कीं, पृथ्वीपासून ब्रह्मलोकापर्यंत पोचला! त्या वामनमूर्ति बटूनेंच बलीला पाताळांत चेपला, थापल्या एका पावलानें! (१) वामन = सौंदर्य देणारा (२) वाममार्गीं लक्ष्मीला धारण करणारा (३) वेदादिक ज्याचें गान करतात तो अहो! अदितिपुत्र वामन तर ब्रह्मचारी! त्याच्या वामभागीं लक्ष्मी असेल कशी? दृश्यरूपानें नसली तरी अदृश्यरूपानें होतीच मा = लक्ष्मी माया, आदिशक्ति, तिच्यामुळेंच तर विक्रम करता आला ती कार्यानुमेया आहे श्रीदत्तप्रभु (दत्तात्रेय) सन्यासी रूपात असले आणि सगुणसाकाररूपानें लक्ष्मी नसली तरी सगुणनिराकाररूपानें ती (माया) असल्याशिवाय, तिनें युक्त झाल्याशिवाय परमात्म्याला कोणतेंच कार्य करता येत नाहीं हें विसरू नये. श्रीज्ञानेश्वराच्या अमृतानुभवातलें पहिलें प्रकरण 'शिवशक्तिसमावेश' पाहावें एवढ्याचसाठीं पुढे सांगतात कीं तो नारायण विष्णु वामन बनला तरी तो —

९. श्रीधर- आहेच श्री धर, लक्ष्मीधर, किंवा श्री = विभूति 'संपद् विभूति शोभासु श्री' (व्याडिकोष) विभूति म्हणजे अष्टमहासिद्धि 'विभूतिर्भूतिरैश्वर्यं अणिमादिकमष्टधा' (इत्यमरे) अष्टमहासिद्धींना धारण करणारा तो श्रीधर अणिमा, गरिमा, लघिमा, महिमा वगैरेपैकीं महिमा सिद्धीचा उपयोग करण्यानें ब्रह्मांडापेक्षा सुद्धा मोठें होता येतें परमात्म्या च्या भगवताच्या ठिकाणीं आठहि महासिद्धि परिपूर्णरूपानें सहज असतात बलीनें त्रिपाद भूमिदान देऊ नये असें शुक्राचार्य गुरूनीं सांगितलें असताहि त्यानें ऐकलें नाहीं व संकल्पासाठीं तो झारींतील पाणी घेऊ लागला, शुक्राचार्य अणिमासिद्धीनें त्या झारीच्या तोटींत जाऊन जलमार्ग अडवून बसले बलीनें त्या तोटींत दर्भाची काडी घातली व मार्ग मोकळा केला हें सर्व बलीच्याकडून जें घडलें तें ईशिता व वशिता सिद्धींनीं करविलें

पौराणिक कथादृन काहीं तात्त्विक सिद्धान्त शिकता येतात कीं नाहीं हें यावरून ठरवावें. कोणी म्हणतील कीं जीवाच्या ठिकाणीं मुद्दा या असूं शकतात.' अदितिपुत्र वामन जीवच कशावरून नसेल? कोणाहि जीवाला जरी त्या सिद्धि असत्या तरी बली व शुक्राचार्य यांच्यापुढें त्याची शक्ति चालली नसती; पण प्रभु विष्णु-नारायणादि

१०. हृषीकेश आहेत. हृषीक = इंद्रियें; त्यांचा जो ईश तो हृषीकेश. सर्वांच्या मनरूपी अंतरिंद्रिय आणि सर्व ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें यावर त्याची सत्ता केवळ इच्छामात्रें चालते व जीव कितीहि समर्थ असला तरी तो भगवंताच्या ईशनशक्तीला सहज वश होतो. भगवान स्वत त्या इंद्रियांचेहि ईश असल्यानें त्याच्यावर त्याच्या इच्छेविरुद्ध कोणाचीहि ईशितासिद्धि प्रभाव पाडूं शकत नाहीं. फार काय मनात सङ्कल्प येताच त्याप्रमाणें निर्मिति करणारी जी कामातिशयिता सिद्धि ती जीवात जवळ जवळ अप्राप्यच! तिच्या उपयोगाचें एक उदाहरण पुढील नावानें दाखविलें-सुचविलें आहे.

११. पद्मनाभ- ज्याच्या नाभींतून पद्म-कमल उत्पन्न झालें (व त्यात पुढें ब्रह्मदेव उत्पन्न झाला) तो पद्मनाभ = नारायण. त्या ब्रह्मदेवानें याच सिद्धीनें केवळ सङ्कल्पानें पुढें सर्व सृष्टि निर्माण केली. 'धाता यथापूर्वम् अकल्पयत्' (ऋग्वेद) जन्मल्यावर त्या ब्रह्मदेवाला पद्मनाभ नारायण, डोळे असून दिसले नाहींत. ('तवेजरस्य'-हा भाग. १०।१४ मधील श्लोक पहा) म्हणून तो त्या कमळाच्या देठांतून आत शिरला व शोध करूं लागला कीं आपला जनक कोण? शमर वर्षे त्यानें शोधलें पण पत्ता लागला नाहीं! असा हा पद्मनाभ नारायण असला तरी भक्तांना किती वश होतो हें पुढील नावानें दाखविलें जातें.

१२. दामोदर- (दाम + उदर) ज्याच्या उदराला दावें बांधलें गेलें तो. बाळकृष्णाच्या पोटाला कमरेला यशोदेनें गाईचें दावें बांधलें व तें दगडाच्या मोठ्या उखळीला बांधून ठेवलें. जो मोठमोठ्या योग्यांना समाधी-तनुद्रा सापडत नाहीं, शङ्कराला ज्याचा अंत लागत नाहीं, त्या श्रीधराला च एका गवळ्याच्या बायकोनें दाव्यानें बांधला! पण तो कसला अवखळ! बांधला गेला, अगदीं शिशु असला तरी त्याचा त्रैलोक्याविषयी विक्रम

कमी होत नाहीं, हें पुढील नावानें सुचविलें आहे (अ) राम, भरत, शत्रुघ्न व लक्ष्मण हा चतुर्व्यूह प्रणवात्मक आहे 'अर्धमात्रात्मक राम-प्रत्यगात्मा (ब्रह्म) मकारात्मक भरत प्राज्ञ, उकारात्मक शत्रुघ्न तैजस, व अकारात्मक लक्ष्मण विश्व तुर्या, सुषुप्ति, स्वप्न व जाग्रत् याचे क्रमश स्वामी आहेत (रामोत्तर ता उ) याप्रमाणेंच वासुदेव, अर्धमात्रात्मक प्रत्यगात्मा; अनिरुद्ध मकारात्मक प्राज्ञ, प्रद्युम्न उकारात्मक तैजस व संकर्षण अकारात्मक विश्व तुर्या, सुषुप्ति, स्वप्न व जाग्रत् याचे स्वामी आहेत. (गोपालोत्तर तापिनी) वासुदेव, अनिरुद्ध, प्रद्युम्न व संकर्षण हा चतुर्व्यूह प्रणवात्मक आहे तात्त्विक दृष्टीने शत्रुघ्न, लक्ष्मण असा क्रम असला तरी जन्मानें लक्ष्मण शत्रुघ्नाचा वडील भाऊ म्हणून त्याचा उल्लेख आधीं करतात. तसा राहिणीतनय संकर्षण बलराम हे वासुदेव-कृष्णाचे दादा, म्हणून त्याचा उल्लेख प्रथम! शिवाय त्या दामोदरान-बालरूप असता कसा अद्भुत पराक्रम गाजविला हेंहि दाखवावें असल्यानें पुढील नाव संकर्षण आहे

१३. संकर्षण– सम्यक् कर्षति पापानि, दु खानि इति स-कर्षण । त्या दामोदर बालकानें ती पापाणाची उखळीच ओढीत नेली! पण ती जुळ्या अर्जुनवृक्षातून बाहर निघेना, अडकली, तेव्हा दामोदरानें तिचें सम्यक् कर्षण केलें व ते जुळे दोन विशालवृक्ष उन्मळून पडले! त्याच्या त्या आवाजान यशोदा घाबरली व तें दृश्य पाहून चिंतातुर झाली! ते वृक्ष मुळासकट खालीं कोसळताच त्यातून दोन दिव्य पुरुष, नारदशापमुक्त होऊन बाहर पडले ते नल व कूबर नळ कूबराच्या पापाचें व वृक्षयोनींतील दु.खाचें सम्यक् कर्षण केलें कीं नाहीं? या प्रमाणें जा दामोदर तोच संकर्षण बनला! पण हा दामोदर संकर्षण यशोदातनय गणला जाऊ नये म्हणून जनकसंबधसूचक नाव पुढें आहे

१४ वासुदेव– (१) वसुदेवाचा सुत पुत्र = वासुदेव वसुदेवसुत देव' (२) सर्वभूताचा निवास ज्या देवामधें आहे तो वासुदेव वासुश्च असौ देवश्च वसन्ति भूतानि अस्मिन् इति वासु (३) व+असु+देव = वासुदेव बलरूप प्राणरूप, व सर्व प्रकारें क्रीडा लीलादिगुणयुक्त असलेला हा प्रभाव ध्यानात न आल्यान ब्रह्मादि देवानीं सुद्धा आपल्या मायेनें त्याला मोहित

करण्याचा प्रयत्न केला, पण तो प्रयत्न त्याच्यावरच उलटला, कारण तो आहे—

१५. प्रद्युम्न– (१) सर्व विश्वाचा प्रकाशक (२) स्वयंज्योतिस्वरूप द्युम्न = तेज, प्रकाश, दीप्ति (३) त्याच्याजवळ विपुल द्युम्न = धन, संपत्ति आहे तो (४) विपुल संपत्ति देणारा 'द्युम्नं चित्र-श्रवस्तमम्' असे मित्रा विषयीं-सूर्याविषयीं सुद्धा म्हटलें आहे 'मित्रस्य चर्षणीधृत०' या मंत्राचा अर्थ पहावा त्यानें आपल्या प्रकृष्ट प्रकाशानें द्युम्नानें (प्र-द्युम्न) ब्रह्मादिकांस मोहित केल्यावर ते जेव्हा शरण आले, तेंव्हा त्यानीं मागितलेलें त्यास दिलेंहि तर मग त्या वासुदेवाला ताब्यात ठेवला कीं सुख, संपत्ति ऐश्वर्य इत्यादि वाटेल तें मिळत असेल! छे! तो सहसा कोणाच्या ताब्यात राहात नाहीं हें आता पुढील शब्दानें-नामानें सांगतात

१६. अनिरुद्ध (१) (अ-निरुद्ध)– त्याच्यावर कोणी सत्ता चालवू शकत नाहीं, त्याला कोणी सहसा बंधनात ठेवू शकत नाहीं देवकीचा आठवा पुत्र ठार मारता यावा म्हणून कंसानें वसुदेवदेवकी यांस बंदिवासात ठेवलें होतें, पहारा अति कडक होता, तरीहि वासुदेव 'अनि रुद्ध' आहे हें त्यानें जन्मताच सिद्ध केलें गडद अंधाऱ्या रात्रीं कारागृहातून वसुदेव त्या सद्योजात शिशुला सुखरूपपणें गोकुळात घेऊन जाऊ शकले तो प्रद्युम्न असल्यामुळें वसुदेवाच्या मार्गात तो भरपूर प्रकाश पाडीत होता वासुदेव-असा अ निरुद्ध असला तरी वा (२) अनि-रुद्ध हि आहे (अनिभि रुद्ध) अनि = सेवक दास भक्त त्याला वश करतात व आपल्या हृदयात रुद्ध करून कोंडून ठेवतात, त्या अर्थीं त्याच्या ठिकाणीं काहीं पुरुषार्थ नसेल! छे! हो! तो असा अप्रतिम पुरुषार्थ संपन्न आहे की—

१७. पुरुषोत्तम असें त्यास म्हणतात तो क्षरपुरुषाहून व अक्षर पुरुषाहूनहि परमश्रेष्ठ आहे म्हणून त्यास पुरुषोत्तम (पुरुष + उत्तम) म्हणतात

यस्मात् क्षरं अतीतोऽह अक्षरादपि चोत्तम.।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथित पुरुषोत्तम. (भ गी १५ पद्य)

ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्यरूपी षड्गुणैश्वर्य = भग त्याच्या ठिकाणीं परिपूर्ण आहे. अहो! हें काहीं ऋषींच्या ठिकाणीं सुद्धां होतें! उदा. 'भगवान् बादरायणः' असें म्हटलें आहे. पण तें परिपूर्ण नसतें. शिवाय

'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानां अगतिं गतिं।
वेत्ति विद्यां अविद्यां च स वाच्यः भगवान् इति॥'

हें सहा प्रकारचें ऐश्वर्य फक्त परमेश्वराजवळच असतें; तेंहि वासुदेव नारायणादींच्या ठिकाणीं आणि बाल-कृष्णाच्या ठिकाणींहि आहे; म्हणूनच त्यास पुरुषोत्तम म्हणतात. (३) पुरुषु-जीवेषु-व्यापकत्वात् पुरुष। व्यापकत्वानें जीवांत राहणारा तो पुरुष; आणि त्यांत उत्तम म्हणून पुरुषोत्तम. तो जर सर्व जीवांत आत्मारूपानें आहे तर जीव दुःखी कां? याचें उत्तर पुढील नावानें सुचविलें आहे.

१८. अधोक्षज—तो मन व इंद्रियें यांनीं अनुभवास येत नाहीं. इंद्रियांस अगम्य आहे. त्याचा अनुभव घेतल्याशिवाय जीव दुःखरहित -सुखी-होऊं शकत नाहीं. अधः कृतानि अक्षजानि येन स अधोक्षजः अक्ष = इन्द्रिय. घरांत द्रव्याचे कलश पुरून ठेवलेले असले तरी, तें द्रव्य जोंपर्यंत हातीं येत नाहीं तोंपर्यंत तेथें राहणाऱ्या भिकाऱ्याला भिक्षा,- उपासमार यांतून सुटता येत नाहीं. तसाच वासुदेव, पुरुषोत्तम जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं सर्वत्र व्यापून राहिलेला असतां तो दिसत नाहीं, म्हणून जीव दुःखी. तो कोणालाच दिसत नाहीं काय? व तो पाषाणांत सुद्धां आहे याला पुरावा काय? याचें उत्तर देण्यासाठींच पुढील नाव आहे.

१९. नरसिंह (नारसिंह) (१) प्रल्हादासाठीं नर-सिंह रूपानें पाषाणाच्या खांबाचा भंग करून त्यांतून प्रगट झाला. हिरण्यकशिपु इत्यादि दैत्यांना सुद्धां दिसला. नर असून सिंहहि आहे म्हणून नरसिंह (नारसिंह) (२) इतर कोणाकडून ज्याचा नाश-हिंसा-होणें शक्य नव्हतें तो नर = हिरण्यकशिपु, त्याचा नाश हिंसा करणारा तो नरसिंह, नारसिंह. वर मागतांना हिरण्यकशिपुनें जेवढ्या अटी घातल्या होत्या तेवढ्या सर्व पूर्ण करणें नरसिंहासच शक्य होतें. जो पुरुषोत्तम त्यानें असा विचित्र प्राणी होणें म्हणजे त्याच्या श्रेष्ठतेची हानि-च्युति झाली, तो

पुरुषोत्तमपदापासून च्युत झाला असे नाहीं हा ठरत? नाहीं कारण पुढील नावात आहे

२०. अच्युत = अ-च्युत आपला प्रभाव, सामर्थ्य, सद्गुण स्वभाव, इत्यादींपासून तो कधीं च्युत होत नाहीं कोण्याधीशानें नाटकात भिकाऱ्याचें सोंग घेतलें व डबरें हातात घेऊन वगैरे प्रकारें भिक्षा मागितली व सोंगाची बतावणी उत्तम केली, तर तेवढ्यामुळें त्याची श्रीमती नष्ट होते का? त्याला जाणणारे वाहवा करतील टाळ्या पिटतील! तसेंच हें तो अशीं सोंगें, विचित्र भयानक, इत्यादि रूपें का घेतो? याचें उत्तर पुढल्या नामात आहे

२१. जनार्दन- (१) आपल्या भक्ताच्या जन जन्ममरण परंपरेचा, दु खाचा विनाश करणारा (२) त्यासाठीं जनाचें-विशिष्ट दैत्यांचें अर्दन संहार करणारा (३) जनै अर्द्यते, (अर्द याचने) ब्रह्मादि सर्व देवसुद्धा ज्याची प्रार्थना, ज्याच्यापुढें याचना करतात असा तो आहे या वेळीं नृसिंहाची सर्व देवानीं केलेली स्तुति प्रार्थना श्रीमद्भागवतात, वा बृहत्स्तोत्र रत्नाकरात बघावी भक्ताचा उद्धार, भक्तांचें-साधूंचे परित्राण, ब्रह्मदेवाचे शब्द खरे करणें, व इंद्रादि देवांचें दु ख निवारण करून भक्तिपरिपोषक चरित्र निर्माण करणें इत्यादिसाठीं परिस्थित्यनुरूप पाहिजे तें रूप तो घेतो, फार कशाला तो पुरुषोत्तम असून इंद्राचा धाकटा भाऊसुद्धा होतो बलरामाचा अनुज झालाच

२२ उपेन्द्र- (१) इंद्राचा धाकटा भाऊ तथापि (२) 'उपोधिके' या सूत्रानुसार, तो इंद्रापेक्षा सर्वप्रकारें अधिक श्रेष्ठच असतो हें त्याला कसें साधतें? याचें उत्तर पुढील नाव देईल

२३ हरि- (१) भक्ताचें पाप, ताप हरण करणारा, (२) भक्त शत्रूचीं, धर्मविध्वंसकाचीं, दैत्याचीं, शिरें हरण करणारा (३) भक्तांचें चित्त हरण करणारा (४) त्याच्याशीं विरोध करणाराचे सर्व प्रयत्न हरणारा- निष्फळ ठरविणारा, तो आहे हा त्याचा सहज प्रभाव आहे त्याच्या मूळ स्वरूपाचें लक्षण तरी सांगा! तेंच पुढील २४ व्या नामात सांगितलें आहे

२४ श्रीकृष्ण–सत्ता–त्रिकालाबाधित सत्ता व आनन्द हें त्याचें स्वरूप-लक्षण आहे. (कृष्+ण) 'कृषिर्भूवाचक शब्दः णश्च निर्वृतिवाचकः' भू-सत्तायाम्, निर्वृतिः आनन्द. सत्ता = सत् आणि आनन्द जेथें आहेत तेथें चित् (ज्ञान-प्रकाश) आहेच. श्री = विभूति, तिनें युक्त तो श्रीकृष्ण. तो सर्व विश्वाचें नियमन-कर्षण-करतो म्हणूनहि त्यास कृष्ण म्हणतात. (कूर्म. पु.) कृष्ण = सच्चिदानंदघन परब्रह्म. श्रीकृष्ण = आदिशक्तियुक्त सच्चिदानंदघन परब्रह्म.

वरील वर्णनावरून कळेल कीं श्रीमद्भागवतादि वैष्णव पुराणाचें सार-सर्वस्व या चोवीस नावांत त्याच्या विग्रमान क्रमामुळें सुचविलें आहे. वैष्णवावताराचेंच वर्णन करावयाचें असतें तर येथील क्रम चुकीचा ठरला असता. कारण कीं

मत्स्यः कूर्मो वराहश्च नृसिंहो वामनस्तथा। रामो रामश्च रामश्च कृष्णः कल्कीति ते दश॥ (पद्म. पु.) मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, भार्गव राम (परशुराम), राघव राम (रामचंद्र) यादव राम (बलराम), कृष्ण, आणि पुढें होणारा कल्की असा दशावताराचा क्रम युगानुसार आहे. येथें मत्स्य, कूर्म, वराह सुचविले आहेत; नंतर वामन, बलराम, नरसिंह व कृष्ण असा क्रम आहे. गोविंद, दामोदर, वासुदेव हीं कृष्णावतारातील नावें आहेत; पण तीहि चरित्रक्रमानुसार नाहींत. वासुदेव, दामोदर, गोविन्द असा चरित्रक्रम आहे. श्रीकृष्ण हें नाव शेवटीं देऊन हें सुचविलें कीं केशवादि सर्वच सच्चिदानंदघनस्वरूपच आहेत.

रामोपासक म्हणतील कीं, 'राम' हें नाव यांत का नाहीं? 'दामोदर' च्या वर्णनांत पूर्वीच साधार दाखविलें आहे कीं, जो राम, भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण रूपी चतुर्व्यूह तोच तत्त्वतः वासुदेव, अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण रूपी चतुर्व्यूह आहे, म्हणून यांत राम भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण या चौघांचेंहि वर्णन आहेच. कृष्ण = सच्चिदानंदघन परब्रह्म त्याप्रमाणेंच राम = सच्चिदा-नंदघन परब्रह्म

रमन्ते योगिनोऽनन्ते नित्यानन्दे चिदात्मनि।
इति रामपदेनाऽसौ परं ब्रह्माऽभिधीयते॥
(राम पूर्वतापिनी १।६)

यात नित्य व अनंत शब्दांनीं त्रिकालाबाधित भेद-परिच्छेदातील 'सत्'चा बोध होतो. आनंदरूपत्व व चिद्रूपत्व स्पष्टच सांगितलें आहे.

**सूचना**-चोवीस नांवाचे अर्थ दोन ऋग्वेदी संध्याभाष्यांत मिळाले. त्यांत दिलेल्या व्युत्पत्ति येथें विस्तारभयास्तव सर्व घेतल्या नाहींत. कांहीं अर्थ अमरव्याख्यासुधा ग्रंथांत मिळाले. वर दाखविलेला चोवीस नांवांचा परस्पर संबंध पूर्वी कुठें आढळला किंवा ऐकलाहि नव्हता. प्रथम नांवाचा नुसता अर्थच देण्याचा विचार होता, व तो लेख लिहिला जात असतां एक B. A., LL. B. गृहस्थ म्हणाले कीं हीं नांवें या विशिष्ट क्रमानेंच कां? तेवढें निमित्त पुरलें! तो लेख अर्धवटच सोडला गेला आणि अनावर स्फूर्ति अंतरांत उत्तरें देऊं लागली व वरील विवेचन या हातानीं लिहिलें गेलें. तें योग्य अयोग्य ठरविणें, पंडित विद्वानांचें क्षेत्र आहे.

**लक्षांत ठेवा** हा ग्रंथ लिहिला जात असतां असें अनेक वेळा घडलें कीं मनांत शंका येण्याची खोटी कीं, तिचें समाधान पाठोपाठच मिळत होतें. म्हणून या ग्रंथांत जें कांहीं चांगलें, प्रशंसनीय दिसेल, ठरेल तें त्या स्फूर्तिदायक अन्तर्यामी श्री रघुनाथाचेंच मानावें. 'मनुष्या• स्खलनशीला' निदान हा लेखक तरी अपवाद नाहीं.

खरोखर पाहतां या पूर्वभागाची समाप्ति येथेंच होणें योग्य होतें, पण कांहीं व्यक्तींच्या सूचनानुसार पूजारहस्य व वैश्वदेवाविषयीं थोडी सामान्य माहिती हीं दोन छोटीं प्रकरणें पुढं दिलीं आहेत.

यो राम• कृष्णतामेत्य सार्वात्म्यं प्राप्य लीलया ।
अतोषयद् देवमौनिपटलं तं नतोऽस्म्यहम् ॥
(श्रीकृष्णोपनिषत्)

❀ ❀ ❀

प्रकरण ३६ वें

# पूजेंतील रहस्य

> यथा देहे तथा देवे यथा देवे तथा गुरौ ।
> यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी ॥

पूजा हें मनुष्यमात्राचें एक आवश्यक नित्य कर्तव्यकर्म आहे पूजा हें वैश्वदेवासारखें कुटुम्बचालक गृहस्थाचेंच कर्म नाहीं

प्रत्येक धर्मांत कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें पूजा हें कर्म आहेच नुसता नमस्कार करणें हा सुद्धा पूजेचाच एक प्रकार आहे 'पूजा नमस्याऽपचिति सपर्याऽर्चाऽर्हणा समा (अमरे) कोणाचा आदर सत्कार करणें, मान सन्मान देणें हाहि एक पूजेचाच प्रकार आहे

सनातन वैदिक धर्मांत तर अनेक देवदेवता पूज्य पूजनीय म्हणून वर्णिल्या आहेत हा अनेक दवतावाद काहींना नकोसा वाटतो, काहीं लोक त्याला निंद्य ठरवितात, याचें कारण अनेक देवतापूजनांतील, हेतु व रहस्य त्यास समजत नाहीं सिंह, वाघ, बैल, गाढव, यासारखे पशु, कोकिळा, कावळा, गरुड, यासारखे पक्षी सापासारखा दुष्ट विषारी, उंदरासारखा चोरटा, मोरासारखा साप खाणारा याची सुद्धा पूजा कर्तव्य म्हणून सांगितली आहे, एवढेंच नव्हे, तर पिंपळ, उंबर इत्यादि अनेक वृक्षाचीसुद्धा पूजा आहे यांतील हेतु हाच आहे की कोणी कितीहि हिंस्र, विषारी, चोरटा, कर्कश आवाजाचा, प्राणी असला किंवा स्थावर वृक्ष असले तरी त्या सर्वांत एकच परमात्मा आहे व तो परमपूज्य आहे याची आठवण वेळोवेळीं झाली पाहिजे पाषाण, धातु, मृत्तिका वाळू, पाणी,

अग्नि इत्यादि सर्वांतहि तो आहे याचा मनुष्यास विसर पडू नये आणि गुणदोषाकडे न पाहता पूज्यभाव उत्पन्न होण्याचा अभ्यास सहज व्हावा एवढ्यासाठीं सर्वांनाच पूज्य ठरविलें आहे अशाच्या पूजेनें जें जें दिसे भूत। तें तें भगवत, अशी भावना वाढत गेली तरच पूजा केल्याचा खरा फायदा पदरात पडला! परंतु हा पूजेंतील मूळ हेतु हल्लीं जवळ जवळ विसरला गेला आहे! व अमक्या दिवशीं अमक्याची पूजा करावी असें शास्त्रानें सांगितलें आहे व घराण्यात ती परंपरा आहे म्हणून पूजा करतात व हें सदर भरलें जातें इतकेंच

काहीं पिढ्यापूर्वी कुटुंबातील प्रत्येक पुरुष शालिग्राम, राममूर्ति, कृष्ण-मूर्ति इत्यादि कोणाची तरी पूजा स्वतः करीत असे मुलीच्या लग्नाच्या वेळीं तिच्या बरोबर देवी किंवा बालकृष्णमूर्ति देण्याची प्रथा अद्यापहि चालू आहे त्यातहि हाच हेतु आहे कीं तिनें त्या मूर्तींची स्वतः रोज पूजा करावी, पण हल्लीं अशी स्थिति आहे कीं अनेकांच्या घरातील देवात एकाच जातीचे अनेक शालिग्राम अनेक नर्मदेगणपति, अनेक देवी, अनेक बालकृष्ण! लग्न होऊन घरात येणाऱ्या प्रत्येक स्त्रीगणिक १।१ देवी किंवा बालकृष्ण वाढत जातात! पूजा बहुधा एखाद्या लहान मुलाच्या गळ्यात अडकवलेली! इ इ अनास्था वर्णावी तेवढी कमीच!

रामपूर्वतापिनी उपनिषदात म्हटलें आहे कीं परमात्मा राम 'ऐश्वर्यं स्वस्य पूजनात् ददाति-' (रा० ति) देवपूजेनें ऐश्वर्यप्राप्ति होते रामच नव्हे कोणताहि देव, कोणतीहि देवी तेंच फळ देतात हल्लीं धनधान्य वस्त्रालंकार इ० ऐश्वर्याची लालसा वाढली आहे, पण देवपूजा नकोशी वाटू लागली आहे! जे कोणी थोडे स्त्रीपुरुष पूजा करतात (नित्य, नैमित्तिक, काम्य) तेहि पूजेंतील मुख्य रहस्याकडेहि दुर्लक्ष करतात म्हणून देवादिकांच्या पूजेंतील मुख्य तत्त्वाचा-रहस्याचा येथें थोडा विस्तार करावयाचा आहे तें रहस्य हेंच कीं स्वतः च्या देहाविषयीं जशी भावना असते तशी भावना पूजा करताना देवादिकांविषयीं असली पाहिजे (श्लोकप्रारंभींच दिला आहे) पूजेंत जशी ज्याची भावना असेल तसें त्या पूजक व्यक्तीस फळ मिळतें

शालिग्राम, बाण इत्यादि देव व देवी, बाळकृष्ण इत्यादि सावयव मूर्ति पाषाणमय, धातुमय, जड, चैतन्यरहित आहेत अशीच भावना बहुधा सर्व पूजकांची असते, आणि तदनुसारच पूजा केली जाते लाखों लोकांत १।२ अपवाद सापडले तर नशीब! थोडीं उदाहरणें दिल्यानें हें मान्य होईल

पूजेंतील देव हातांतून खालीं ताम्हनात, जमिनीवर पडला तर पूजकाच्या अंगावर थोडे रोमांच सुद्धा येत नाहींत, मग अश्रु कोठले? व छातींत धडधड कोठली? ८।१२ दिवसाचें मूल धडकन हातांतून पाटावर पडलें तर तशीच स्थिति राहते का? देव सचेतन आहे, मी काय करतो तें त्याला दिसतें, तो सर्वज्ञ आहे त्यालाहि ज्ञानेंद्रियादि आहेत, मी करतो ती प्रार्थना हा देव कानानीं ऐकतो, मी वाहिलेल्या फुलाचा वास त्याला कळतो, इत्यादि प्रकारच्या भावना पूजेच्या वेळीं जागृत ठेवून पूजा करून पहावी, म्हणजे पूजेचा प्रभाव अनुभवास येईल परमेश्वर राम, कृष्ण, शिव सर्वज्ञ आहे, सर्वत्र व्यापून भरला आहे, त्याला सर्व दिसतें हे पुस्तकांत वाचून पाठ झालेलें, प्रवचनांत कीर्तनांत ऐकणारे कितीजण पूजेच्या वेळीं तें स्मरतात!

मातीनें बरबटलेलीं, काळवडलेलीं, किडलेलीं फुलें, तुळशी, बेल इत्यादि देवास वाहतांना हात कचरत नाहींत, मनास धक्का बसत नाहीं! पूज्याला पाटावर बसवून पूजकानें चौरंगावर बसून एखाद्या माणसाची पूजा केली तर त्याची पूजा केली त्याचा अपमान केला की पूजा? देव ताम्हनात खालीं जमिनीवर व पूजक पाटावर! हें तसेंच नाहीं का! सदाफुलीचीं फुलें कोणी वास घेण्यासाठीं हातांत धरीत नाहीं, स्त्रिया डोक्यांत घालीत नाहींत, घालणार नाहींत! पण देवाला म्हणे चालतात! अशा वेळीं भ गी श्लोक '*पत्रं पुष्पं फलं तोयं०*' चटकन् म्हणून दाखवितील! पण या श्लोकांत उद्देशिलेली भक्ति कोटि माणसांत एखाद्याच्याच ठिकाणीं असते असें श्रुत्यादि म्हणतात! हे फक्त एक उदाहरण दिलें

'*मयाऽऽहृतानि पुष्पाणि पूजार्थं प्रतिगृह्यताम्*' मी काढून आणलेलीं फुलें पूजा म्हणून ग्रहण करावीं असें तोंडानें म्हणतात, पण कांहीं वेळा '*मया हृतानि*' मात्र असतात म्हणजे चारून आणलेलीं असतात! किंवा विकत घतलेलीं किंवा इतर कोणीतरी काढून आणलेलीं असतात,

म्हणज पूजेंत सुद्धा असत्य भाषण! असें अनेक वेळा पूजेंत करतात म्हणतात **'अक्षतान् समर्पयामि'** पण वाहतात क्षतान् तण्डुलान्! भावीनें भरलेलें तुलसीपत्र कोणी मुखशुद्धीसाठीं दिलें तर डोळे वटारले जातात! पण देवाला वाहताना? कसेंहि चालतें स्नानाचें पाणी फार कढत ठेवलेलें पाहिलें कीं काय वाटतें? पण देवाला अभ्यंगस्नान घालताना वाफा निघत असलेलें आधणासारखेंहि घालतात!

**'यथा देहे तथा देवे'** म्हणजे कसे व काय, हें मर्म वरील उदाहरणावरून ध्यानात ठेवून पूजा केली व स्वत लावलेल्या तुळशीचें स्वत काढलेलें एकच शुद्ध पान वाहिलें असता जो लाभ होईल त्याच्या सहस्रांशानें सुद्धा तशी भावना नसता पुष्कळ खर्च करून केलेल्या पूजेनें होणार नाहीं

स्वतास प्रिय असलेलें पान, वस्त्र, पेय, पाणी मिळालें म्हणजे बरें वाटतें, प्रसन्नता वाटते घाणेरडें, अस्वच्छ, शिळें, न आवडणारें अन्नादि खाण्याची, पिण्याची वेळ आली कीं अप्रसन्नता, दु ख, क्रोध उत्पन्न होतात म्हणून ज्या देवदेवताना जें पत्र पुष्प, फल धूप, नैवेद्य इत्यादि जें प्रिय असेल तेंच अर्पण केलें पाहिजे, त्याना अप्रिय, निषिद्ध, अपवित्र वस्तु अर्पण करणें म्हणजे त्याचा अपमान करणें हाय पदार्थ थोडा कीं पुष्कळ हा प्रश्नच नाहीं

एकाद्या महाराजाच्या दरबारात किंवा कोर्टात, महाराजाच्या किंवा न्यायाधीशाच्या (कोर्टाच्या) देखत कोणी पाय पसरून बसला, झोपला, आडवा पडून, विडी, सिगारेट ओढली, महाराजाला पाठ दाखवून परत फिरला, पाठ दाखवून पाया पडला, तर राजाचा, कोर्टाचा तिरस्कार (कन्टेंम्प्ट) केल्याचा गुन्हा होतो व शिक्षाहि होते मग अशा गोष्टी देवळात, देवापुढें, देवघरात, देवाच्या गाभाऱ्यात करणें सुखावह कसें होईल? गाभाऱ्यात स्वत भोंवतीं प्रदक्षिणा करणें व गाभाऱ्यातून बाहेर पडताना देवाकडे पाठ करून बाहेर पडणें शास्त्रानें व संतानीं निषिद्ध ठरविलें आहे, त्याचें मर्म आता कळलें असेल

आकाशी सोवळें म्हणतात तसें अति कडक सोवळें आचार-पालनात, खाण्या पिण्यात, पाळणारे पुरुष आणि स्त्रिया सुद्धा, पूजेच्या बाबतींत

अगदीं सद्भावना शून्य असतात! मात्र त्यातील पुष्कळांस असत्य, परनिंदा, परदोष चर्चा, अन्यायार्जित धन याचा विटाळ वाटत नाहीं !! आचार-पालनाविषयीं पूर्वी लिहिलें आहेच

स्त्रिया, मुली मगलागौरीच्या पूजेंत त्या गौरीला फुलात पुरून टाकतात ! फुलें पुष्कळ पाहिजेत म्हणून दुसऱ्याच्या मालकीचीं पहाटेसच चोरून आणतात! आणि रात्रीं त्या देवापुढें अश्लील, ग्राम्य० अभद्र गाणीं म्हणतात व धागडधिंगा घालतात! यानें ती मगलागौर-मगल-कल्याण करणारी गौरी देवी, प्रसन्न होऊन, चिरसौभाग्य धनधान्य पुत्रपौत्र आरोग्य याची अभिवृद्धि-समृद्धि करील काय ? मगलागौरीची, वडाची, हरितालिकेची पूजा कशासाठीं करावयाची हेंच पुष्कळाना माहीत नसतें! व्रत म्हणून केलेंच जात नाहीं! एक रिवाज, व उत्साह म्हणूनच बहुधा करतात

वरील थोड्याशा उदाहरणावरून पूजेंतील रहस्य ध्यानीं येईल, म्हणून अधिक विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं

पूजेंतील देवाविषयीं जोपर्यंत चैतन्यभावना, पूजा करताना, जाग्रत राहात नाहीं, तोंपर्यंत तो देव म्हणतो

'ये यथा मा प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम्'

मी चेतन आहे असें तुला वाटत नाहीं, तर तुझी प्रार्थना मला कशी ऐकायला येणार ? तुझें दारिद्र्य, दु ख मला कसें दिसेल ? व मी अचेतन तुझ्या कामना कशा पूर्ण करू शकेन ? 'भावेन देवम्'

जयापासीं जेसा भाव। तयालागीं तैसा देव ॥
भाव असेल भाइक। देव होतो मदाटक ॥

इत्यादि सतवचनेंहि हेंच सागतात

देव सचेतन सेंद्रिय आहे अशा भावनेनें पूजा प्रार्थना केली म्हणजे कशा अद्भुत घटना (चमत्कार) घडतात याचीं या विसाव्या शतकातील पुष्कळ उदाहरणें आहेत, पण विस्तारभयास्तव देता येत नाहींत

♡ ♡ ♡

प्रकरण ३७ वें

# वैश्वदेवाविषयीं थोडी माहिती.

यज्ञशिष्टाशिनः सन्तः मुच्यन्ते सर्वकिल्बिषै ।
भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्म-कारणात् ॥ (भ. गी. ३।१३)

गृहस्थ द्विजानीं रोज नित्यनियमानें पञ्चमहायज्ञ केले पाहिजेत. ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ व मनुष्ययज्ञ, हे पाच मिळून पंच महायज्ञ होतात ब्रह्मयज्ञ म्हणजे वेदमंत्राचा श्रुतिप्रोक्त जप, हा एक आणि वैश्वदेव व बलिहरण वगैरेंत शेष चार आहेत हे पञ्चमहायज्ञ करून जे भोजन करतात ते पंचसूना ( पाच हिंसा ) पाप-दोषापासून मुक्त होतात, आणि जे करीत नाहींत, म्हणजे केवळ उदरभरणासाठींच जें अन्नादि शिजविलें जातें तें भक्षण करतात ते पापी; व ते पापच भक्षण करतात असें भगवतानीं तिसऱ्या अध्यायात सांगितलें आहे पण गीता रोज पठण करणारे सुद्धा पुष्कळ लोक पंच महायज्ञ, किंवा नुसता वैश्वदेव सुद्धा करीत नाहींत. वैश्वदेवाचा उपयोग काय हें आधुनिक वैज्ञानिक दृष्ट्या सिद्ध केलेलें पाहणें असेल त्यानीं कल्याण मासिकाच्या १२ व्या वर्षाच्या बाराव्या अंकातील 'राजयक्ष्मा ( क्षयरोग ) और हवनयज्ञ' हा डॉ फुंदनलाल याचा लेख मुद्दाम पहावा. M D वगैरे पाश्चात्य देशातल्या अनेक पदव्या त्याच्या नावाच्या पुढें आहेत.

वैश्वदेव करणाराना अनेक शंका येतात त्याविषींच्या महत्त्वाच्या सर्व शंकाचें निरसन करण्यासारखी उपयुक्त माहिती देवी भागवतात-- ( ११। २२, ४।११ ) मिळाली तिच्या आधारें खालील वर्णन दिलें आहे. ( कंसातील मजकूर या लेखकाचा आहे. )

**सामान्य नियम**-- चुलींत, लोखंडाच्या पात्रात, खापरात, किंवा नुसत्या भूमीवर (पात्रादिकाशिवाय) वैश्वदेव करू नये. (येथें वैश्वदेव = देवयज्ञ) कुंडात किंवा मातीच्या स्थंडिलावर करावा. अग्नि फुंकणीनें फुंकून प्रज्वलित करावा **'मुखात् अग्निः'** अशी श्रुति आहे. वस्त्रानें वारा घालण्यानें व्याधि, सुपानें धननाश, हातानें मृत्यु (मृत्युसारखी आपत्ति) अशीं फळें मिळतात. तोंडानें फुंकणीनें फुंकल्यानें कर्मसिद्धि होते (फुंकणीचें तोंड जितकें अरुंद असेल तितकें अधिक फायदेशीर; यानें प्राणायामापासून होणारे फायदे सहज होतात.)

## भात (चरु) तूप नसल्यास काय करावें?

फळें, दहीं, तूप, कंदमुळें, विहित शाका (भाज्या) इत्यादींनीं करावा हें सुद्धा अशक्य असेल तर समिधा, तृण (गवत) इत्यादींनीं करावा. हवन करावयाच्या वस्तूंना क्षार (मीठ वगैरे खारट पदार्थ) व तेल यांचा स्पर्शहि नसावा. हवनाच्या पदार्थाला सर्व बाजूंनीं तूप लावून हवन करावें. तें नसेल तर दहीं, दूध, लावावें-चोपडावें. हेंहि नसेल तर पाणी लावून हवन करावें कोणताहि पदार्थ सुकून गेलेला, रसहीन, नासलेला, शुष्क, कोरडा असू नये. शुष्क द्रव्यानें किंवा शिळ्या द्रव्यानें केल्यास कुष्ठरोग (कोड) होतात मीठ किंवा तेल लागलेल्या द्रव्यानें अधःपात होतो, नरकात जावें लागतें! (डाल्डा वगैरे तेलाचेच प्रकार आहेत).

राखाडीसहित निखारे चुलीच्या उत्तर दिशेस घेऊन त्या अग्नींत समंत्रक सविधि करावा.

पाच बोटाच्या सूकरी मुद्रेनें ज्वाळेंत आहुति द्याव्या. ज्वाला नसता दिलेल्या आहुति व्यर्थ याचें कारण डॉक्टर कुंदनलालजींच्या पूर्वनिर्दिष्ट लेखात दिलें आहे.

वैश्वदेव न करता जे मूर्ख द्विज जेवतात ते कालसूत्र नावाच्या नरकात पडतात देवी भागवतातील माहिती समाप्त.

शाक, कंदमूल, फळ, पत्र, पुष्प इत्यादि जें आहारात असेल, त्यांनीच (निषिद्ध पदार्थ वर्ज्य करून) चरूच्या (भाताच्या) अभावीं, कधानेंहि वैश्वदेव करावा 'यदन्नाः पुरुषा राजन् तदन्नास्तस्य देवताः' (वा. रा)

जें मुख्य अन्न, ज्या दिवशीं खावयाचें असेल त्यानें वैश्वदेव करावा हें सार, फक्त निषिद्ध पदार्थ वर्ज्य करावे

एकादशी इत्यादि उपवासाच्या दिवशीं सुद्धा वैश्वदेव केलाच पाहिजे घरात भात वगैरे स्वयपाकच झाला नसेल तर फराळाच्या पदार्थांनीं (मीठ तेल न लागलेल्या) करावा देवाना उपवास नसतो

अग्नि, मिळणें किंवा निर्माण करणें अशक्य असेल तर 'जले जलेन वा जुहुयात्' कुडात पाणी घालून त्यात अग्नीचें आवाहनादि करून पाण्यानें त्या जलात आहुति घाव्यात

कोणी गृहस्थ म्हणतात कीं 'आमची सौभाग्यवती तीन आहुति चुलीत टाक्ते' परतु हें विहित नाहीं यजमान घरात असता यजमानानेंच वैश्वदेव केला पाहिजे आपत्काळीं पुत्रादिकानीं करण्यास हरकत नाहीं, '

वैश्वदेवाच्या अग्नींतील विभूति धारणाविषयीं लेडबीटरनीं लिहिलें आहे कीं मधल्या बोटानें घेऊन जेव्हा लावतात तेव्हा ते भस्म, राखाडी लावीत आहेत असें न दिसता तेज:पुंज अग्नीच लावीत आहेत असें दिसतें 'ए टेंपल थॉट फार्म' हा इग्रजी लेख पहावा याविषयीं पूर्वींच्या प्रकरणातून लिहिलें आहेच

वैश्वदेव होण्यापूर्वीं सन्यासी भिक्षेस = माधुकरीस–आल्यास शिजलेल्या अन्नातून वैश्वदेवापुरतें बाजूस काढून ठेवून सन्यास्यास भिक्षा घालावी (श्लो १२।१३) वैश्वदेवापूर्वीं भिक्षा घातल्याचा दोष सन्यासी नष्ट करतो, पण सन्याशाला भिक्षा न वाढल्याचा दोष वैश्वदेव दूर करीत नाहीं (श्लो १४) यति (सन्यासी) व ब्रह्मचारी (गुरुगृहीं राहून अध्ययन करणारा) हे दोघे शिजलेल्या अन्नाचे स्वामी होत त्याना भिक्षा न घालता भोजन केल्यास चाद्रायण व्रत प्रायश्चित्त केलें पाहिजे

तपश्चर्यादि काहीं विशिष्ट काळात ब्राह्मण गृहस्थानेंहि माधुकरी मागणें दोषार्ह नाहीं मात्र ती पञ्चमहायज्ञ होणाऱ्या गृहस्थाकडील असली पाहिजे, तथापि त्यानें वैश्वदेवाची आवृत्ति केलीच पाहिजे

**विशेष सूचना–** ऋग्वेदीय वैश्वदेवाच्या पोथ्यात अग्नीच्या आवाहनाचा विधि समन्त्रक दिला आहे, पण अग्निविसर्जनाचा उल्लेख सुद्धा नाहीं हें

आश्चर्य आहे ज्या कर्मांत ज्या देवतेचें आवाहन केलें असेल त्या कर्मांच्या अतीं त्या देवतेचें देवताचें विसर्जन केलेंच पाहिजे शुक्लयजुर्वेदीय पाठकशास्त्रीकृत नित्यकर्मांच्या पुस्तकात वैश्वदेवाच्या अतीं तें दिलें आहे गीताप्रेसच्या नित्यकर्मांच्या पुस्तकातहि आहे म्हणून अग्निविसर्जनाचा मत्र देणें कर्तव्य वाटतें, ता—

गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ स्वस्थाने परमेश्वर ।
यत्र ब्रह्मादयो देवास्तत्र गच्छ हुताशन ॥

हा मत्र म्हणून अग्नीवर अक्षता टाकाव्या हें विसर्जन विभूतिधारणानतर करावें



आश्चर्य आहे. ज्या कर्मांत ज्या देवतेचें आवाहन केलें असेल त्या कर्माच्या अंतीं त्या देवतेचें देवताचें विसर्जन केलेंच पाहिजे. शुक्लयजुर्वेदीय पाठकशास्त्रीकृत नित्यकर्माच्या पुस्तकात वैश्वदेवाच्या अंतीं तें दिलें आहे. गीताप्रेसच्या नित्यकर्माच्या पुस्तकातहि आहे. म्हणून अग्निविसर्जनाचा मंत्र देणें कर्तव्य वाटतें; तो—

गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ स्वस्थाने परमेश्वर ।
यत्र ब्रह्मादयो देवास्तत्र गच्छ हुताशन ॥

हा मंत्र म्हणून अग्नीवर अक्षता टाकाव्या. हें विसर्जन विभूतिधारणानंतर करावें.

